

नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, संचालित मासिक
( महाराष्ट्र राज्य साहित्य, संस्कृती मंडळ पुरस्कृत )

# नवभारत

वर्ष एकतिसावे : अंक तिसरा
डिसेंबर, १९७७

अध्यक्ष व विश्वस्त
तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी





पत्रव्यवहार :
संपादकीय : भा. ग. सुर्वे
प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई. ४१२८०३
व्यवस्थापकीय : पां. गो. आपटे,
व्यवस्थापक ' नवभारत ' मासिक
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )

वार्षिक वर्गणी १८ रु. या अंकास रु. ३

( शासनाने पुरविलेल्या स्वस्त कागदातून प्रस्तुतचा अंक सिद्ध झाला आहे ).

अनुक्रमणिका









कै. प्रा. गोवर्धनदास पारीख

जन्म : ७।११।१९१५ मृत्यू : ७।१२।१९७६

अनुक्रमणिका

# संपादकीय

७ डिसेंबर १९७७ हा कै. गोवर्धनदास पारीख यांचा पहिला पुण्यतिथी दिन आहे. ह्या दिना-निमित्त हा विशेषांक प्राज्ञ पाठशाळा मंडळातर्फे पारीख यांच्या पुण्यस्मृतीला अर्पण केला आहे. पारीख हे प्राज्ञ पाठशाळा मंडळाचे १२ वर्षापेक्षा अधिक काळ विश्वस्त व प्रा. पा. शा. मं. संचालक मंडळाचे सदस्य होते.

या अंकात पारीख यांच्या संबंधी व त्यांच्या विचारांसंबंधी अनेक लेख संगृहीत केले आहेत. विशेषतः पारीख यांच्या इंग्रजीमध्ये प्रसिद्ध झालेल्या तीन लेखांचा मराठी अनुवादही यात अंतर्भूत केला आहे. वर्तमान भारताच्या शैक्षणिक व राजकीय जीवनाशी अत्यंत निगडित असलेल्या समस्यांची निदाने आणि उपाय सांगणारे त्यांचे हे अनुवादित केलेले दोन लेख अत्यंत लक्षणीय आहेत. स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर गेल्या तीस वर्षांत भारतीय संघराज्याने आणि प्रादेशिक राज्यांनी जी शैक्षणिक पद्धती अंगिकारली व शैक्षणिक संस्थांचा विस्तार केला; त्यांच्या योगाने भारताच्या शैक्षणिक क्षेत्रावर भयंकर आपत्ती ओढवली आहे; हा सगळाच अत्यंत अदूरदर्शी, नव्हे आंधळा कारभार झाला; त्यामुळे सुशिक्षितांच्या अक्राळविक्राळ रूप धारण करणाऱ्या बेकारीचा प्रश्न आ वासून उभा आहे. या संदर्भात 'आपल्या शैक्षणिक समस्या' हा लेख मार्गदर्शक ठरतो. या संबंधात पारीख आपल्या लेखाच्या अखेरीस म्हणतात, "शिक्षणक्षेत्रातील चाकोरीचा मार्ग सोडून वेगळचा मार्गाचा अवलंब करणे आज आवश्यक झाले आहे" आणि त्यानंतर त्यांच्या स्वभावास अनुसरून ते नम्रतेने म्हणतात की, "असे प्रतिपादन करण्याचा मी जो प्रयत्न केला आहे, त्याच्यात मुलखावेगळे असे काहीच नाही. त्याच्या योगाने ज्या अडचणींचा उल्लेख मी अगोदर केला आहे, त्यांतील गुंतागुंतीत भर पडणार नाही, पण त्या सोडविण्यात आपल्याला यश येऊ शकेल, असा हा मार्ग असला पाहिजे. ह्या संदर्भात आणखी एका गोष्टींचा उल्लेख केला पाहिजे. ह्या देशात काही प्रमाणात आपण अशी परिस्थिती घडवून आणली आहे– आणि प्रगत देशांत ती अधिकच प्रमाणात घडून आली आहे– की जिच्यात प्रस्थापित शिक्षणव्यवस्थेला विनीतभाव धारण केल्याशिवाय गत्यंतर नाही. ह्या आकारिक शिक्षणव्यवस्थेच्या शिखारासारखे विद्यापीठ असते. शिक्षण देण्याची मक्तेदारी ह्या शिक्षणव्यवस्थेकडे आता राहिलेली नाही. आधुनिक समाजात ज्यांच्या द्वारा शिक्षण देता येईल, अशी अनेक वेगवेगळी माध्यमे निर्माण झाली आहेत आणि त्यांचा उपयोग करून स्वतंत्रपणे विचार करण्याची सवय आणि कुवत, वैज्ञानिक वृत्ती, मानवतावादी दृष्टी आणि विधायक प्रवृत्ती ह्यांचा परिपोष करता येईल; परंतु माध्यमांच्या योगे मनाला विशिष्ट चाकोरीतच भ्रमण्याची सवय निर्माण करून अंधश्रद्धा बळकट करणे; वंश, जात, धर्म इत्यादिकांवर आधारलेली पूर्वग्रहदूषित विषमवृत्ती दृढ करणे; विध्वंसक मानसिक प्रवृत्ती निर्माण करणे; ह्या गोष्टी साधता येतात; ह्याची ही उदाहरणे आहेत. संशोधनाच्या योगे ज्ञानाच्या सीमांची वाढ करण्याचीही मक्तेदारी आता कोणत्याही अर्थी आकारिक शिक्षण व्यवस्थेकडे राहिलेली नाही. शिक्षणाची जी पुनर्रचना आपण करू पहातो, तो ह्या सर्व संस्था मिळून जे सामूहिक कार्य करतात आणि सामूहिक कार्यक्रम त्या संस्था पार पाडतात, त्यांचा केवळ एक भाग आहे." पारीख यांच्या शिक्षणविषयक चिंतनाचा हा सुंदर निष्कर्ष आहे. स्वातंत्र्यपूर्व काळातील प्रबोधनाच्या प्रेरणा मंदावलेल्या आहेत. त्या प्रेरणा प्रथम ब्रिटिश राजवटीने भारतात सुरू केलेल्या आधुनिक शिक्षणातून निर्माण झालेल्या होत्या. या प्रेरणांना जागृत करून व्यापक आणि खोल स्वरूप प्राप्त होण्याकरता भारतीय शिक्षणपद्धती पायापासून शिखरा-पर्यंत कशी बदलली पाहिजे, हे या लेखात पारीख यांनी व्यवस्थित रीतीने सूचित केले आहे. शिखर म्हणजे विद्यापीठे. त्यासंबंधी या अंकातील प्रा. अ. भि. शाह यांचा लेख उद्‌बोधक ठरेल.

अनुक्रमणिका

'आणीबाणी : कारणे आणि उपाय' या शीर्षकामध्ये वर्तमान भारतीय राजकारणाच्या आत्यंतिक पेचप्रसंगाचे सूत्ररूपाने निदान करून, त्यातून बाहेर पडण्याचा उपाय संक्षेपानेच पारीख यांनी सुचविलेला आहे. भारतात गेल्या मार्च महिन्यात लोकसभेच्या निवडणुका होऊन मतपेटीच्याद्वारे शांततामय क्रांती झाली आहे, असे म्हटले जाते; परंतु हा निव्वळ भ्रम आहे. अधिकारशाहीचा उदय झाला, तो काही सत्ताधारी व्यक्ती व एक सत्ताधारी पक्ष यांच्याच ध्येयभ्रष्टता, सत्तालोलुपता आणि स्वार्थी कारवाया व कारस्थाने यांच्यामुळे झाला, असे म्हटले जाते; परंतु ते सर्वांशी खरे नाही. अज्ञान आणि दारिद्र्य याने ग्रस्त असा प्रचंड मतदारवर्ग, परंपरागत अधिकारशाहीच्या तत्त्वांवर आधारलेली धार्मिक समाजरचना म्हणजे सामाजिक मागासलेपण त्याचप्रमाणे तुल्यबल व लोकशाही मूल्यांवर निष्ठा असलेल्या पर्यायी पक्षाचा अभाव इत्यादी अनेक कारणांमुळे अधिकारशाहीचा उदय झाला; हे ध्यानात घेतले तरच पुन: अधिकारशाही डोके वर काढणार नाही, अशा पद्धतीचा आर्थिक, शैक्षणिक आणि राजकीय कार्यक्रम निर्माण करून अंमलात आणणे शक्य होईल.

प्रा. चंद्रा दलाया आणि पारीख यांचे स्नेही थोर अर्थशास्त्रज्ञ प्रा. नी. वि. सोवनी यांच्या या अंकातील लेखांमध्ये पारीख यांचे भारताच्या संदर्भातील मूलगामी आर्थिक विचार व आर्थिक योजना यांची थोडक्यात मांडणी केलेली आहे. भारताचे श्रेष्ठ क्रांतिकारक एम्. एन्. रॉय यांच्या तत्त्वचिंतनाच्या अनुरोधाने पारीख यांनी अर्थशास्त्रीय चिंतन केलेले आहे. रॉय यांच्यापाशी रशियन साम्यवादी क्रांतीचा अनुभव आणि चिनी साम्यवादी क्रांतीचे क्रांतिपूर्व कालातील अनुभव यांचे संचित होते. या दोन्ही क्रांत्या मार्क्स–लेनिनवादाचा प्रत्यक्ष प्रयोग करणाऱ्या क्रांत्या होत. रॉय हे मार्क्सवादी होते; नवमानवतावादाची मार्क्सवादापुढे जाऊन त्यांनी मांडणी केली होती. मार्क्सवादाच्या पुढे ते गेले होते, तरी मार्क्सचा भौतिक विकासवाद व ऐतिहासिक विकासवाद त्यांनी अखेरपर्यंत सोडला नव्हता, असे फिलिप स्प्राट यांचे म्हणणे एका अर्थी खरे आहे; परंतु मार्क्सच्या ऐतिहातिक भौतिकवादाला त्यांनी एक वेगळा असा निश्चित आकार देऊन मांडणी केली होती. मार्क्स–लेनिनवादाला जगाच्या शेतीचा प्रश्न नीट रीतीने सोडविता आला नाही. शेतकरी हा वर्गच औद्योगिक संपूर्ण क्रांतीनंतर अस्तास जाईल, असे मार्क्स व एंगेल्स यांचे निदान होते. शेतीप्रधान प्रचंड राष्ट्रे आणि भौगोलिक प्रदेश ही समाजवादी ध्येयवादाच्या कक्षेत आली असता, शेतीही यांत्रिक कारखान्यांसारखाच विश्वव्यापी प्रचंड कारखाना होऊन शेतकरी हा कामगार वर्गात विलीन होईल; असे ह्या साम्यवादी तत्त्ववेत्त्यांचे भाकित होते. शेती हा यंत्रप्रधान प्रचंड कारखाना होऊन या कारखान्याची म्हणजेच कामगारांची उत्पादनशक्ती अनेक पटीने वाढेल, असे त्यांनी गृहीत धरले होते. साम्यवादी राष्ट्रांमध्ये याप्रमाणे निश्चित भाकित करण्यास अजून भरपूर पुरावा सापडत नाही. सगळे आर्थिक उत्पादक व्यवसाय सामाजिक मालकीचे करणारा नैतिक ध्येयवादच शेतीची खाजगी मालकी नष्ट करण्याच्या साम्यवादी दृष्टिकोनाच्या मुळाशी आहे. हा वैज्ञानिक दृष्टिकोन नाही, हे केवळ अद्भुत कल्पनारंजन आहे; ही गोष्ट एम्. एन्. रॉय यांनी पक्की ध्यानात घेऊन जगातील सगळ्यात मोठा उत्पादक व्यवसाय म्हणजे शेती होय, ह्या शेती व्यवसायाची, मार्क्सवादी समुदायमालकीचा दृष्टिकोन बाजूला केल्याशिवाय व्यवस्थित मीमांसा होऊ शकत नाही, हे रॉय यांनी ओळखले. म्हणून 'कसेल त्याची जमीन' हे व्यक्तिवादी तत्त्व गृहीत धरून लोकयोजना किंवा जनता योजना आखणाऱ्या आपल्या सहकाऱ्यांना त्यांनी मार्गदर्शन केले आणि शेतकीप्रधान देशांच्या लोकशाहीला समाजवादी आकार ज्या योगाने प्राप्त होईल, अशा प्रकारची योजना आखण्यात आली. समाजवादाच्या व्याख्या पुष्कळच आहेत. डाव्या व उजव्या हुकूमशाही राजवटीसुद्धा स्वत:ची राज्यव्यवस्था व आर्थिक व्यवस्था समाजवादीच आहे, असा पुकारा करतात; त्यामुळे 'समाजवाद' हा शब्द अर्थशून्य बनत चालला आहे. परंतु समाजवादाच्या निश्चित दोन व्याख्या

अनुक्रमणिका

अशा आहेत, की त्यांच्यामुळे समाजवाद म्हणजे काय, हे नीट शमजू शकते. एक ध्येयरूप व्याख्या आणि दुसरी साधनरूप व्याख्या. माणसाने माणसाचे चालविलेले शोषण ज्या समाजव्यवस्थेत बंद होऊन शोष्य आणि शोषकवर्ग हा भेद नाहीसा होतो आणि सत्ताधारी वर्ग व सत्ताधाऱ्यांचे हुकूम पाळणारा वर्ग ज्यामध्ये राहात नाही, अशी समाजव्यवस्था समाजवादी व्यवस्था होय. दुसरी साधनरूप मार्क्सप्रणीत व्याख्या होय. ती अशी : सामुदायिक उत्पादनाची सर्व साधने ही ज्या समाजव्यवस्थेत समाजाच्या मालकीची होतात, ती समाजव्यवस्थाही समाजवादी समाजव्यवस्था होय. रॉय यांनी पहिली ध्येयरूप व्याख्या प्रमाण मानली आणि त्याच व्याख्येच्या अनुरोधाने पहिली जनता योजना तयार करण्यात आली. या जनता योजनेमध्ये सांपत्तिक विषमता नष्ट होते आणि व्यक्तिस्वातंत्र्य हे लोकशाहीचे तत्त्व अबाधित राहते. व्यक्तिस्वातंत्र्य जेथे अबाधित रहात नाही, तेथे तथाकथित कामगारक्रांतीमध्येसुद्धा शासकवर्ग आणि शासित वर्ग हा भेद कायम राहतो. हा भेद नष्ट करण्याकरिता जनता योजनेला कार्यवाहीत आणणारी मूलगामी लोकशाहीची रचना आवश्यक ठरते आणि हाच श्री. जयप्रकाश नारायण यांनी उद्घोषित केलेल्या संपूर्ण क्रांतीचा मार्ग होय; दुसरा कोणताही नाही.

---

## थोर संगीतकारास श्रद्धांजली

ज्येष्ठ नामवंत संगीतकार केशवराव भोळे यांचे पुणे येथे दिनांक नऊ नोव्हेंबर रोजी दुःखद निधन झाले. त्यांच्या निधनाने संगीत–साहित्य क्षेत्रात दुःखाची छाया पसरली आहे. 'नवभारत' त्या दुःखात सहभागी आहे.

कै. केशवराव भोळे हे जुन्या पिढीतील एक अग्रगण्य संगीतदिग्दर्शक. मराठी चित्रपट-सृष्टीच्या सुवर्णयुगात शांतारामबापूंच्या 'प्रभात'सारख्या मातब्बर चित्रपटसंस्थेमध्ये ते संगीत-दिग्दर्शक होते. 'अमृतमंथन', 'संत तुकाराम', 'कुंकू,' 'संत ज्ञानेश्वर', 'दहा वाजतां', 'रामशास्त्री' अशा 'प्रभात'च्या उत्तमोत्तम चित्रपटांतील त्यांची गाणी तदानुषंगिक प्रसंग व भावना यांना परिपोषक, साध्या, सुबक, लयबद्ध व गोड चालींमुळे लोकप्रिय ठरली. 'कुंकू'सारख्या चित्रपटातील पार्श्वसंगीतही वैशिष्टयपूर्ण होते. नाटयसंगीतातही त्यांनी आपल्या ललित व भावमधुर चालींचा वारसा मागे ठेवला. 'नाटयमन्वंतर'च्या 'आंधळयांची शाळा'चे संगीतदिग्दर्शन हे त्याचे ठळक उदाहरण. भोळे हे उत्कृष्ट भावगीतगायकही होते. ललित सुगम संगीत आकाशवाणी-वर व त्याद्वारे महाराष्ट्रभर लोकप्रिय करण्यात त्यांचा फार मोठा वाटा होता. आकाशवाणी केंद्रावर ते काही काळ प्रोडयूसरही होते. नाटयगीते व भावगीते लोकप्रिय करण्यात त्यांना त्यांच्या धर्मपत्नी ज्योत्स्ना भोळे यांच्या सुमधुर कंठाचीही साथ लाभली. भोळे यांनी संगीतावर ललित व शास्त्रीय स्वरूपाचे विपुल व दर्जेदार लेखनही केले आहे : 'आजचे प्रसिद्ध गायक.' (१९३३), 'आवाजाची दुनिया' (१९४८), 'संगीताचे मानकरी' (१९४९); 'आजचे प्रसिद्ध गायक'ची सुधारित व विस्तारित आवृत्ती, 'अस्ताई' (१९६२; शासन पुरस्कारप्राप्त), 'वसंतकाकांची पत्रे' (१९६४) व 'माझे संगीत : रचना आणि दिग्दर्शन' (१९६४) ही त्यांची मौलिक ग्रंथसंपदा.

संगीतात व साहित्यात लालित्य निर्माण करणाऱ्या या कलावंताच्या व्यक्तिमत्त्वातच लालित्य होते. अभिजात, सुसंस्कृत, संयत, प्रगल्भ, खानदानी व शिस्तप्रेमी असे हे व्यक्तित्त्मव होते. अशा या थोर संगीतकाराच्या सुगम संगीतपरंपरेचे व ग्रंथविचारांचे जतन व जोपासना हीच त्यांना खरी श्रद्धांजली ठरावी.

अनुक्रमणिका

## लेखक परिचय :

**रवींद्र सबनीस :** अर्थशास्त्राचे प्राध्यापक, मिठीबाई कॉलेज, मुंबई व सेंटर फॉर द स्टडी ऑफ सोशल चेंज या संस्थेचे कार्यवाह.

**तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी :** विद्वान, विचारवंत, लेखक व विश्वकोशाचे प्रमुख संपादक.

**चंद्रा दलाया :** सदस्य, सेंटर फॉर दी स्टडी ऑफ सोशल चेंज, मुंबई.

**गोविंद तळवलकर :** संपादक 'महाराष्ट्र टाइम्स'.

**नी. वि. सोवनी :** भूतपूर्व सहसंचालक, गोखले अर्थविज्ञान संस्था, पुणे.

**अ. भि. शहा :** संपादक, 'न्यू क्वेस्ट' पुणे.

**मे. पुं. रेगे :** तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक, कीर्ती कॉलेज, मुंबई, विचारवंत व लेखक.

---

### निवेदन

[ 'नवभारत' मासिकाचा यापुढील अंक "जानेवारी–फेब्रुवारी १९७८" असा जोड अंक १ फेब्रुवारीस प्रसिद्ध होईल.

का. सं. ]

अनुक्रमणिका

रवींद्र सबनीस

# प्रा. गोवर्धन पारीख : व्यक्तिमत्त्वाचे काही पैलू

प्रा. गोवर्धन पारीखांना जाऊन आता पुरते एक वर्ष झाले आहे. एक वर्षाचा काळ तसा फारसा प्रदीर्घ नाही. एखाद्या दिवंगत व्यक्तीच्या कार्याचे समतोल, अलिप्तपणे मूल्यमापन करण्याच्या दृष्टीने तो पुरेसा नाही. पारीखांना जवळून पहाणाऱ्या आणि त्यांच्या कार्याशी थोड्याफार प्रमाणात गुंतलेल्या व्यक्तींनी तर या मूल्यमापनाच्या कार्यात पडू नये. तरीही अशा व्यक्तींनी एक कार्य करावयाचे असते. ते म्हणजे भावी चरित्रकाराला व अन्य अभ्यासकांना अशा व्यक्तींबद्दल त्यांना वाटणारा महत्त्वाचा तपशील पुरविणे. या भूमिकेवरूनच प्रा. पारीखांविषयी मला उमगलेल्या काही गोष्टींचा उहापोह करण्याचे योजिले आहे.

कित्येक व्यक्तींच्या बाबतीत त्यांच्या कामगिरीची थोरवी त्या व्यक्ती कार्यरत असताना लक्षात येत नाही. किंबहुना त्या एखादे कार्य करीत असताना त्यांच्याबद्दल एक प्रकारची असूया व गैरसमज कळत नकळत प्रसृत होत असतात. प्रा. पारीखांच्या बाबतीत ही गोष्ट सातत्याने घडत आली. पहिल्या 'लोकयोजने'चे ( People's plan ) शिल्पकार प्रा. पारीख होते. या योजनेत समाविष्ट असलेली आर्थिक नियोजन विषयीची भूमिका किती महत्त्वाची होती हे अभ्यासूंना भारताच्या दुसऱ्या पंचवार्षिक योजनेने निर्माण केलेल्या समस्या अनुभवल्यानंतर कळले. प्रा. पारीख हे अत्यंत विद्यार्थिप्रिय प्राध्यापक होते; परंतु ते चिंतनशील प्राध्यापक म्हणून केवढ्या उंचीचे होते ते त्यांनी प्राध्यापकी सोडल्यानंतर शिक्षणक्षेत्रातील व्यक्तींना उमगले. मुंबई विद्यापीठाचे कुलमंत्री ( Rector ) असताना त्यांच्या उत्तम प्रशासकीय व धोरणविषयक कामगिरीचे महत्त्व विद्वज्जनांना लक्षातच आले नाही. नव्हे, पारीखांबद्दल कमालीचे आणि आत्यंतिक गैरसमज पसरत गेले, पसरविण्यात आले. दहा वर्षाच्या कालावधीनंतर त्यांनी कुलमंत्रिपद सोडले आणि मुंबई विद्यापीठाची सर्व दिशांनी अशी काही झपाट्याने अवनती होत गेली आणि आजही होत आहे, की शिक्षक आणि विद्यार्थी दिङमूढ होऊन गेले. महाविद्यालयीन व विद्यापीठातील शिक्षकांना पारीखांच्या जाण्याने आपला एक हितरक्षक गेला हे कळून चुकले. पण केव्हा ? ते निघून गेल्यानंतर. पारीख हे किती कार्यक्षम प्रशासक, सल्लागार व उत्प्रेरक होते हे त्यांच्या निधनानंतरच्या एक वर्षाच्या काळात अनेक संस्थाना व व्यक्तींना हळूहळू अनुभवास येऊ लागले आहे.

अशा या कर्तबगार व्यक्तीची जडणघडण कशी होत गेली याचा मागोवा घेणे हे त्यांच्या भावी चरित्रकाराचे कार्य आहे. ही कामगिरी सोपी नाही. कारण पारीखांच्या व्यक्तिमत्त्वात काही विलक्षण आणि परस्परविरोधी घटकांचे मिश्रण झाले होते. वरकरणी काहीसा कठोर, भावनाशून्य वाटणारा हा माणूस अंतर्यामी अतिशय मृदु आणि अत्यंत संवेदनाक्षम होता हे फार थोड्यांना माहीत आहे. तर्कनिष्ठतेशी कधीही तडजोड न करता, मूलभूत तत्त्वांना मुरड न घालता व्यवहारात सामंजस्य कसे निर्माण करावे याचे असामान्य कौशल्य पारीखांनी अवगत केले होते. कोणाचाही मुलाहिजा न ठेवता वा परखड टीका करूनही पारीखांनी विविध क्षेत्रांतील, विविध व्यवसायांतील माणसांशी आपले जिव्हाळ्याचे संबंध कायम ठेवले होते. हे सर्व करीत असताना ते कोणाच्याही वळचणीला आश्रयासाठी उभे राहिले नाहीत. पारीख मला मोठे वाटले ते या त्यांच्या गुणांमुळे.

**लहानपण**

पन्नास वर्षांपूर्वी पारीख दहा वर्षांचे असताना पुढेमागे हा एका मारवाडी किराणा व्यापाऱ्याचा

मुलगा शिक्षणक्षेत्रात नाव मिळवील व विचारवंत म्हणून ख्याती पावेल असे कोणी भविष्य वर्तविले असते तर त्याला वेडयातच काढावे लागले असते. मालेगावसारख्या आडवळणी आणि त्यावेळी बुरसटलेल्या अशा ग्रामीण (?) नगरात जन्मलेल्या या मुलाने फार तर एक सधन व्यापारी वा सावकार म्हणून नाव मिळविले असते. पारीखांची कौटुंबिक पार्श्वभूमीच तशी होती. आईवडिलांचा हा एकुलता एक मुलगा पाठीमागे चार बहिणी घेऊन आला आणि वयाच्या बाराव्या वर्षी मातृसुखास मुकला. अत्यंत कर्मठ, रूढिप्रिय वैष्णव कुटुंबात या मुलापुढे काय वाढले आहे हे उघडच होते. थोडीफार मिळाली ती आजीची- वडिलांच्या आईची- माया. पण ते छत्र फार कठोर होते. प्राथमिक शिक्षण मालेगावला सुरू झाले व त्यानंतर जुन्नरला पुढील शिक्षणासाठी प्रयाण केले. इथून हालअपेष्टांना, मानहानीला जी सुरुवात झाली ती पारीखांना १९४० मध्ये मुंबईत येईपर्यंत सहन करावी लागली.

जुन्नरला पारीखांच्या आयुष्याची खरे म्हणजे इतिश्रीच व्हावयाची. पण तसे झाले नाही. याचे एकमेव कारण म्हणजे पारीखांची जिद्द. मालेगावला असतानाच सातव्या वर्षी वडिलांनी आपल्या परिचयाच्या कुटुंबातील मुलीशी पारीखांचा वाङ्निश्चय करून टाकला आणि भावी आयुष्यातील आत्मक्लेशाची, मनस्तापाची पुरेपूर सोय करून ठेवली. किराणा मालाच्या दुकानात सकाळ-संध्याकाळ काम करावे व शक्य तेव्हा शाळेत जावे, वेळ मिळालाच तर अभ्यास करावा असे जीवन सुरू झाले. पारीख अनेकदा गंमतीने सांगत असत की त्या काळात त्यांनी पुडचा बांधण्यात असाधारण कौशल्य मिळविले होते. गिऱ्हाइके पारीखांनी बांधलेल्या पुडयांवर खूष असत आणि पारीखांनाही आपण काही तरी अलौकिक करतो आहोत याचे समाधान मिळून ते स्वतःवरच खूष असत. सुदैव असे, की हा मुलगा पुढे पुडचा बांधण्यात मश्गूल राहिला नाही. शीघ्रकोपी वडिलांचा विरोध असतानाही त्यांनी आपले शालेय शिक्षण नेटाने चालू ठेवले. उत्तम शरीरप्रकृती असल्यामुळेच दुकानातील काम आणि शिक्षणाबद्दलचा वडिलांचा विरोधी सूर यांचा अडसर असूनही पारीखांनी शालेय परीक्षांत आपला क्रमांक नेहमीच वर ठेवला. वाचनाची आवड आणि अभ्यासू वृत्ती यांमुळे जुन्नरच्या शाळेतील शिक्षकांत ते एक आवडते विद्यार्थी झाले. किणीकर गुरुजींनी पारीखांना विशेष प्रोत्साहन दिले. किंबहुना किणीकरांनी पारीखांच्या शिक्षणात रस घेतला नसता, त्यांना प्रोत्साहन दिले नसते तर पारीखांचे शिक्षण मॅट्रिकनंतर संपुष्टात येऊन पारीख उच्च शिक्षणास कायमचे मुकले असते. पारीखांना किणीकरांबद्दल अमाप कृतज्ञता वाटत असे ती यामुळेच. पारीखांचे जुन्नरातील शालेय शिक्षण त्यांना मिळालेल्या वर्गमित्रांमुळेही चालू राहिले व काहीसे सुसह्यही झाले. या वर्गमित्रांत प्रामुख्याने भास्करराव साठे, भवाळकर व गोपाळराव वैद्य यांचा त्यांना मोलाचा सहवास लाभला व त्यांची शालेय मैत्री पारीखांच्या मृत्यूपर्यंत अतूट अशीच राहिली.

## पुण्याला प्रस्थान

१९३३ साली मॅट्रिक झाल्यानंतर खरे म्हणजे पारीखांचे शिक्षण संपुष्टात यायचे- वडील शिक्षणाविरुद्धच होते. त्यांनी आपल्या चारही मुलींना जवळजवळ निरक्षरच ठेवले. अल्पवयात त्यांचे विवाह करून देऊन ते मुलींच्या बाबतीतील आपल्या जबाबदारीतून मोकळे झाले होते. शिक्षणावरील खर्च ही केवळ उधळपट्टी असेच त्यांचे मत होते. तेव्हा आपल्या एकमेव चिरंजिवाने मॅट्रिक झाल्यानंतर नोकरीधंदा करावा व संसार थाटून जुन्नरात रहावे हा त्यांचा विचार पक्का होता. जुन्नरात उच्च शिक्षणाची सोय नसल्यामुळे पुण्याला प्रस्थान ठोकण्यावाचून गत्यंतर नव्हते. पुण्याला रहावयाचे म्हणजे पैशाचा प्रश्न आलाच. वडिलांचा पाठिंबा मिळणे जवळजवळ अशक्य. तरीही पारीखांनी जुन्नर सोडून पुण्याला जायचे नक्की केले. किणीकरांचे सक्रीय प्रोत्साहन होतेच. वडिलही शेवटी तयार झाले. पुण्यात पारीखांची ना ओळख ना देख. उतरण्यापासूनचा प्रश्न. वडिलांनी पुण्यातील आपल्या ओळखीच्या एका अडत्याला चिठ्ठी दिली. पण त्याचा पारीखांना काहीही उपयोग झाला नाही. नशिबाने थोडा हात दिला. पुण्यातील मारवाडी विद्यार्थिगृहात रहाण्याची व जेवण्याची सोय झाली. फर्ग्युसन महाविद्यालयात प्रवेश मिळाला. वडिलांनीही थोडी

अनुक्रमणिका







माया दाखवली. थोडेफार अर्थसाहाय्य करण्याचे कबूल केले. मित्रमंडळी मिळू लागली. यातच आर. जी. काब्रा ऊर्फ 'गुरुजी', प्रा. नी. वि. सोवनी, बापूसाहेब शिखरे, आजचे न्यायमूर्ती श्री. ए. आर. शिंपी यांसारख्या पारीखांच्या जीवश्च-कण्ठश्च मित्रांचा समावेश होता. पुण्यातील हा सुरवातीचा काळ सुखाचा गेला. पण हे सुख फार काळ लाभले नाही. पहिले वर्ष पुरे झाल्याबरोबर सातव्या वर्षी वाङ्‌निश्चय झालेल्या मुलीबरोबर विवाह करण्याचा आदेश जुन्नरहून आला. अन्यथा अर्थसाहाय्य बंद होऊन शिक्षण व उपजीविका स्वतःची स्वतः करावी असा पर्याय देण्यात आला. पारीखांच्या जीवनातील एका मोठ्या पेचप्रसंगाला सुरुवात झाली. वडिलांच्या अल्प का होईना अर्थसाहाय्यावाचून शिक्षण चालू ठेवणे शक्य नव्हते. वाङ्‌निश्चय झाला असल्यामुळे कायदेशीर नाही तरी समाजप्रथेतून निर्माण झालेली अनिवार्य अशी नैतिक जबाबदारी येऊन पडलीच होती. ती टाळता येणे शक्य नव्हते. मुलीचे आईबाप दहा वर्षे थांबले होते. वडिलांनी शब्द दिलेला होता. निरक्षर, अडाणीच म्हणा ना, अशा मुलीशी विवाह करणे म्हणजे आपल्या पुढील आयुष्याची, स्वप्नांची राखरांगोळी करणे हे अगदी उघड होते. वडिलांना विनंती करून पाहिले. 'तुम्ही माझे पंखच कापता आहात' अशा शब्दांत लिहिले. पण काही उपयोग झाला नाही. आत्महत्येचा विचारही डोकावला पण तो भ्याडपणा ठरला असता. वडिलांनी दिलेला शब्द पारीखांनी पाळला. खऱ्या अर्थाने तो विवाह नव्हताच. पुण्यात रहाण्यास व शिक्षण घेण्यास या मुलीने स्पष्ट नकार दिला. या पत्नीशी पारीखांचा संसार असा झालाच नाही. मात्र या विवाहाचे जबरदस्त मानसिक दडपण पारीखांना पुण्यातील आपल्या उर्वरित वास्तव्यात सहन करावे लागले. इतके की (डॉ.) इन्दुमती पारीख यांच्याशी विवाह झाल्यानंतर पारीखांना निदान मनःस्वास्थ्या-साठी तरी पुणे सोडणे अनिवार्य झाले. आपल्या दुसऱ्या विवाहानंतरही पारीखांनी आपल्या प्रथम पत्नीला अर्थसाहाय्य देण्याचे, शिक्षण देण्याचे, त्यासाठी पुण्यात वसतिगृहात ठेवण्याचे सर्वतोपरी प्रयत्न केले. परंतु ते सर्व निष्फळ ठरले. तिने पुण्यात येऊन रहाण्यास पुन्हा स्पष्ट नकार दिला.

मानसिक त्रासातून उद्भवलेला अनेमिया, पैशाची सदैव चणचण, वडिलांनी चालवलेला दुस्वास आणि लादलेला विवाह यांचा मानसिक ताण सहन करण्याइतकी शक्ती पारीखांत नव्हती. मानसिक ताण असह्य झाला की मनुष्य एक तर आपल्या मायेच्या माणसाकडे वळतो किंवा व्यसनाधीन होतो. पारीखांना मायेचे नात्यातले असे कोणी नव्हतेच. परिणामी धूम्रपान व प्रसंगोपात्त मद्यपान यांच्या आहारी पारीख हळूहळू जाऊ लागले. पुण्यातील पारीखांच्या जीवनात फर्ग्युसन कॉलेज व तेथील मित्रमैत्रिणी, वादविवाद, थोरामोठ्यांची भाषणे, ग्रंथसंग्रहालये ही तेवढी विरंगुळ्याची स्थाने होती. कौटुंबिक जीवन हे निराशा आणि तणाव यांनी परिपूर्ण असेच होते.

## राजकीय विचारप्रणाली

पारीखांच्या शैक्षणिक जीवनात पुण्याचा जेवढा महत्त्वाचा वाटा तेवढाच त्यांच्या राजकीय विचारांच्या जडणघडणीतही होता. पुण्याला येण्या-पूर्वी व पुण्यातील सुरुवातीच्या काळात ते बरेचसे आत्यंतिक राष्ट्रवादी व हिंदुत्ववादी असावेत असा तर्क करण्यास सबळ पुरावा आहे. उपलब्ध माहिती-नुसार ते अगदी तरुण वयातच पाचलेगावकर महाराजांच्या विचारसरणीकडे व विधायक कार्य-क्रमाकडे आकर्षित झाले होते असे दिसते. वैज्ञानिक-दृष्ट्या तर्कसंगत असेल तेच स्वीकारावे या विचाराची शिकवण सुरुवातीच्या काळात पाचले-गावकर महाराजांच्या विचारातून त्यांनी घेतली असावी. परंतु पुढे महाविद्यालयीन शिक्षण सुरू झाल्यानंतर आणि पुण्यातील विविध राजकीय पक्षांच्या विचारसरणीवरील टीकाप्रतिटीका, चर्चा आणि विचारमंथनातून आपली स्वतःची अशी एक निश्चित राजकीय मतप्रणाली आणि भूमिका ते घेऊ लागले. या संदर्भात विद्यार्थिदशेतच १९३५ च्या भारतसरकारच्या कायद्यावरील त्यांनी गाजव-लेल्या—म्हणजे जिंकलेल्या—वादविवादाचे उदाहरण देता येईल.

प्रा. ओतुरकरांच्या सांगण्याप्रमाणे हा वादविवाद फर्ग्युसन कॉलेजच्या सभागृहात विद्यार्थी आणि प्राध्यापक या दोन पक्षांत झाला आणि पारीखांनी

आपल्या अमोघ वक्तृत्वाने व मुद्देसूद विचाराने प्राध्यापकांची बाजू जमीनदोस्त केली. १९३५ च्या कायद्यावरील पारीखांनी मांडलेले विचार हे त्यांचे स्वतंत्र विचार होते. या वादविवादाने प्रा. पारीखांना पुण्याच्या वैचारिक जीवनात एक स्वतंत्र स्थान प्राप्त झाले आणि ते त्यांनी शेवटपर्यंत टिकविले. १९३६ पर्यंत तरी पारीख आणि त्यांचे सहाध्यायी स्नेही काँग्रेसकडे आणि विशेषकरून काँग्रेसमधील नेहरू गटाकडे सहानुभूतीने पहात होते असे दिसते. काँग्रेसान्तर्गत समाजवादी गटाची स्थापना यापूर्वीच झाली होती. या गटाच्या विचारसरणीचे आकर्षण पुण्यातील तत्कालीन तरुण विद्यार्थ्यांना होते. मार्क्सच्या साम्यवादी राजकीय व आर्थिक विश्लेषणावर वादविवाद, बौद्धिके पुण्यात सातत्याने होत होती. एस्. एम्., ना. ग. गोरे, अच्युतराव, अशोक मेहता, मेहर अली यांसारख्या मंडळींनी आपल्याभोवती तरुणांचा समुदाय हळू हळू गोळा करावयास सुरुवात केली होती. परंतु पारीखांवर या मंडळींचा फारसा प्रभाव पडलाच नाही. रशियामध्ये साम्यवादी क्रांतीनंतर राजकीय व आर्थिक क्षेत्रात जे काही घडत होते त्याचे पारीख आणि समविचारी युवक अलिप्तपणे विश्लेषण करीत होते. परिणामी पोथीनिष्ठ समाजवाद व त्याची राजकीय फलश्रुति यांबद्दल पारीखांचे विचार पक्के होत गेले. पोथीनिष्ठ समाजवादी विचारसरणी व राजकारण यांपासून भारतातील जनतेने चार हात दूर राहिले पाहिजे ही भूमिका निश्चित झाली आणि पारीख अखेरपर्यंत या भूमिकेला चिकटून राहिले.

१९३७ मधील फैझपूर येथील काँग्रेस अधिवेशन हे पारीखांच्या राजकीय विचारसरणीत परिवर्तन घडवून आणणारे ठरले. फैझपूरला ते प्रथमतः मानवेंद्रनाथ रॉय यांच्या सान्निध्यात आले. याच अधिवेशनात रॉय यांनी काँग्रेसमध्ये रहाणे अशक्य आहे हे ओळखले. गांधीजींनीही अप्रत्यक्षपणे रॉयवादी विचारसरणीच्या मंडळींना काँग्रेसमध्ये स्थान नसल्याचे सूचित केले. परंतु काँग्रेसला आतून सुधारण्याची आशा वाटत असल्यामुळे रॉय यांनी लीग ऑफ रॅडिकल काँग्रेसमेन स्थापन केली. परंतु १९३९ साली सुरू झालेल्या दुसऱ्या महायुद्धाबाबत झालेल्या मतभेदांमुळे रॉय यांचे सहकारी काँग्रेसमधून बाहेर पडले. पारीख या मंडळींत होते. काँग्रेसला सुधारणे अशक्य आहे ही भूमिका दृढ झाली. पारीखांची ही भूमिका रॅडिकल ह्यूमनिस्ट पक्ष विसर्जित झाल्यानंतरही कायम राहिली.

स्वातंत्र्योत्तरकाळात नवमानवतावादाची विचारप्रणाली प्रा. पारीखांनी हिरिरीने मांडली. ही विचारसरणी पारीखांच्या एकूण वैचारिक बैठकीशी सुसंगत होती. राजकीय स्थित्यंतरानंतर घडून आलेल्या उलथापालथीचा अनुभव ताजा होता. काँग्रेसपक्षांतर्गत वैचारिक एकजिनसीपणा नव्हताच. एकजुटीचा देखावा होता तो केवळ सत्तालोलुपतेमुळे व संधिसाधुपणामुळे. काँग्रेसच्या वरिष्ठ नेत्यांचे धरसोडपणाचे व गोंधळात टाकणारे धोरण व अकार्यक्षम अंमलबजावणी यांमुळे या देशाच्या भवितव्यात काय वाढून ठेवले आहे याची सुस्पष्ट कल्पना पारीखांना व अन्य रॉयवाद्यांना होती. लोकशाहीत राजकीय पक्ष व पक्षीय राजकारण यांना महत्त्वाचे स्थान असले तरी, भारताच्या पार्श्वभूमीवर जे काही घडत होते त्याच्या संदर्भात एकपक्षीय लोकशाहीचे अनिष्ट परिणाम, पक्षांतर्गत लाथाळ्या, व्यक्तिस्तोम यांचे अमाप पीक येणार असे त्यांचे भाकीत होते. आपण या बाबतीत संघटित राहून काहीही करू शकत नाही याची वास्तव कल्पनाही त्यांना होती. याउलट पक्ष विसर्जित केल्याने संघटनेचे दडपण नाहीसे होऊन नवमानवतावादाचा संदेश आपल्याला अधिक प्रभावी करता येईल आणि त्याबरोबरच पक्षीय राजकारणाचे भारताच्या संदर्भातील धोके स्पष्ट करता येतील असे त्यांचे प्रामाणिक मत होते. सर्वसाधारणपणे या भूमिकेशीही प्रा. पारीख सहमत होते.

## मुंबई विद्यापीठाचे कुलमंत्री

१९५८ मध्ये पारीख मुंबई विद्यापीठाचे दुसरे व अखेरचे कुलमंत्री झाले. या पदावर दहा वर्षे राहून ते निवृत्त झाले. पारीखांची ही दहा वर्षांची कारकीर्द अनेक कारणांनी गाजली. हे पद स्वीकारण्यापूर्वी पारीख हे मुंबई विद्यापीठाच्या अधिसभेचे अनेक वर्षे सदस्य होते. कुलमंत्री होण्यापूर्वी ते कलाशाखेचे अधिष्ठातेही होते अनेक समित्यावर

त्यांनी भरीव कामगिरी केली होती. म्हणजेच कुलमंत्री होण्यापूर्वी मुंबई विद्यापीठाच्या कार्यशीलतेची त्यांना संपूर्ण कल्पना होती. त्यामुळे विद्यापीठाचे कुलमंत्री झाल्यावरोबरच त्यांचा आपोआपच एक दरारा निर्माण झाला. विद्यापीठाच्या कार्यशीलतेत त्यांनी शिस्त आणि चैतन्यही आणले. खाजगी महाविद्यालये व त्यांचे व्यवस्थापन यांनाही एक नवी शिस्त लावली. विद्यापीठाच्या भावी प्रगतीला योग्य ती दिशा लावून दिली. हे सर्व करत असताना विद्यापीठ हे प्रथमत: विद्यार्थी, शिक्षक, विचारवंत, संशोधक यांचे व्यासपीठ आहे याची जाणीव ठेवली ! समाजप्रवोधनाचेही कार्य विद्यापीठाने करावयाचे असते ही गोष्टही त्यांनी दृष्टिआड केली नाही. नव्या विद्याशाखा सुरू करणे, ग्रंथालये सुधारणे, चर्चा, परिसंवाद, प्रशिक्षण यांद्वारे महाविद्यालयीन शिक्षणाचा दर्जा सुधारणे, संशोधक व संशोधन याना प्रोत्साहन देणे, विद्यापीठीय शिक्षक आणि व्यावसायिक यांच्यात विचारांची देवाणघेवाण व संवाद साधणे यांसाठी त्यांनी अनेकविध योजना कार्यान्वित केल्या. मुंबई विद्यापीठाच्या विद्यानगरी येथील नव्या वसाहतीचा त्यांनी फार विचारपूर्वक व तपशीलवार आराखडा बनविला होता. त्यासाठी त्यांनी देशातील व परदेशातील कित्येक विद्यापीठांच्या संरचनेचा बारकाईने अभ्यास केला. वास्तुशास्त्राचीही तोंडओळख करून घेतली. भविष्यात कोणकोणत्या विद्याशाखा नव्याने सुरू होतील, जुन्यांचा विस्तार कसा होईल याचा खोलवर विचार करून विद्यानगरीतील नियोजित इमारतींच्या बांधकामासाठी एक सविस्तर टिपणही त्यांनी तयार केले. पारीखांच्या आकस्मिक निवृत्तीने यांतील कित्येक योजना एक तर अपुऱ्या राहिल्या किंवा पूर्णतया धुळीस मिळाल्या. पारीख कुलमंत्री असताना मुंबई विद्यापीठाची शैक्षणिक स्वायत्तता अबाधित राहिली. शासनालाही विद्यापीठाच्या कारभारात ढवळाढवळ करण्याला अवसर मिळाला नाही. प्रा. पारीख निवृत्त झाले आणि विद्यापीठाची विश्वासार्हता उत्तरोत्तर अस्तंगत झाली आणि स्वायत्तता संपुष्टात येऊ लागली.

प्रा. पारीखांनी मुंबई विद्यापीठाच्या व्यवहारात स्वत:ला इतके गुंतवून घेतले आणि भावी काळातील योजनांशी ते इतके समरस झाले की विद्यापीठ आणि पारीख यांच्यामध्ये एक भावनात्मक दुवा प्रस्थापित झाला. हे अपरिहार्य होते कारण प्रा. पारीखांनी विद्यापीठाच्या कार्यात आपले सर्वस्व ओतले होते. परंतु नवे कुलगुरु गजेंद्रगडकर आणि कुलमंत्री पारीख यांचे संबंध दुरावले आणि दिवसेंदिवस ध्येयधोरणातील त्यांचे मतभेद व तणाव वाढू लागले तेव्हा पारीखांना विद्यापीठ सोडणे हा एकच पर्याय शिल्लक राहिला. पारीखांनी आपल्या अन्त:करणात मुंबई विद्यापीठाला एक अनन्यसाधारण स्थान दिले. वुद्धिवाद्याने हे असे करणे कितपत उचित हा वादाचा विषय आहे. तसे करू नये असे पारीख म्हणत असतही. पण नेमके होऊ नये तेच घडले; पारीख विद्यापीठातून आपण होऊन बाहेर पडले परंतु कुठेतरी खोलवर जखम करून घेऊन. ही जखम पुढे कधीच बुझली नाही. पारीखांच्या जाण्याने त्यांचे स्वत:चे काहीच नुकसान झाले नाही पण विद्यापीठाने बरेच काही मोलाचे असे गमावले.

## अखेरची आठ वर्षे

विद्यापीठातून बाहेर पडल्यानंतर पारीखांनी ग्रंथवाचन, चिंतन, लेखन, समाजप्रबोधन या कार्यास वाहून घेतले. खरे पहाता पारीखांचे आवडते क्षेत्र तेच होते. फुले, आगरकर, लोकहितवादी आणि राजर्षि शाहू यांच्या चरित्रांची व विचारांची नव्याने छाननी करून त्यांच्या विचारांचे पुनर्मूल्यमापन करण्याची मौलिक कामगिरी पारीखांनी आपल्या अखेरच्या आठ वर्षांत केली. हे मूल्यमापन प्रसंगी वादग्रस्तही ठरले पण त्याचे महत्त्व कोणीच नाकारले नाही. स्वत:ला कार्यमग्न ठेवण्यासाठी पारीखांनी काही संस्थांच्या संचालकपदाच्या जबाबदाऱ्या स्वीकारल्या, महाराष्ट्र सहकारी मुद्रणालय, पुणे ही संस्था म्हणजे पारीखांनी पुढाकार घेऊन अल्पावधीत साकार केलेला व यशस्वी झालेला अभिनव प्रयोग असे म्हणता येईल. इतरही संस्थांचे कारभार त्यांनी सांभाळले. पण उत्तरोत्तर प्रकृती नीट राहीनाशी झाली. शरीर साथ देईनासे झाले की निराशा

दाटू लागते. कित्येक संकल्प व योजना आहेत पण आपण काही करू शकत नाही ही मानसिक अवस्था दारुण असते. पारीखांना अखेरच्या पाच वर्षांत या अवस्थेला सतत तोंड द्यावे लागले. पंचाहत्तरच्या जून नंतर या देशाच्या राजकीय मंचावर जे काही घडले त्यामुळे तर ते अत्यंत अस्वस्थ आणि बेचैन होते. या परिस्थितीशी आपण मुकाबला करू शकत नाही, आपण अगतिक आहोत या जाणिवेने त्यांचा किती कोंडमारा झाला होता तो त्यांच्या निकटवर्तीयांनाच ठाऊक परंतु परिस्थितीच अशी होती की कोणीही पारीखांसाठी कांही करू शकत नव्हता. पारीखांचे गेल्या डिसेंबरमधील आकस्मिक निधन हे विद्यापीठात झालेली जखम, समाजाने केलेली उपेक्षा व आणीबाणीने केलेला कोंडमारा यांचा परिपाक होता. पारीखांचे निधन ही अलीकडील काळात घडलेली फार मोठी शोकान्तिकाच म्हणावी लागेल.












**तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी**

# माझे थोर मित्र गोवर्धनदास पारीख

कै. प्रा. गोवर्धनदास पारीख यांची माझी भेट १९३७ मध्ये मे किंवा जूनच्या सुमारास झाली. नेमका महिना व तारीख लक्षात नाही. मी दैनंदिनी लिहिण्याचा प्रयत्न करतो; परंतु पुष्कळ वेळा माझी दैनंदिनी कोरीच राहते. त्यामुळे जीवनातील महत्त्वाच्या घटनांचासुद्धा निश्चित काळवेळ मला सांगता येत नाही. काही प्रा. न. र. फाटकांसारखे माझे मित्र कधीही दैनंदिनी ठेवत नाहीत; परंतु पन्नास-साठ वर्षांच्या पूर्वीच्याही लक्षात ठेवण्यासारख्या घटनांची तारीख आणि वेळ नेमकी सांगू शकतात.

मानवेंद्रनाथ रॉय यांची अनेक व्याख्याने १९३७ च्या मे महिन्यात पुणे येथे झाली. सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटीमध्ये महिनाभर उतरण्याची त्यांची व्यवस्था झाली होती. त्यांच्या पत्नी एलन रॉयही त्यांच्या बरोबर होत्या. त्यावेळी पुण्याच्या वसंत व्याख्यानमालेत रॉय यांचे व्याख्यान झाले; प्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ प्रा. वा. गो. काळे हे अध्यक्षस्थानी होते. भारताच्या संदर्भात मार्क्सवादाच्या दृष्टिकोनाची आवश्यकता व विशेषत: विरोधविकासवाद भारताच्या इतिहासास कसा चांगला लागू होतो, याचे विवेचन रॉय यांनी केले होते. मी उपवक्ता म्हणून रॉय यांच्या विचारसरणीला पाठिंबा दिला. मी मराठीत बोललो. तोपर्यंत माझा वेष महात्मा गांधींप्रमाणे टोपी किंवा शर्टही अंगात घालत नव्हतो; गांधीवादी म्हणून प्रसिद्ध होतो. रॉय यांच्या पुणे येथील सर्व व्याख्यानांच्या सभांना प्रा. पारीख उपस्थित रहात. मी उपवक्ता म्हणून जेव्हा वसंत व्याख्यानमालेत बोललो तेव्हा भारतातील तत्त्वज्ञानात भौतिकवाद आहे व त्याचप्रमाणे डायलेक्टिक्स म्हणजे एक प्रकारचा विरोधविकासवादही आहे; म्हणून मार्क्सवादी तत्त्वज्ञानाला अनुकूल अशी भारतीय तत्त्वज्ञानाची पार्श्वभूमी मिळू शकते असे मी प्रतिपादिले. प्रा. पारीख हे या माझ्या प्रतिपादनामुळे रॉय यांच्या सभांमध्ये माझ्या शेजारी बसून मधून मधून बातचित करू लागले. सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीच्या रॉय यांच्या निवासस्थानी ते माझ्याबरोबर येऊ लागले. रॉय यांच्याशी माझी चर्चा होत असे. मला रॉय म्हणाले, की तुमचे मराठीतील भाषण मला नीट कळले नाही. भारतीय तत्त्वज्ञानातील परिभाषा माहित असल्यामुळे काय तो अंदाज केला आहे. मी त्याचे इंग्रजीत स्पष्टीकरण केले. हे करीत असताना मला पारीख यांनी त्यांचा तत्त्वज्ञान विषय नसतानाही मदत केली.

या प्रसंगानंतर पारीख आणि मी विचाराने खूप जवळ आलो. ते त्यावेळी फर्ग्युसन कॉलेजमध्ये पदवी परीक्षेचा अभ्यास करीत होते. ते ज्या वसतिगृहात रहात होते तेथे आमच्या दोघांच्या गाठीभेटी व बैठकी सुरू झाल्या. त्याबरोबरच पारीख यांचे अनेक मित्र म्हणजे न्या. ए. आर्. शिंपी, मिरजेचे आप्पासाहेब देशपांडे, प्रा. दिगंबरपंत नरवणे, नी. वि. सोहनी, मा. पं. शिखरे, डॉ. र. भ. कर्णिक, गोविंदराव हर्षे इ. मंडळींची व माझी चांगली ओळख झाली. पारीख यांचा मित्रपरिवार फारच मोठा आहे. पुण्यात त्यावेळी त्यांचे तीस–पस्तीस मित्र मला आढळले. एकदा त्यांचे जे मित्र झाले ते कायम मित्र राहिले. या मित्रपरिवारात आमच्या विविध विषयांवरील चर्चा खूप रंगत. पारीख बुद्धिवादी; चर्चेत कधीही हार जात नसत. चर्चेला रंग भरायचा तो त्यांच्या विनोदांच्या आणि वादपटुत्वाच्या कौशल्याने. फर्ग्युसन कॉलेजमध्ये किंवा इतरत्र राजकीय, सामाजिक व आर्थिक विषयांवर भाषणांच्या स्पर्धा चालत. अनेक सुप्रसिद्ध तरुण

अनुक्रमणिका

समाजवादी या मैफलीत भाषणे करीत. त्यांत पारीख हे रॉयवादाच्या भूमिकेवरून समाजवाद, लोकशाही क्रांती इ. विषयांवरच्या रॉयवादविरोधी मुद्द्यांना अभिनिवेश न दाखविता विनयपूर्ण, शैलीने गंभीरपणे तर कित्येकदा विनोदचातुर्याने उत्तरे देत. ते इंग्लिश व मराठी या दोन्ही भाषांमध्ये भाषणे करून श्रोत्यांवर व सभांवर छाप पाडीत असत. हिंदी भाषिक श्रोतृवर्गावरही हिंदी भाषणाने त्यांची पकड बसत असे. त्यांच्याशी चर्चेत भाग घेणाऱ्या तरुण विद्यार्थ्यांना युक्तिवादाने गप्प बसवीत. याचा परिणाम उलट न होता त्याचे रूपांतर मैत्रीत झालेले मी पाहिले आहे. मी भारतीय तत्त्वज्ञानाचा विद्यार्थी असल्यामुळे मला वादाचे बाळकडू मिळाले आहे आणि याच कारणास्तव माझ्या व पारीख यांच्यामध्ये १९३७ च्या मे आणि जूनमधल्या चर्चेच्या बैठकीत ज्या झटापटी झाल्या, त्याच्यातच आमची पक्की मैत्री झाली; वादाने दूर गेलो नाही, याचे कारण विचारक्षेत्रात सर्वांना संपूर्ण स्वातंत्र्य आहे व हे वैचारिक स्वातंत्र्य अत्यंत पवित्र तत्त्व आहे, असा उदारमतवादी सिद्धांत विद्यार्थी दशेतच त्यांच्या जीवनात उतरला होता. हा उदारमतवाद त्यांच्या जीवनातही तेव्हापासूनच भिनलेला असल्यामुळे दैनंदिन व्यवहारातही त्याचे प्रत्यंतर शेवटपर्यंत येत होते; कारण मैत्री ही मानवी जीवनाची आध्यात्मिक संपत्ती आहे, असे ते मानत आणि त्याचमुळे कोणीही अतिथी अभ्यागत त्यांच्याकडे आला, की त्याला खाणे–पिणे, सल्लामसलत या बाबतीत ते यथाशक्ती कधीही उणे पडू देत नसत.

वैचारिक दृष्टीने आमची दोघांची वाढ भिन्न दिशेने झाली. मी जुन्या धार्मिक, वैदिक व शास्त्री यांच्या परंपरेत विद्यार्थिदशेत वाढलो; नंतर गांधीवादी झालो. महात्मा गांधींच्या राजकीय आंदोलनात १९२० साली सामील झालो; आणि १९३७ साली मानवेंद्रनाथ रॉय यांच्या मार्क्सवादी विचारसरणीचा अंगीकार केला. १९३० नंतर मी इंग्लिश साहित्य व तत्त्वज्ञान यांचे अध्ययन, वाचन आणि मनन करू लागलो. पारीख हे प्रथमपासून नव्या इंग्रजी शिक्षणपद्धतीत वाढले; प्रथम हिंदुत्ववादाचा संस्कार त्यांच्या मनावर फार खोल झाला होता. विद्यापीठीय शिक्षण घेत असताना आधुनिक विचारांकडे ते वळले आणि एकदम रॉय यांच्या विचारसरणीचा त्यांनी स्वीकार केला.

१९३० साली रॉय हे गुप्तपणे भारतात आले त्यावेळी मुंबई, कलकत्ता, मद्रास इ. राजकीय स्वातंत्र्याच्या आंदोलनाचे केंद्रस्थान असलेल्या मोठमोठ्या शहरांत रॉयना अनेक मित्र मिळाले. व. भ. कर्णिक आणि त्यांचे बंधू हे रॉय यांचे निष्ठावंत मित्र म्हणून त्याच वेळी कार्य करू लागले. मध्यंतरी रॉय यांना सहा वर्षांची राजद्रोहाच्या आरोपाखाली कारावासाची शिक्षा झाली. १९३६ साली सुटका झाल्यावर रॉय हे भारतात मोकळेपणाने संचार करू लागले. १९३७ साली रॉय यांचे काही काळ पुणे येथे वास्तव्य झाले. त्यातच पारीख हे आपल्या अनेक पदवीधारी मित्रांसह रॉयवादी बनले.

पारीख एम्. ए. पदवीपरीक्षा उत्तीर्ण होईपर्यंत पुण्यातच राहिले. इतर समाजवादी नेत्यांचे पुणे येथे समाजवादाचे अभ्यासवर्ग चालत. पारीख यांनी आपले स्वतंत्र अभ्यासवर्ग मार्क्सवादाच्या शिकवणीकरता सुरू केले. त्यावेळी पुणे, मुंबई, नागपूर, अमरावती इत्यादी शहरांत समाजवादी अभ्यासवर्गाला पुष्कळ बहर आला होता; कारण बरेचसे समाजवादी काँग्रेसच्या आंदोलनात भाग घेतलेले होते. गांधीवादाशी समन्वय करून ते समाजवादाचे समर्थन करीत. संपूर्ण मार्क्सवादाची मांडणी त्यामुळे समाजवादी करू शकत नसत; गांधीवाद हा अध्यात्मवादावर आधारला असल्याने अध्यात्मवादाशी सुसंगत असा समाजवाद मांडण्याची पद्धती त्यांनी स्वीकारली होती. इतर सुप्रसिद्ध भारतीय समाजवादी जयप्रकाश नारायण, राममनोहर लोहिया, नरेंद्र देव हे त्यांचे नेते मानले जात. इतिहासाची भौतिक व आर्थिक मार्क्सप्रणीत उपपत्ती लक्षात घेऊनच पारीख यांची अभ्यासवर्गाची मांडणी असे. त्यामुळे अध्यात्मवादाशी समाजवादी आर्थिक क्रांती कशी विरोधी आहे, याचे बिनतोड समर्थन पारीख करीत असल्यामुळे, त्यांच्या अभ्यासवर्गाला उत्कृष्ट बुद्धिवादी स्वरूप येत असे.

पुणे येथील आधुनिक वैद्यकीय महाविद्यालयातील विद्यार्थी व विद्यार्थिनी इतर महाविद्यालयीन विद्यार्थ्यांबरोबरच या अभ्यासवर्गास उपस्थित असत

अनुक्रमणिका

डॉ. इंदुमती ( रणदिवे ) पारीख या आपल्या मित्रांसह नियमाने यात भाग घेत असत आणि त्यात पारीख यांची व त्यांची मैत्री जमून आली व त्याचे पर्यवसान त्यांच्या विवाहात झाले. या विवाहाला रॉय यांनी आशीर्वाद दिला. त्या विवाहाला अनेक अडचणी आल्या. पारीख यांचे वृद्ध पिताजी हे सनातनी परंपरेचे होते. हा आंतरजातीय विवाह होता. पारीख यांच्या वडिलांनी माझ्याशी खूप चर्चा करून या विवाहाला उशीरा कशीबशी संमती दिली. परंतु कालांतराने या दोघांचा सुंदर संसार पाहून त्यांचे वडील प्रसन्न झाले. आंतरजातीय विवाह झाल्यामुळे या दोघा पती-पत्नींना भावी संततीचा प्रश्न मनाला त्रास देत होता. माझा असा कयास आहे, की भावी संततीला समाजात वावरताना त्रास होऊ नये म्हणून संततिनियमन कायम ठेवले; काळ इतका बदलेल याची त्यावेळी कल्पना येऊ शकली नाही. आता मिश्र जातीय विवाहाची संतती पांढरपेशा वर्गात व ब्राह्मणातही एकरूप होऊन, मोकळेपणाने व आनंदाने वावरू लागली आहे. त्याचे प्रमाण मात्र अजून फार अल्प आहे.

पारीख यांना वाक्‌चातुर्याची व तर्कबुद्धीची जन्मसिद्ध देणगी मिळाली होती. त्याबरोबरच विचारात रस होता; आणि प्रतिवाद करण्याकरता आवश्यक असलेली प्रत्युत्पन्न मतीही त्यांना लाभली होती. अर्थशास्त्राची एम्. ए. ची पदवी मिळाल्यानंतर ते रॉय यांनी सुरू केलेल्या 'इंडिपेंडन्ट इंडिया' या साप्ताहिकात तिवारी या टोपणनावाखाली भारतीय व आंतरराष्ट्रीय राजकारणावर समीक्षात्मक लेख लिहू लागले. ते लेख अजूनही त्यावेळच्या परिस्थितीचा अर्थ समजण्यास उपयुक्त ठरतील. मराठीतही प्रसंगविशेषी ते लेखन करीत. पुणे येथील भारत इतिहास संशोधक मंडळाच्या वार्षिक सभेत १९४० मध्ये किंवा त्याच सुमारास डॉ. पुणतांबेकर (नागपूर विद्यापीठ) यांचे मार्क्सवादाचे कालबाह्यत्व व अध्यात्मवादी इतिहासतत्त्वाचे श्रेष्ठत्व या विषयावर भाषण झाले. त्याचा संक्षिप्त सारांश पुणे येथील 'केसरी' दैनिकात प्रसिद्ध झाला. त्यावर मी मुंबई येथून प्रसिद्ध होणाऱ्या 'चित्रा' साप्ताहिकात समीक्षात्मक लेख लिहिला. त्यानंतर डॉ. पुणतांबेकर यांनी प्रत्युत्तरात्मक लेख लिहिला. यावेळी मी 'चित्रा' साप्ताहिकात संपादकीय अग्रलेख लिहीत असे. कै. वांदेकर हे विनोदी लेखक 'चित्रा'चे त्यावेळी संपादक होते. पुणतांबेकरांच्या प्रत्युत्तरात्मक लेखाला उत्तर म्हणून पारीख यांनी पुन्हा प्रत्युत्तरात्मक चार लेख लिहिले.



पारीख यांची मुंबई येथील रामरक्षा महाविद्यालयात अर्थशास्त्राच्या प्राध्यापक पदावर नेमणूक झाली. १९४० च्या दुसऱ्या जागतिक युद्धाच्या प्रारंभी रॉय यांनी फासिझमविरुद्ध निर्माण झालेल्या दोस्त राष्ट्रांच्या आघाडीला मान्यता देऊन फासिझमविरुद्ध चालू झालेल्या जागतिक आंदोलनात ते आपल्या अनुयायांसह सामील झाले. यावेळी रॉय यांनी कॉंग्रेसमध्ये १९३७ सालापासून स्थापन केलेल्या 'लीग ऑफ रॅडिकल कॉंग्रेस मेन' या रॉयवादी गटाने कॉंग्रेसचा राजीनामा देऊन रॅडिकल डेमोक्रेटिक पार्टी स्थापन केली. या पक्षाच्या वरिष्ठ कार्यकारी मंडळाचे सदस्य म्हणून पारीख हे काम करू लागले. या पक्षाच्या कामगार संघटनेमध्येसुद्धा महत्त्वाचे कार्य ते करू लागले. कामगारांचे अभ्यासवर्ग त्यांनी चालविले. रॅडिकल डेमोक्रेटिक पार्टीच्या बंगाल, बिहार, उत्तर प्रदेश, पंजाब, गुजरात, महाराष्ट्र, मुंबई, आंध्र, कर्नाटक, दिल्ली इत्यादी ठिकाणी शाखा निघाल्या. दुसऱ्या जागतिक महायुद्धात फासिझमविरोधी आशिया खंडातील सर्वात मोठी वैचारिक आघाडी रॉय यांनीच उघडली. या आघाडीचे नेतृत्व करणारे व्ही. एम्. तारकुंडे, शिवनारायण रे, अमलान दत्त, व. भ. कर्णिक, मणिबेन कारा यांच्यासारखे जे मोठे विचारवंत रॉय यांना लाभले त्यांत पारीख यांची गणना होते.

फासिझमचा जागतिक आघाडीवर पराभव झाला तरच भारताच्या लोकशाही स्वातंत्र्याला भवितव्य आहे; कारण या महायुद्धाच्या अखेरीस फासिझमचा पराभव झाल्यास जगातील पश्चिमी साम्राज्यशाह्यांच्या विसर्जनास प्रारंभ होईल; हा रॉय यांचा भविष्यवाद एखाद्या प्रेषिताच्या भविष्यवादासारखा आम्हा सर्व रॉयवाद्यांना वाटला. परंतु म. गांधी यांच्या नेतृत्वाखाली कॉंग्रेसच्या देशव्यापी राजकारणाची भारतीय जनमनावर विलक्षण पकड होती. फासिझमचा विरोध कॉंग्रेसला मान्य नव्हता. वैकुंठवासी राजगोपालाचार्य, कै. पंडित जवाहरलाल

नेहरू आणि इतर काही काँग्रेसचे नेते हे मात्र फासिझमविरोधीच विचारसरणीचे होते. नेहरूंनी तत्पूर्वीच्या स्पेनमधील फासिझमच्या उठावाला विरोध केला होता. तरी म. गांधींच्या नेतृत्वाखाली काँग्रेसने फासिझमविरोधी लढ्याला सरळ पाठिंबा देण्याचे नाकारले; त्यावेळी राजगोपालाचार्य स्वस्थ बसले. पंडित जवाहरलाल नेहरू यांनी आपली फासिझमविरोधी भूमिका बदलून म. गांधींचेच अनुयायित्व मान्य केले. भारतीय कम्युनिस्ट पक्ष हा १९४२ सालापर्यंत म्हणजे रशियावर हिटलरचे आक्रमण होईपर्यंत दोस्तराष्ट्रांची फासिझमविरोधी आघाडी ही साम्राज्यशाही आघाडी म्हणून काँग्रेस-बरोबरच होता. या सर्व राजकीय घडामोडींबद्दल पारीख हे ' इंडिपेंडन्ट इंडिया ' मध्ये अनेक समीक्षात्मक लेख लिहीत होते. मराठीमध्ये मुंबई येथून 'संग्राम' नावाचे दैनिक, रॉयवादी श्री. द्वा. भ. कर्णिक हे प्रसिद्ध करीत होते. त्यातही मराठीमध्ये मधून मधून पारीख यांचे लेख प्रसिद्ध होत. या दुसऱ्या महायुद्धाच्या कालखंडात भारतीय जनतेमध्ये काँग्रेस-चाच प्रभाव फार मोठा होता. १९४१ साली कलकत्ता येथे रॅडिकल डेमोक्रेटिक पार्टीच्या वरिष्ठ कार्यकारी मंडळाची बैठक झाली. त्यावेळी पारीख, व. भ. कर्णिक, व्ही. एम्. तारकुंडे, मी स्वतः इ. मंडळी उपस्थित होतो. बैठक संपल्यावर तेथील कॉफी हाउसमध्ये आम्ही रॉय व इतर सर्व मंडळी जमून कॉफीपान होताना प्रचलित विषयांची चर्चा करीत होतो. या चर्चेत मी रॉय यांना म्हटले, की भारतीय जनता ही आपल्या बाजूला नजीकच्या काळात येणार नाही. लोकशाही जीवनमूल्यांच्या संदर्भात विचार करता भारत हे राष्ट्र नापीक भूमी आहे हे मान्य करावे लागते ( द इंडियन रिॲलिटी इज बॅरन ). रॉय यांनी माझे हे विधान एक प्रकारे आश्चर्यचकित होऊन मान्य केले; परंतु ते पुढे म्हणाले, शास्त्रीजी मार्क्सवादाच्या द्वंद्वात्मक विकासवादानुसारे नापीक ( बॅरन ) भारतीय भूमी सुपीक बनू शकेल, हे तुम्ही मार्क्सवादी असूनही का लक्षात घेत नाही ? माझे भारतीय नापीकतेचे विधान कालांतराने रॉय यांनीही मान्य केले ते दुसऱ्या जागतिक महायुद्धाच्या अखेरीस आणि त्यानंतरदेखील माझे वरील विधान मधून मधून ते निराशेच्या मनःस्थितीत उच्चारत असत. पारीख यांना हे विधान खूपच पटले होते व ते अखेरपर्यंत रॉय यांचे हे विधान आहे, असे सांगून भारतीय लोकशाहीच्या संदर्भात मलाही गप्प बसवीत. हे विधान मूळचे माझे आहे; हे त्यांच्या स्मरणात राहिले नव्हते. मीही माझेच हे विधान आहे, अशी आठवण त्यांना कधीही करून दिली नाही.

१९३७–३८ च्या सुमारास काँग्रेसच्या नेतृत्वाखाली भारताची मुंबई योजना प्रसिद्ध झाली. रॉय यांना ही योजना अयोग्य वाटली. म्हणून बॅ. व्ही. एम्. तारकुंडे व पारीख यांना भारताच्या आर्थिक विकासाच्या गरजा लक्षात घेऊन योजना तयार करण्याचे काम रॉय यांनी सोपविले. मुख्य योजना लिहिण्याचे काम चालू असता टंकलिखित मजकूर पारीख हे मला दाखवीत. एकदा ही घटना रॉय यांच्या देखत घडली. रॉय म्हणाले, की शास्त्रीजींचा अर्थशास्त्र हा विषय नाही; अशा स्थितीत पारीख तुम्ही शास्त्रीजींना जनतायोजनेचा आराखडा दाखविता, हे कसे ? शास्त्रीजींना यात काय समजते ? पारीख यांनी रॉय यांना सांगितले, की मी व तारकुंडे आम्ही दोघांनी शास्त्रीजींची फासिझमविरोधी भाषणे ऐकली आहेत. त्यात ते लेनिनच्या साम्राज्यशाहीवरील प्रबंधाचे विवेचन समर्थ रीतीने करताना आम्ही ऐकले आहे; म्हणून त्यांना या विषयात बरेचसे काही समजते, असे आम्हास वाटते. हे ऐकून रॉय यांना समाधान वाटले.

१९४६ साली अखिल भारतीय घटना समितीच्या सदस्यांचे निर्वाचन झाले. त्यात रॅडिकल डेमोक्रेटिक पार्टीनेही आपले उमेदवार उभे केले. रॅडिकल डेमो-क्रेटिक पार्टीचे उमेदवार निवडत असताना मी व. भ. कर्णिक यांना म्हटले, की आपल्या पक्षाचे उमेदवार निवडून येणार नाहीत; काँग्रेसचेच उमेदवार निवडून येतील, हेही आपण लक्षात ठेवले पाहिजे. पारीख व कर्णिक माझ्या या विधानाने त्रस्त झाले. त्यांनी रॉय यांच्याकडे माझा हा निराशावादी विचार बोलून दाखविला. रॉय यांचे म्हणणे पडले, की २०–२५ उमेदवार निवडून आले, तरी काही हरकत नाही. आपला विचार घटना-समितीमध्ये प्रभावीपणे मांडला गेला पाहिजे. २०–२५ निवडून आलेले

उमेदवार हे कार्य करू शकतील. सगळ्या भारतात एकदोनच रॅडिकल उमेदवार निवडून आले व जे आले त्यांचा आवाज घटनासमितीत ऐकूही आला नाही.

सातारा जिल्ह्यात या निर्वाचनसमयी मी स्वतः रॅडिकल उमेदवाराच्या प्रचाराकरता गावोगावी हिंडत होतो. माझ्या गटावर जबरदस्त हल्ले झाले. माझ्या प्रत्येक सभेत दगडफेक व शेणफेक होत होती. सातारा शहरात राजवाड्यासमोर आमची सभा झाली. त्या सभेत कै. ह. रा. महाजनी, कै. आत्माराम पाटील, मिरजेचे कै. आप्पासाहेब देशपांडे इ. आमचे मित्र व्यासपीठावर भाषणे करू लागल्यावर जोरात दगडफेक झाली. मी भाषण करावयास उभा राहिलो तेव्हा काँग्रेसच्या स्वयंसेवकांनी आमची सभा दगडफेकीने उधळून लावली. मला लाठीकाठी घेतलेल्या स्वयंसेवकांनी घेराव घालून बदडून काढले. चपला मारल्या. मी जखमांनी आजारी झालो, ही बातमी पारीख यांना त्याच दिवशी रात्री मुंबईस कळली. लगेच रात्री पारीख यांनी भाड्याने मोटार काढून माझ्या समाचारास ते वाई येथे धावून आले. या निवडणुकीत उमेदवाराच्या प्रचाराकरता लागणारी आर्थिक मदत पारीख यांच्यातर्फेच येत होती. ही मदत माझ्याकडे मुंबईतील कामगार कार्यकर्ते श्री. आबा फाटक यांच्यातर्फे पोहोचविण्यात आली; परंतु पैशाचा विनियोग मी स्वतः करीत नसे. पैशाचा विनियोग योग्य व्हावा म्हणून कोणत्याही एका व्यक्तीच्या हाती पैसे पारीख सोपवत नसत. सार्वजनिक पैशाच्या बाबतीत पारीख हे फार काळजीपूर्वक व्यवस्थापन करीत. ही गोष्ट ते मुंबई विद्यापीठाचे मुख्य सचिव ( रेक्टर ) झाल्यावर अधिक चांगल्या रीतीने सिद्ध झाली. सार्वजनिक पैशाचा विनियोग अत्यंत प्रामाणिकपणे करण्याच्या बाबतीत पारीख हे आदर्शभूत होते.

श्री. यशवंतराव चव्हाण व पारीख यांची दाट ओळख व मैत्री होती. ही ओळख पारीख हे पुणे येथे विद्यार्थीदशेत अभ्यासवर्ग चालवीत असता प्रथम झाली. मध्यंतरीच्या काळात श्री. चव्हाण व पारीख यांच्या गाठीभेटी विशेष होत नव्हत्या. यशवंतराव चव्हाण द्विभाषिक मुंबई राज्याचे मुख्यमंत्री झाल्यावर गाठीभेटी व चर्चा होऊ लागल्या. मैत्रीला उजाळा मिळाला आणि मुंबई विद्यापीठाच्या मुख्य सचिवपदी ( रेक्टरपदी ) पारीख यांची चव्हाणांच्या सल्ल्यानेच नेमणूक झाली. पारीख हे उत्तम शिक्षक होते. राम रुइया महाविद्यालयात त्यांची तशी प्रसिद्धी होती. ते नुसते उत्तम शिक्षक नव्हते, तर आदर्श शिक्षणसंस्था कशा असाव्यात याबद्दल त्यांनी पुष्कळ चिंतन–मनन केलेले होते. शिक्षण गुणात्मक असेल तरच ते शिक्षण होय व शिक्षणानेच माणूस हा सुसंस्कृत नागरिक बनू शकतो; शिक्षणामुळेच नवा माणूस निर्माण होऊ शकतो; शिक्षण गुणात्मक नसेल तर ते शिक्षणच नव्हे; ती फसवणूक असते; या सिद्धांतावर त्यांची श्रद्धा होती. त्यामुळे या नितान्त श्रद्धेनेच त्यांनी मुंबई विद्यापीठाचा कारभार सक्षम रीतीने चालविला. मुंबईत गरीब मध्यम वर्ग व कामगार वर्ग यांना नोकरी करून महाविद्यालयीन शिक्षण देता यावे म्हणून सकाळी दहा वाजण्याच्या आत विद्यापीठीय शिक्षण घेऊन आपल्या नोकरीवर सकाळी विद्यार्थ्यांना हजर रहाता यावे म्हणून सकाळची महाविद्यालये चालू होती. याचा परिणाम विद्यार्थ्यांच्या अभ्यासावर फार वाईट होत असे, हे पारीख यांना आढळले. विद्यार्थी महाविद्यालयात हजेरी लावून पसार होत, म्हणून सकाळची महाविद्यालये बंद करावी, असा निर्णय मुंबई विद्यापीठास पारीखांनी घ्यावयास लावला. या बाबतीत मुंबई विद्यापीठाच्या दोन्ही मंडळांचे सदस्य माजी उच्चतम न्यायाधीश श्री. प्र. बा. गजेंद्रगडकर यांचा पारीख यांना पूर्ण पाठिंबा होता. पारीख हे मुंबई विद्यापीठामध्ये रेक्टर म्हणून काम करीत असता क्रमाने दोन कुलगुरू झाले. त्यांनीही पारीख यांचीच बाजू उचलून धरली. पारीख यांच्या कारकीर्दीत अखेरीस श्री. गजेंद्रगडकर कुलगुरू झाले व त्यांनी सकाळची महाविद्यालये सुरू करावी असा निर्णय घेतला; याचे कारण महाराष्ट्र राज्याचे जे अनेक शिक्षणमंत्री झाले त्यांनाही सकाळची महाविद्यालये पुन्हा सुरू करावी असे फार वाटत होते. पारीख यांच्यावर या शिक्षणमंत्र्यांनी अप्रत्यक्षपणे खूप दडपण आणले. त्याचा पारीख यांच्या मनावर फार ताण पडत होता. अनेक वर्षे हा ताण सोसत असताना पारीख यांनी आपला हट्ट सोडला

अनुक्रमणिका

नाही. पारीख म्हणत की, श्री. यशवंतराव चव्हाण हे जोपर्यंत मला शिक्षणमंत्री म्हणतात तशा प्रकारचा सल्ला देत नाहीत, तोपर्यंत मी माझा मुद्दा सोडणार नाही; परंतु डॉ. श्री. गजेंद्रगडकर कुलगुरू झाल्यानंतर सगळीच परिस्थिती बदलली. सहकारी व मित्र म्हणून गजेंद्रगडकरांचे जे पाठबळ मिळत होते, ते नाहीसे झाले. एवढेच नव्हे, तर गजेंद्रगडकरांची पारीख यांच्या विरुद्ध दिशेने पावले पडू लागली. पारीख यांचा अपमानही होईल अशी कृती गजेंद्रगडकरांच्या हातून झाली· कारण मुंबई विद्यापीठात पारीख यांच्या विरुद्ध कायम कारवाया करणारी अनेक मंडळी गजेंद्रगडकरांच्या पाठीशी उभी राहिली. या संदर्भात एकच उदाहरण दिले म्हणजे गजेंद्रगडकरांच्या धोरणाचा अर्थ स्पष्ट होतो. डॉ. गजेंद्रगडकर ज्या दिवशी कुलगुरू पदावर आले त्या दिवशी पारीख यांना बोलावून घेऊन गजेंद्रगडकरांनी विद्यापीठाच्या इमारतीत ज्या खोलीत बसून पारीख कार्यवाही करीत असत, ती खोली मला पाहिजे, ती तुम्ही सोडा, असा हुकूम सोडला. पारीख यांनी ती खोली सोडली. रेक्टरपदी पारीख नकोत, असे गजेंद्रगडकरांनी ठरविले होते. गजेंद्रगडकरांच्या या दिशेने हालचाली सुरू झाल्या, हे पारीख यांच्या लक्षात आले व त्यांनी रेक्टरपदच आवश्यक नाही, असा प्रस्ताव विद्यापीठाकडून संमत करून घेतला. हा ठराव संमत होईपर्यंत सुमारे १ वर्षपर्यंत पारीख विद्यापीठाचा कारभार पहात होते. गजेंद्रगडकरांचा खूप जाच होत होता. वस्तुतः पारीख मला व अनेक मित्रांना एक हिंदी म्हण वापरून नेहमी सांगत, की 'ऐसी जगह बैठ जहाँ कोई न कहें ऊठ.' मी त्यांना त्यावर उत्तर देत असे, की मला हा विचार मान्य नाही. कारण मी कोठेही, कोणत्याही आसनावर स्थिर बसण्यास उत्सुकच नसतो. पक्षी हे माझे जीवनाचे प्रतीक मानतो. थोडी चाहुल लागली तरी पक्षी बसलेल्या जागेवरून उडून जातो. पारीख यांना जबरदस्तीने आपल्या पदावरून उठून जावे लागले. डॉ. गजेंद्रगडकरांचा नूर पहिल्याच दिवशी पारीख यांना कळला होता. त्यांनी तेव्हाच विद्यापीठ सोडले असते, तर दीर्घकालपर्यंत मनोवेदना सहन करावी लागली नसती व प्रकृती भराभर ढासळत गेली तशी ढासळली नसती.

विद्यापीठ सोडल्यानंतर पारीख यांच्या मनातून विद्यापीठ लवकर उठले नाही; कारण विद्यापीठ ही संस्था त्यांना आपल्या उच्च ध्येयवादाच्या पूर्तीचे अद्वितीय साधन वाटत होते आणि त्यांचा हा जीवनाचा दृष्टिकोन उपनिषदकार व प्लेटोपासून तो आधुनिक तत्त्वज्ञ व्हाईटहेड बर्ट्रंड रसेल, जे. आर्टेगा ई गॅसेट इ. तत्त्ववेत्त्यांनी स्वीकारलेला आहे.

विद्यापीठ सोडल्यावर पारीखांची प्रकृती सारखी ढासळत होती, तरी ते महत्त्वाच्या सार्वजनिक कार्यांमध्ये मोठ्या साक्षेपीपणे भाग घेत, सल्लामसलत करीत. त्यांची सल्लामसलत अत्यंत मूल्यवान असे. उच्च ध्येयवाद कार्यवाहीत कसा आणावा, यासंबंधी ते जे मार्गदर्शन करीत, ते फार अचूक असे. मुंबई, दिल्ली, कलकत्ता, मंगळूर, हैद्राबाद, मद्रास येथूनही शिक्षणतज्ञ त्यांची भेट घेऊन सल्ला मागत असत. त्यांनी 'बेनेट कोलमन अँड कंपनी' व बँक ऑफ इंडिया येथे डायरेक्टर म्हणून यशस्वी रीतीने नंतर कामे केली. मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय या संस्थेचे ते उपाध्यक्ष म्हणून अनेक वर्षे होते. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे ते प्रथमपासूनचे सदस्य होते. या मंडळाची सर्व कार्यवाही अध्यक्ष म्हणून मी पहात होतो. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचा सवंध प्रकल्प (प्रॉजेक्ट) प्रथम पारीख आणि प्रा. अ. भि. शाह या दोघांनी तयार केला. या सर्व संस्थांमध्ये अनेक पेचप्रसंग उत्पन्न झाले, की संस्थाचालकांना बिनतोड रीतीने त्या पेचप्रसंगातून सोडविण्याची कामगिरी पारीखांकडे सोपविलेली असे. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय या संस्थेचे अध्यक्ष श्री. स. का. पाटील यांनी पारीख यांना श्रद्धांजली देताना असे म्हटले, की चांगल्या चांगल्या कायदेपंडितांना ज्या संस्थाविषयक संकटातून मार्ग काढणे अशक्य झाले, त्या संकटातून आम्हाला पारीख यांनी मार्ग दाखविला. अखेरच्या २ वर्षांत पुणे येथे सहकारी मुद्रणालय ही संस्था पारीख यांनी स्थापन केली. त्या संस्थेच्या संचालक मंडळामध्ये अनेक सहकारी चळवळीचे नेते सदस्य म्हणून समाविष्ट झालेले आहेत. सध्याचे महाराष्ट्र राज्याचे मुख्यमंत्री श्री. वसंतदादा पाटील हे महाराष्ट्रातील सहकारी चळवळीचा फार मोठा व्याप निर्माण करणारे

गृहस्थ आहेत. त्यांनाही पारीख यांचे यासंबंधातले कार्यक्रमविषयक विचार नवे व मोलाचे वाटले.

इंदिरा गांधी भारत संघराज्याच्या प्रधानमंत्रिपदावर आल्या. नंतर पारीख हे फार अस्वस्थ झालेले दिसले. इंदिरा गांधींनी कॉंग्रेसचे दोन तुकडे करून नवी कॉंग्रेस स्थापन केली तेव्हा मी 'महाराष्ट्र टाइम्स'मध्ये समीक्षात्मक लेख लिहून इंदिरा गांधींची प्रतिमा ही राजकीय पुरोगामित्वाची दर्शक आहे, असे म्हटले. तेव्हा एकदा संध्याकाळी आम्ही दोघे चर्चा करीत असता पारीख म्हणाले, की एक अशिक्षित महिला भारताच्या प्रधान मंत्रिपदावर येते हे काही भारताच्या राजकीय भवितव्याचे शुभसूचक चिन्ह नाही. मी त्यावर त्यांच्या विरुद्ध बाजूने असे म्हटले, की अहो पारीखसाहेब, इंदिरा गांधी औपचारिक शिक्षण घेऊन विद्यापीठीय पदवीधर झालेल्या नसल्या, तरी त्या नेहरूंच्या राजकीय विद्यापीठाच्या डॉक्टरेट घेतलेल्या महिला आहेत. म्हणजे असे की, पंडित जवाहरलाल नेहरूंबरोबर त्या अनेक वर्षे सहायक म्हणून राहिल्या आहेत; त्यांच्या बरोबर देशोदेशी फिरल्या; देशी व विदेशी राजकीय मुत्सद्यांच्या नेहरूंबरोबर चाललेल्या अगणित खलबतांच्या वेळी उपस्थित राहिल्या. त्यामुळे त्यांना फारच मोठा अनुभव मिळाला, पुष्कळच ऐकावयास मिळाले. अशी संधी जगामध्ये फारच थोडया व्यक्तींना मिळू शकते.

इंदिरा गांधींनी आणीबाणी पुकारून एक महिना झाला होता. १९७५ च्या जुलै महिन्याच्या शेवटच्या आठवडयात मी नेहमीप्रमाणे संध्याकाळी पारीख यांच्या निवासस्थानी गेलो. मी विचारले, की आज स्वारी खूप प्रसन्न दिसते. काही महत्त्वाचे अनुकूल असे घडले का ? ते म्हणाले :– आता सगळा आनंदीआनंद आहे. आपले गुरू रॉय हे मोठे राजकीय भविष्यवादी होते याचे पुन्हा प्रत्यंतर आले. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर तुम्ही म्हणत होता, की रॉय साहेबांचे इंडियन नॅशनल कॉंग्रेसबद्दलचे भविष्य खोटे ठरले; कारण कॉंग्रेस ही फासिस्ट पद्धतीचे राज्य निर्माण करील, असे त्यानी म्हटले होते. पण त्याऐवजी सगळ्या वयात आलेल्या भारतीय नागरिकांना मतदानाचा हक्क मिळाला आणि मूलभूत नागरिक हक्कांच्या आधारावर निर्माण झालेले संविधान अमलात आले. जगातील सर्वांत मोठ्या लोकसंख्येची लोकशाही स्थापित झाली, पण आता या आणीबाणीपासून काय घडत आहे ? अधिकारशाहीची पावले गुपचूप रीतीने पुढे पडत आहेत. रॉयसाहेबांची विचारपद्धती अखेरपर्यंत मार्क्सवादीच होती असे फिलीप स्प्रॅट म्हणत होते; परंतु तुम्हाला रॉयसाहेब एकदा म्हणाले, की 'मी मार्क्सवादी असलो, तरी मी हेगेल सोडलेला नाही. हेगेल अजून मार्क्सनंतरदेखील पायावरच उभा आहे.'

मानवी जीवनात अंमलात येत असलेल्या विचारसरणीचा व तत्त्वज्ञानाचा परिपाक होऊन इतिहास कसा बदलतो, हे रॉय पहात होते. या प्रकारच्या विचारसरणीत हेगेल एका अर्थी अंतर्भूत आहेच. महात्मा गांधींची विचारसरणी फासिझमकडे नेईल, असे रॉय दुसऱ्या जागतिक महायुद्धाच्या संदर्भात आवेशाने सांगत. कॉंग्रेसचे तात्त्विक मार्गदर्शन गांधीवादच करीत आहे. त्यामुळे भारताची लोकशाही गांधीवादाच्या पार्श्वभूमीवर उभी राहिल्याने तिचे रूपांतर हळूहळू अधिकारशाहीमध्ये होणारच आणि तसेच आता होऊ लागले आहे. रॉयसाहेबांचा भविष्यवाद खरा ठरला आहे. रॉयसाहेबांसारख्यांचा भविष्यवाद हा ऋषिमुनींसारखा नसला, तरी इतिहासाच्या अपरिहार्य क्रमात सावकाश परंतु निश्चितपणे जे घडून येते, त्याचे लक्षण रॉय यांना आगाऊच दिसले. वैयक्तिक जीवनातील कालक्रम आणि मोठमोठ्या राष्ट्रांच्या जीवनातील कालक्रम याचे मान भिन्न असते; हे लक्षात ठेवूनच रॉयसाहेबांच्या भविष्यवादाचा अर्थ करावा लागतो. या पारीख यांच्या विधानाने मी थोडा खुष झालो.

मी पुन्हा विचारले, की आजची ही तुमची दिसणारी प्रसन्नता एका आठवडयापूर्वी दिसत नव्हती. मध्यंतरी काय झाले ते सांगा. ते म्हणाले :– अहो शास्त्रीजी, माझ्या एका मित्राने कालच दिल्लीहून वार्ता आणली. तो म्हणाला, की ही वार्ता इंदिराजींच्या स्वप्नाची वार्ता आहे. इंदिराजींना आणीबाणी पुकारल्यानंतर एके दिवशी स्वप्न पडले; "प्रथम इंदिराजींचे पिताजी जवाहरलाल नेहरू लगबगीने इंदिराजींपुढे स्वप्नात आले आणि म्हणाले, की तू प्रधानमंत्रिपद स्वीकारून राजकार-

अनुक्रमणिका

णात प्रवेश केला आहेस. मी तुला बजावले होते, की समाजसेवा करीत रहा; पण राजकारणाच्या जंजाळात शिरू नको. त्यावर लगेच इंदिराजींनी उत्तर दिले, की पिताजी तुम्हीच नेहमी सांगत होता, की परिस्थिती पूर्ण बदलली म्हणजे व्यक्तीने आपला जीवनक्रम परिस्थितीला अनुसरून बदलणे शहाणपणाचे असते. मी शहाणपणा केला आहे. हे इंदिराजींचे उत्तर ऐकल्याबरोबर पंडितजी दिसेनासे झाले. लगेच काठी टेकीत टेकीत, वाकलेले म. गांधी समोर आले व म्हणाले, की इंदिरे, तुला पंडितजींच्या जवळ पाहून मी फार खुष होत असे; कारण मला लहान मुले फार आवडतात, तूही खूप आवडत होतीस; परंतु त्यावेळेस तू आता राजकारणात जे करीत आहेस, ते तू करशील हे जर लक्षात आले असते, तर मी ब्रिटिश राज्याविरुद्ध जे आंदोलन, माझ्या ईश्वरोपासनेला मर्यादा घालून, चालविले होते, ते चालविलेच नसते. कारण ब्रिटिशांनी जेवढे नागरिकस्वातंत्र्य जनतेला बहाल केले होते तेवढेही ठेवले नाहीस. इंदिराजींच्या उत्तराची वाट न पाहताच म. गाधी झपाटयाने परत फिरले व दिसेनासे झाले. "

ही पारीख यांनी सांगितलेली इंदिराजींच्या स्वप्नाची वार्ता पारीख यांची स्वकपोलकल्पित वार्ता होती, असे माझ्या ताबडतोब लक्षात आले आणि मी त्यांना हसत-हसत म्हटले, की हे तुमच्या सद्यःस्थितीबद्दलच्या चिंतनाचे चित्रमय स्पष्टीकरण आहे. नंतर यावर काही उत्तर न देता ते म्हणाले, की इतिहासाच्या शक्तींची वेगवान गती अडविणे हे मोठे कठिण काम असते. शास्त्रीजी, तुम्ही काँग्रेसमध्ये १९५२ साली पुन: प्रवेश केला तेव्हा ते तुमचे कृत्य रॉय यांच्या मानवतावादाच्या विरुद्ध म्हणून मला नापसंत होते; कारण तुम्हास हे पटलेले आहे, की पक्षीय राजकारण हे सत्तापिपासूंचे राजकारण असते. कोणताही राजकीय पक्ष स्वतःची सत्ता कायम राखण्याचा प्रयत्न करतो. ते करीत असता नागरिक संघटित रीतीने जागृत नसले, तर विरोधी पर्यायी पक्षाच्या अभावी सत्ताधारी पक्षाचे अधिकारशाहीत रूपांतर होते. या देशात पर्यायी पक्ष म्हणून काँग्रेसविरोधी असा कोणताच पक्ष आतापर्यंत ३० वर्षात संघटित होऊ शकला नाही; आणि ब्रिटन व अमेरिका यांच्याप्रमाणे प्रबल पर्यायी पक्ष उभे राहिले, तरी खरीखुरी मूलगामी (रॅडिकल) लोकशाही दुबळीच राहते. पारीख यांनी सांगितलेले हे स्वप्न १९७५ च्या ऑगस्ट १ ला टिळक विद्यापीठाच्या पुणे येथील समारंभात मी त्यांचे नाव न घेता सांगितले. अध्यक्षपदी माजी न्यायमूर्ती वि. अ. नाईक हे होते आणि प्रसिद्ध समाजवादी श्री. एस्. एम्. जोशी हे श्रोतृवर्गात उपस्थित होते. एस्. एम्. जोशी हे माझे आणीबाणीबद्दलचे विचार काय आहेत, हे समजावून घेण्याकरताच मुद्दाम या समारंभास उपस्थित होते. त्यांची माझ्याबद्दलची शंका या स्वप्ननिवेदनाने नष्ट झाली. समारंभ संपल्यावर मी एस्. एम्. ना सांगितले, की हे स्वप्न पारीख यांनी कल्पिलेले स्वप्न आहे.

इंदिरा गांधींनी आणीबाणी पुकारल्यानंतर ते सारखे मला म्हणत, की आशिया खंडाला लोकशाही राज्यपद्धती पचत नाही, हे याने सिद्ध होते. आशियाई सुलतानशाही (एशियॅटिक डेस्पटिझम) हेच एक कायमचे ऐतिहासिक राजकीय सत्य आहे. १९७५ साली इंदिरा गांधींनी आणीबाणी अमलात आणल्यानंतर कऱ्हाड येथे मराठी साहित्य संमेलनाचे अधिवेशन झाले. त्या अधिवेशनाच्या उद्घाटनप्रसंगी मी जे भाषण केले, त्यात आणीबाणीच्या संदर्भात वृत्तपत्रीय स्वातंत्र्य आणि विचारप्रचाराचे स्वातंत्र्य नष्ट झाल्याबद्दल टीका केली आणि असेही सांगितले, की आज जे उपाय दिसतात, ते अखेरीस अपाय ठरतील आणि लोकशाहीचा कायम संकोच होऊन सत्तेचे केंद्रीकरण होईल. एकदा केंद्रीकरण झाले म्हणजे ते कायम तसेच दृढमूल होण्याचा प्रयत्न करील. हे माझ्या छापील भाषणातील वक्तव्य वाचून पारीख फार अस्वस्थ झाले होते. साहित्य संमेलन आटोपल्यानंतर एक दिवशी संध्याकाळी ९ वाजता मी पारीख यांना त्यांच्या निवासस्थानी अचानक भेटलो. ते आपल्या आतल्या खोलीत शय्येवर काही वाचत पडले होते. ते खोलीतून बाहेर आले, तेव्हा त्यांचा चेहरा मला फार गंभीर दिसला. थोडा वेळ काहीच बोलले नाहीत. मी किंचित अस्वस्थ झालो. तेव्हा ते स्वतः होऊनच म्हणाले, 'काय संमेलन

अनुक्रमणिका

संपवून आलात ? ' 'होय', मी म्हटले. 'तुमचे संमेलनाचे छापील भाषण मी वाचले. त्यातील एक परिच्छेद माझ्या मनाला फारच खटकला. श्री. यशवंतराव चव्हाण स्वागताध्यक्ष असताना तुम्ही आणीबाणीवर टीका करावी हे योग्य नव्हते. चव्हाण हे तुमचे मित्र आहेत. तुमच्या भाषणामुळे त्यांना तुम्ही संकटात आणले असावे. ' मी यावर उत्तर दिले, की 'मी माझी लोकशाही–निष्ठा काही झाले तरी विसरू शकत नाही. ' त्यावर पारीख उत्तरले, की 'तुमच्या वक्तव्याने भारतीय लोक-शाहीचे भवितव्य यत्किंचित तरी सुधारणार आहे काय ? मुळीच नाही. तुमचे भाषण म्हणजे पालथ्या घड्यावरील पाणी होय. असले व्यर्थ उद्योग न करता तुम्ही आपले वैचारिक लेखन स्वस्थ बसून दैनंदिन व्यावहारिक राजकारणात वेळ न दवडता चालू ठेवा. ' पारीख हे भारतीय लोकशाहीबद्दल अत्यंत निराशावादी होते. भारतीय भूमी ही लोकशाही मूल्यांच्या बाबतीत वांझ भूमी आहे, अशी इंदिरा गांधींच्या प्रचंड विजयामुळे त्यांची खात्री झाली होती. त्यामुळे हे ध्येयवादी गृहस्थ शरीरप्रकृतीने जसे खचत गेले. तसे मनानेही खचले. याचा अनिष्ट अंतिम परिणाम फार लवकर दिसून आला.

मुंबई विद्यापीठ सोडल्यानंतर पारीख मधुमेह व हृदयविकार यांनी जर्जर झालेले होते; परंतु सकाळी उठल्यापासून झोपी जाईपर्यंत निरोगी व समर्थ व्यक्तीप्रमाणे कार्यात निरंतर मग्न असत. प्रवासही खूप करत. त्यांच्या निधनाच्या अगोदरच्या दिवशी संध्याकाळी सचिवालयात 'महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळा'च्या संबंधात वार्ताहरांची बैठक भरली होती. त्यांत त्यांनी भाग घेतला होता. ही बैठक संपल्यावर मी डेक्कन क्वीनने वाईस येण्यास निघालो तेव्हा ते आग्रहाने म्हणाले, की आज जाऊ नका. दोन दिवस थांबा. मला पूर्वी त्यांनी असा आग्रह केला नव्हता. पुढचे दोन दिवस कसे जातील याबद्दल त्यांना काही चाहुल लागली असावी, म्हणून त्यांनी मला असा आग्रह केला असावा. मी त्यांच्या आग्रहाच्या मुळाशी काय भावना होती हे जाणू शकलो नाही व डेक्कन क्वीनने रात्री पुण्यास गेलो व दुसऱ्या दिवशी सकाळी वाईस पोहोचलो. सकाळी ११ वाजता मुंबईहून मंत्रालयातून तातडीचा फोन आला, की पारीख या जगातून निघून गेले. मी त्यांच्या अखेरच्या दर्शनाकरता टॅक्सी–मोटार शोधली; परंतु ती लवकर मिळू शकली नाही. म्हणून त्यांचे अंत्यदर्शन मला होऊ शकले नाही. त्या दिवशी मी रात्री १० वाजता त्यांच्या निवासस्थानी मुंबईस येऊन दाखल झालो व दुःखसमुद्रात बुडून गेलो. या आदर्श मित्राची स्मृती मला अखंड मार्गदर्शन करीत राहील, याबद्दल मला धन्यता वाटते. मी माझे हे मोठे भाग्य समजतो, की मला इतका प्रज्ञावंत व ध्येयवादी मित्र मिळाला.

---



अनुक्रमणिका








चंद्रा दलाया; अनु० मेधा नेवाळकर

प्रा० गोवर्धनदास पारीखप्रणीत –

# पहिली लोकयोजना : एक आढावा

दुसऱ्या महायुद्धाच्या काळात भारताला स्वातंत्र्य मिळणार. लवकरच आपला देश स्वतंत्र होणार हे सर्व जाणत्या मंडळींना कळून चुकले होते. अशा वेळी स्वतंत्र भारताचा विकास कशा प्रकारे करावा यासंबंधी विचारमंथन होणे अगदी स्वाभाविक होते. युद्धपूर्व काळात सोव्हिएत संघाने नियोजनाच्या मार्गाने प्राप्त केलेले यश सर्वांच्या डोळ्यासमोर होते. म्हणून भारतानेदेखील नियोजनाचा मार्ग स्वीकारून आपले विकासाचे स्वप्न साकार करावे हा निष्कर्ष नक्की झाल्यास नवल कसले ? या काळात ' मुंबई योजना ' बरीच गाजली पण रॅडिकल ह्यूमॅनिस्ट पक्षाच्या इन्डियन फेडरेशन ऑफ लेबर या संघटनेने नियुक्त केलेली समिती आणि सदर समितीने सादर केलेली ' लोकयोजना ' विशेष महत्त्वाची ठरली, हे कोणीही मान्य करील. या समितीत बी. एन्. बानर्जी, व्ही. एम्. तारकुंडे आणि गोवर्धनदास पारीख यांचा समावेश होता. गोवर्धनदास पारीख यांनी लोकयोजनेच्या दुसऱ्या आवृत्तीस लिहिलेली प्रस्तावना डोळ्याखालून घातली तर सहजपणे लक्षात येते, की या योजनेच्या जडणघडणीत पारीखसाहेबांचा वाटा सिंहाचा होता. श्री. पारीख यांनी या योजनेच्या मसुद्यात मोलाची वैचारिक भर घातली, हे निर्विवाद सत्य आहे.

या संदर्भात सदर लोकयोजना साकार होत असताना भारतासमोर कोणत्या समस्या होत्या याचा वेध घेणे उचित ठरेल. दुसऱ्या महायुद्धाच्या, काळात ब्रिटिश सरकारने जी धोरणे अंगिकारिली त्यांचा स्वाभाविक परिणाम म्हणून चलनातिवृद्धि आणि अन्नधान्याची तूट हे प्रश्न उभे राहिले. पण हे प्रश्न तुलनेने तात्कालिक होते. वाढत्या लोकसंख्येमुळे निर्माण झालेले गरिबी व बेकारी हे प्रश्न मात्र भारताच्या मुळाशी जडले आहेत का ? अशी चिंता निर्माण झाली होती. हे सारे प्रश्न सोडविण्यासाठी निर्हस्तक्षेपाचे धोरण उपकारक ठरणार नाही याबद्दल सर्व विचारवंतांचे एकमत झाले होते. भांडवलशाही देशातून निर्हस्तक्षेपाचे धोरण शिरोधार्य मानले गेले. पण त्या ठिकाणी मंदीची लाट उद्भवली व त्या लाटेचे भीषण परिणाम तिथल्या सर्वसाधारण माणसाला भोगावे लागले. उलटपक्षी सोव्हिएत संघात नियोजनाचा मार्ग श्रेयस्कर मानण्यात आला. तिथले यश लोकांचे डोळे दिपवून टाकणारे ठरले. अर्थात् लोकयोजना आखणाऱ्या विचारवंतांना सोव्हिएत नियोजनाच्या त्रुटींची कल्पना होती, हे पारीख यांनी लिहिलेल्या प्रस्तावनेचे वाचन केल्यास दिसून येते. पण निर्हस्तक्षेपाच्या धोरणाऐवजी नियोजनाचा मार्ग श्रेयस्कर आहे, याबाबतीत मात्र त्यांच्या मनात संदेह नव्हता. सन १९३६ मध्ये प्रकाशित झालेल्या केन्स्प्रणीत सैद्धान्तिक विवेचनामुळे नियोजनाच्या मार्गाला जोरदार पुष्टी मिळाली हेही या ठिकाणी मुद्दाम नमूद केले पाहिजे. तात्पर्य, देशोदेशींचा विकास करण्यासाठी नियोजनाचा मार्ग पतकरला पाहिजे व त्यासाठी आंतरराष्ट्रीय सहकार्याला प्रोत्साहन दिले पाहिजे, ही या विचारवंतांची धारणा होती. वस्तुतः ज्या वेगवेगळ्या योजना सरकारला सादर करण्यात आल्या त्या सर्वांचीच ही पार्श्वभूमी होती.

भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर आतापर्यंत पाच पंचवार्षिक योजना पूर्ण झाल्या आहेत व सहावी योजना लवकरच सुरू होत आहे. या ६ व्या योजनेवर चालू असलेली चर्चा कुणालाही लोक-

अनुक्रमणिका

योजनेची आठवण करून देईल. याच वेळी भारतीय प्रबोधन संस्थेने २ री लोकयोजना सादर केली आहे, हे या ठिकाणी उल्लेखिणे आवश्यक आहे. मूळची लोकयोजना कोणती होती, त्या: योजनेत कोणते विचारधन दडलेले होते याचा आढावा घेणे पूर्णपणे समयोचित आहे. कारण ६ वी योजना ( वरती म्हटल्याप्रमाणे ) लवकरच सुरू होत आहे व गोवर्धनदास पारीख यांची पुण्यतिथीही आता साजरी होत आहे. म्हणून मूळच्या लोकयोजनेत प्रतिबिंबित झालेले पारीख यांचे विचार अभ्यासिणे निश्चितच समयोचित आहे.

गरिबी हा भारतीय आर्थिक समस्येचा कणा आहे हे जाणून घेऊन त्याच्या विविध अंगांचा विचार लोकयोजनेमध्ये स्पष्ट केला आहे. भारतीय अर्थव्यवस्थेला सतत भेडसावणारी समस्या म्हणजे मजुरांची उत्पादनक्षमता वाढवून त्यांना लाभदायक रोजगार कसा मिळवून देता येईल आणि त्यायोगे त्यांची क्रयशक्ती कशी वाढविता येईल व वाढलेली उत्पादकता देशाचा सर्वांगीण विकास साधण्यासाठी कशी फलदायी करता येईल, ही आहे. पर्यायाने लोकयोजनेचे मूळ उद्दिष्ट हे केवळ उत्पादनवाढ करणे एवढेच न रहाता वाढीव उत्पादनाचे वितरण अधिक कार्यक्षम करून त्याचा फायदा लोकांचे राहणीमान सुधारण्यासाठी करणे ह्याला महत्त्व दिले आहे.

केवळ अवजड उद्योगधंद्यांची वाढ करून जनतेची क्रयशक्ती वाढणार नाही, यावर भर देताना लोकयोजनेत म्हटले आहे, " कृषिविकास हा देशाच्या आर्थिक जीवनाची घडी मजबूत करण्याचा पायाभूत घटक आहे " [१] दुसरे म्हणजे शेतीला महत्त्व देऊन त्याद्वारे अंतर्गत मागणीचा विस्तार करणे आवश्यक आणि उपयुक्त ठरते. ह्याचा उपयोग मजुरांना शेतीव्यवसायाकडून बिगरशेतीव्यवसायामध्ये गुंतवण्यासाठी होईल. परंतु ह्यासाठी लोकयोजनेमध्ये सांगितल्याप्रमाणे औद्योगिकीकरणावर भर देणे इष्ट आहे. " परंतु औद्योगिकीकरणाचे मूळ उद्दिष्ट हे मजूरांना लाभदायक रोजगार मिळवून देऊन आणि अस्तित्वात असलेल्या नैसर्गिक संपत्तीची उत्पादनक्षमता वाढवून राष्ट्रीय उत्पन्नात वाढ करणे, हेच असावयास पाहिजे. " [२]

शेतकी विकासाच्या संदर्भात लोकयोजनेमध्ये प्रामुख्याने जमीन मालकीची पद्धत, भूगर्भातील नैसर्गिक संपत्तीचे राष्ट्रीयीकरण, तसेच अवजड उद्योग आणि बँक व्यवसाय यांवर शासकीय नियंत्रण अंतर्भूत आहे. या ठिकाणी लोकयोजनेत राष्ट्रीयीकरण आणि शासकीय नियंत्रण कोणत्या स्वरूपाचे असावे, याचे स्पष्टीकरण दिलेले आहे. जमीन–मालकीच्या पद्धतीचे सामुदायिकीकरण म्हणजे सामुदायिक शेती नव्हे, तर लहान शेतकऱ्यांचा जमिनीचा मालकी हक्क हिरावून न घेता ( कायम ठेवून ) शासनाने त्यांना आधुनिक यंत्रसामग्री आणि अल्प दराने कर्जपुरवठा उपलब्ध करून सहकारी शेतीस प्रोत्साहन द्यावयास पाहिजे.

हिटलर आणि स्टालिन यांनी केवळ संरक्षणासाठी औद्योगिकीकरणाला महत्त्व दिले. याउलट जनकल्याणाचे ध्येय साधणे, हे औद्योगिकीकरणाचे मुख्य उद्दिष्ट जाणून घेऊन लोकयोजनेमध्ये उपभोग्य वस्तूंच्या उत्पादनाला अग्रक्रम दिला आहे. हे जनकल्याणाचे उद्दिष्ट साधण्यासाठी औद्योगिकीकरणाबरोबरच शेतीच्या यांत्रिकीकरणासाठी लागणारा पतपुरवठा शासनाने केला पाहिजे, कारण त्यामुळे औद्योगिक क्षेत्रावरील नियंत्रण सुलभ होते. केवळ नफ्यावर लक्ष केंद्रित करणाऱ्या खाजगी उद्योगधंद्यांकडून जनकल्याणासाठी लागणारे उत्पादन होऊ शकणार नाही तर खाजगी क्षेत्राला त्यांच्या गुंतवणुकीवर ३ टक्क्यांपर्यंतच्या मिळकतीची हमी देऊन देशाचा सर्वांगीण विकास साधण्यासाठी खाजगी भांडवलशाहीचा अवलंब न करता 'नियंत्रित भांडवलशाही ' ला मान्यता द्यावी.

योजनाबद्ध अर्थव्यवस्थेचे मूळ ध्येय हे सगळ्या लोकांच्या नित्य–नियमित अशा मूलभूत गरजा एका दशकात भागविण्याइतपत देश स्वयंपूर्ण करणे होय, म्हणजेच योजनेत म्हटल्याप्रमाणे, " देशातील प्रत्येकाला पुरेसा पौष्टिक आहार, पुरेसा कपडा,

१. People's Plan– Second Edition– Page 4

२. People's Plan– Second Edition– page 3

निवारा आणि रोगराई व निरक्षरतेच्या राक्षसापासून मुक्तता या सर्वांची हमी देणे, हे मुख्य उद्दिष्ट असावयास पाहिजे "[३]

योजनेमध्ये शासकीय नियंत्रणाच्या आवश्यकतेवर भर देताना "लोकशाही समाजवादा" चे ध्येय डोळ्यासमोर ठेवलेले दिसते. आणि हा "लोकशाही समाजवाद" आणावयाचा असेल तर स्वायत्त अशा घटकराज्यांनी बनलेल्या संघराज्यातील मूलभूत स्वातंत्र्य उपभोगणाऱ्या जनतेने निवडून दिलेल्या शासनाच्या नियंत्रणाची आवश्यकता असते.

ह्या योजनेमध्ये उत्पादनवाढीला महत्त्व न देता संपत्तीच्या वितरण–समस्येवर अधिक भर दिलेला आहे. ही वितरणव्यवस्था अधिक कार्यक्षम करण्यासाठी सध्या अस्तित्वात असलेली जमीनमालकीची पद्धत, कर्जबाजारीपणा नेस्तनाबूत करून सामाजिक परिस्थिती आणि उत्पादनसंबंध ह्यांमध्ये आमूलाग्र बदल घडवून आणणे आवश्यक आहे. तसेच देशातील एकूण गुंतवणूक, बँका इतर आर्थिक संस्थांचे व्यवहार योग्य प्रकारे नियंत्रित केले पाहिजेत.

वयाच्या १६ वर्षापर्यंतच्या सगळ्या मुलांना मोफत पण सक्तीचे शिक्षण देण्याची तसेच प्रत्येक नागरिकाला रोजगार हमी आणि रोजगार भत्ता देऊ करण्याचीही तरतूद या योजनेमध्ये केली आहे.

पहिल्या लोकयोजनेत वर सांगितलेली उद्दिष्टे आजच्या काळातसुद्धा पर्याप्त आणि अचूक आहेत. कारण केवळ उत्पादनवाढ किंवा औद्योगिकीकरण ही आजच्या काळाची गरज राहिलेली नाही. बेकारी व गरिबीसारख्या यक्षप्रश्नांवर मात करण्यासाठी गेल्या ३ दशकांच्या अनुभवावरून देशातील जाणकार लोकांनी शेती, उपभोग्य वस्तूंचे उत्पादन, लघु उद्योग, ग्रामोद्योगासारख्या उद्योगांना अग्रक्रम देण्याचे सुचविल्यास ती केंव्हाही स्तुत्यच आहे. आतापर्यंतच्या अनुभवावरून आलेल्या अडचणींवरून बोध घेऊन जेव्हा ६ व्या योजनेत पहिल्या लोकयोजनेत सांगितल्याप्रमाणे देशातील जनतेचे जीवनमान सुधारण्यावर आणि त्यांच्या मूलभूत गरजा पुरेशा प्रमाणात भागविण्याच्या उद्दिष्टावर भर दिला गेला, तेव्हा निश्चित असे वाटते की ६ वी योजना म्हणजे त्या पहिल्या योजनेचे एक छोटे प्रतिबिंबच उमटले आहे.

लोकयोजना ही भारताच्या आर्थिक नियोजनाचा पहिला टप्पा असल्यामुळे आणि त्या वेळी हिंदुस्थानात अचूक आणि पुरेशी आकडेवारी उपलब्ध नसल्यामुळे कच्च्या ठोकताळ्यावर आधारलेली योजना गृहीत धरण्याशिवाय गत्यंतरच नव्हते. असे असून देखील योजनेत नियोजनाला आवश्यक अशा भूगर्भातील साधनसंपत्तीचे निरीक्षण करावे, अशी सूचना केलेली आहे.

१५ हजार कोटी रु. ची ही लोकयोजना १० वर्षांच्या काळापुरती तयार केली आहे. योजनेतील खर्चाचे विभाजन खालीलप्रमाणे आहे.

### योजनेतील खर्चाच्या वितरणाचा तक्ता (१० वर्षांसाठी)

| क्षेत्र | खर्च (कोटी रु.) |
|---|---|
| शेती | २९५० |
| उद्योग | ५६०० |
| दळणवळण | १५०० |
| आरोग्य | ७६० |
| शिक्षण | १०४० |
| घर–बांधणी | ३१५० |
| | १५,००० |

शेती–विकासाला त्या मानाने कमी भांडवल लागत असल्यामुळे आणि देशातील अन्नधान्याचा साठा व लोकसंख्यावाढ ह्या दोहोंमधील दरी लक्षात घेऊन ह्या योजनेत जरी उद्योगक्षेत्रावर जास्त खर्च केलेला असला तरी कृषि–विकासालाच प्राधान्य देण्यात आले आहे. बंगालच्या जमीनमहसूल समितीच्या अहवालानुसार (१९३८) योजनेमध्ये शेतीचे उत्पादन वाढविण्यासाठी आणि त्याचा फायदा शेतकऱ्याला मिळवून देण्यासाठी सगळ्यात महत्त्वाची उपाययोजना सांगितली आहे, ती म्हणजे गैरहजर जमीनदारी आणि रयतवारी नष्ट करून त्यांना भरपाईदाखल १६३५ कोटी रु. देण्याची

३. P. P. S. E. – p. 6.

तरतूद योजनेत केली आहे. कृषि–विकास साधण्यासाठी पहिली पायरी म्हणजे शेतकऱ्यांचे कर्ज २५ टक्क्यांपर्यंत कमी करून शासनाने त्यांचा कर्जबाजारीपणा हलका करणे. "ह्या सगळ्या उपयोजनांचे फलित", लोकयोजनेत म्हटल्याप्रमाणे, "आपली अर्थव्यवस्था शेतीची उत्पादकता वाढवून तिचा फायदा शेतकऱ्यांना मिळवून देण्यामध्ये कितपत यशस्वी होईल, ह्यावर अवलंबून आहे."[४]

शेतकी उत्पादन वाढविण्यासाठी प्रकल्पित शेतीशिवाय पर्याय नाही. हे ओळखून योजनेत पाटबंधारे योजनेचा विस्तार ४००० टक्क्यांनी वाढवून त्यासाठी एकूण लागणाऱ्या ६०० कोटी रु. भांडवली खर्चाची तरतूद केली आहे. शेतीचे आधुनिकीकरण आणि यांत्रिकीकरण घडवून आणण्यासाठी सरकारी मालकीची शेते ८ ते १० हजार एकरापर्यंत वाढविण्याची योजना आहे. ह्या शेतावर वापरलेली यंत्रसामग्री आजूबाजूच्या खाजगी शेतकऱ्यांना भाड्याने द्यायला हवीत. शेतावरच कृषिविषयक संशोधन– केंद्रे स्थापन करून त्यांद्वारे शास्त्रशुद्ध पद्धतीने शेती कशी करावी ह्याचे ग्रामीण लोकांना शिक्षण देऊन त्यांचे मजबूत पथक तयार केले पाहिजे. देशामध्ये अशी साधारण २५००० शेते या योजनेच्या काळात तयार होतील. ह्यासाठी एकूण भांडवली खर्च ३७५ कोटी रु. येणार असून प्रत्येकी १,५०,००० रु. खर्च येईल, असा अंदाज आहे. ह्याशिवाय शेताचा कस कायम टिकविण्यासाठी जवळ–जवळ १२५ कोटी रु. खर्च येईल, असा अंदाज आहे. भूसंधारण आणि वनमोहीम यांसाठी योजनेत ३०० कोटी रु. राखून ठेवले आहेत. तसेच शेतकऱ्यांना पुरेशा प्रमाणात नैसर्गिक व रासायनिक खतांचा आणि सुधारित बी-बियाणांचा पुरवठा करण्यासाठी ७२० कोटी रु. ची तरतूद योजनेत केली आहे.

अन्नधान्याच्या समस्येवर मात करण्यासाठीही योजनेत नवनूतन कल्पनांचा अंतर्भाव आहे. त्यांपैकी एक म्हणजे अन्नधान्याची वितरणव्यवस्था अधिक कार्यक्षम करण्यासाठी आणि सर्वसाधारण जनतेला पौष्टिक आहार उपलब्ध करून देण्यासाठी स्वतंत्र अन्नधान्य उद्योग सुरू करण्यावर सुमारे २०० कोटी रु. खर्च येईल, अशी अपेक्षा आहे. हे गृहीत धरता १० वर्षांमध्ये कृषिविकासावरील भांडवली खर्च जमेस धरता एकूण २९५० कोटी रु. खर्च येईल, असा अंदाज आहे.

अल्प भूधारणेच्या सामुदायिकरणास उत्तेजन देताना शासनाने "शेती वैयक्तिक पण सेवा सामुदायिक," या तत्त्वावर भर दिला पाहिजे. तसेच सुरवातीस हे सामुदायिकरण ऐच्छिक ठेवणेच इष्ट ठरेल, असेही पुढे योजनेत म्हटले आहे. एवढेच नव्हे, तर ह्या शेतकऱ्यांना लागणाऱ्या पाणीपुरवठा आर्थिक इ० सोयी शासनाने पुरविल्या पाहिजेत.

वाढीव शेतकी उत्पादनाचा उपयोग उद्योगधंद्यांच्या क्षेत्रामध्ये अधिकाधिक गुंतवणूक करण्याच्या कामी व उपभोग्य वस्तूंची मागणी वाढविण्यासाठी होईल. "शेतकी सुधारणा आणि नवीन संघटना प्रस्थापित केली म्हणजे जवळ-जवळ ३०० कोटी रु. नी देशाचे उत्पन्न वाढेलच; परंतु त्याचबरोबर अंतर्गत मागणीही वाढू शकेल."[५] ह्यासाठी उपभोग्य वस्तूंच्या उत्पादनाला अग्रक्रम देणेच इष्ट ठरेल. त्यासाठी अशा वस्तूंची आयात करण्याचीही गरज भासेल. वरील विवेचनावरून एक गोष्ट ध्यानात येते की लोकयोजनेला अवजड उद्योगधंद्यांचा विकास करून औद्योगिकीकरण साधायचे नाही, तर देशाचा सर्वांगीण विकास साधण्यासाठी प्रथम मूलभूत उद्योगांचे जाळे देशात सर्वत्र पसरविले पाहिजे, हे ओळखून कापड–उद्योग, चर्मोद्योग, साखरकारखाने, तेल, औषधी वस्तू, यांसारख्या मूलभूत उद्योगांवर भर दिला आहे, आणि त्यावर साधारण ३०० कोटी रु. खर्च येईल, असा अंदाज आहे. तसेच ऊर्जा–उद्योग, लोखंड व पोलाद, खाणी, रासायनिक खते, सीमेंट, रेल्वे वॅगन्स इ. वर २६०० कोटी रु. खर्च येईल, असा अंदाज व्यक्त केला आहे. ह्या उद्योगांवरील एकूण भांडवली खर्च जवळ-जवळ ५६०० कोटी रु. येईल.

४. P. P. S. E. – p. 13.
५. P. P. S. E.– p. 17.

अनुक्रमणिका

देशामध्ये नवीन उद्योगधंदे शासनाने सुरू करून त्यावर नियंत्रण करावे याचा अर्थ खाजगी उद्योग-धंदे बंद करावेत असा नाही, तर एका बाजूला ह्या उद्योगधंद्यांमधील वस्तूंच्या किंमती आणि पुरवठा यावर शासनाचे नियंत्रण राहील तर दुसऱ्या बाजूने त्यांनी केलेल्या गुंतवणुकीवर निश्चित मोबदला मिळेल, याची हमी दिली जाईल.

योजनेत मजुराची उत्पादकता आणि एकूण रोजगार वाढविण्यासाठी शासकीय यंत्रणेच्या कार्य-क्षमतेवर तसेच लघु–उद्योग आणि ग्रामोद्योगांवर भर देण्यात आला आहे. कारण त्यामुळे बेकारीत भर न पडता उलटपक्षी अधिक फावला वेळ मिळा-ल्याने त्याचा उपयोग सांस्कृतिक विकास– जो आधुनिक युगामध्ये सर्वांगीण विकासाचा एक मह-त्त्वाचा भाग समजला जातो तो– साधण्यासाठी होईल. कदाचित् जास्तीत–जास्त रोजगार पुरवू शकणाऱ्या लघु–उद्योग व ग्रामोद्योगांचा विकास करणे ( आर्थिकदृष्टचा ) शासनाच्या आवाक्या-बाहेरील वाटले तर शासनाने नियंत्रित केलेल्या खाजगी क्षेत्रावर ते सोपवावेत.

पुरेशा प्रमाणात वाहतूक व दळणवळणाची साधने उपलब्ध केल्याशिवाय शेती–विकास सुलभ होणार नाही, हे ओळखून योजनेत ७० टक्क्यांनी मीटरगेज रेल्वे वाहतूक, १६० टक्क्यांनी रस्ते-बांधणी, जहाज व बंदरे वाढविण्याची सूचना केली आहे. तसेच दूरध्वनी आणि पोस्ट व तार यंत्रणा २०० टक्क्यांनी वाढविण्याचे योजनेत सुचविले आहे. ह्यावर अंदाजे १४२० कोटी रु. भांडवल आणि शिवाय ८० कोटी रु. त्यावर होणारा वारंवार खर्च, इतका खर्च येईल. लोकांना पुरेशा प्रमाणात वैद्यकीय, समाजकल्याण आणि शैक्षणिक सोयी उपलब्ध करून देण्याच्या दृष्टीने दर हजारी एक दवाखाना आणि दर १० हजार लोकांच्यासाठी एक अद्ययावत रुग्णालय बांधून देण्याची तरतूद योजनेत करण्यात आली आहे. शहरांमध्ये १५० अद्ययावत सोयींनी युक्त अशी रुग्णालये आणि आरोग्य केंद्रे सुरू करण्याची योजना आहे. ह्यावर सुमारे २३१ कोटी रु. भांडवल गुंतवावे लागेल. शिवाय वारंवार लागणारा खर्च सुमारे २२८ कोटी रु. येईल असा अंदाज आहे.

वैद्यकीय सोयींशिवाय योजनेत शहरे आणि खेड्यांमध्ये पाणी-पुरवठ्याची साधने उपलब्ध करून देण्यासाठी एकूण ३०० कोटी रु. खर्चाचा अंदाज आहे. तसेच प्राथमिक आणि माध्यमिक शाळेत दर २५-३० विद्यार्थ्यांच्या मागे एक, याप्रमाणे शिक्षक असावयास पाहिजेत. शहरी भागामध्ये शाळा आणि उच्च व तांत्रिक शिक्षणाच्या अधिक सोयी करून द्यायला पाहिजे आहेत. ह्यासाठी शिक्षणावर एकूण ४३८ कोटी रु. भांडवली खर्च व ३९१ कोटी रु. नित्य खर्च दाखविण्यात आला आहे. तसेच वाचनालये, रेडिओ आणि खेळ यांवर सुमारे १३५ कोटी रु. खर्च करण्यात येईल. ह्या आकडेवारीवरून एक गोष्ट ध्यानात येते की मुलांच्या बुद्धीला पोषक असे खाद्य देऊन देशाची पुढची पिढी निरोगी आणि बुद्धिमान घडविण्यासाठी योजनेत शिक्षणावर भर दिला गेला आहे. भारतीय लोकशाहीचे भवितव्य कायम प्रौढ शिक्षणाचा विस्तार करून निरक्षरतेच्या राक्षसाचे कितपत उच्चाटन होईल, यावर अवलंबून आहे.

साध्या निवाऱ्याच्या समस्येची गंभीरता लक्षात घेऊन योजनेत घरबांधणीवरही लक्ष केंद्रित केले आहे. त्यानुसार दरडोई १०० स्क्वेअर फुटाची जागा देण्याचे योजनेचे उद्दिष्ट असून तेवढी जागा बांधण्यासाठी खेड्यामध्ये साधारण ७०० कोटी रु. खर्च येईल. खेड्यातील सगळ्या लोकांना अशी घरे बांधून देण्यासाठी सुमारे २७०० कोटी रु. खर्च येईल, असा अंदाज आहे. ही आकडेवारी शहरांमध्ये ४५० कोटी रु. अशी आहे.

योजनेमध्ये दहा वर्षांसाठी लागणारे एकूण १५००० कोटी रु. भांडवल कसे उभे करायचे, ह्यास ४ पद्धती सांगितल्या आहेत. योजनेतील तक्त्याप्रमाणे पहिल्या ३ वर्षांकरिता लागणारा प्राथमिक भांडवली खर्च १६०० कोटी रु. पर्यंत कमी करण्यात आला आहे. याउलट पहिल्या ५ वर्षां-मध्ये शेतीवरील एकूण खर्च ६६ टक्क्यांनी वाढविण्यात आला आहे. लघु उद्योग व ग्रामोद्योग यांना प्राधान्य दिल्यामुळे आपोआपच अधिक रोजगार उपलब्ध होऊन उत्पादनाला वेग येईल. त्यामुळे अशी आशा बाळगण्यास काहीच हरकत नाही, की एकदा उत्पादनाचा वेग वाढला की

अनुक्रमणिका

वेगवेगळया क्षेत्रांमध्ये आधिक्य (वस्तूंचे) उपलब्ध होईल आणि त्याचा फायदा, आपली अर्थव्यवस्था आर्थिक दृष्टचा स्वयंपूर्ण होण्यासाठी हातभार लागेल. योजनेच्या अंदाजाप्रमाणे १० वर्षांमध्ये शेतीमध्ये एकूण २२, ३०० कोटी रु., मूलभूत उद्योगांमध्ये सुमारे ३०४६ कोटी रु. आणि उपभोग्य वस्तूंच्या उत्पादनामुळे ३३७७ कोटी रु. अधिक उत्पन्न येईल आणि "ह्या एकंदर २८,७२३ कोटी रु. अधिक उत्पन्नाचा फायदा योजनेच्या कार्यक्रमाला मिळवून द्यावयाचा आहे."[६] जमीनदारांना दिलेला सारा, सावकाराचे उत्पन्न हे सगळे शासनाला मिळवून देऊन त्याचा उपयोग भारत शेतीच्या बाबतीत स्वयंपूर्ण करण्यासाठी करण्यात येईल. जमीन मालकीच्या पद्धतीमध्ये आमूलाग्र बदल घडवून आणून योजनेअखेर खेड्यातील लोकांचे दरडोई उत्पन्न १२१ रु. पर्यंत वाढविता येईल असा अंदाज आहे. आणि ह्या वाढीव उत्पन्नाचा उपयोग शेतीला लागणारी गुंतवणूक शेती–क्षेत्रामध्येच निर्माण करण्याच्या दृष्टीने होईल.

शेतीप्रमाणेच योजनेमध्ये उद्योगक्षेत्रातील उत्पादन आणि उत्पन्न यांविषयी काही ठोकताळे बांधले आहेत. पुढील १० वर्षांमध्ये उद्योग क्षेत्रातील उत्पन्न सुमारे ९४२३ कोटी रु. येईल, असा अंदाज आहे. त्यापैकी ४४ टक्के उत्पन्न उद्योगक्षेत्र विस्तारित करण्याच्या दृष्टीने गुंतविले जातील व योजनेच्या शेवटच्या वर्षी एकूण उत्पन्नाच्या ३० टक्के उत्पन्न योजनेचे पुढील कार्यक्रम राबविण्यासाठी करण्यात येईल. आणि त्याचा उपयोग शहरी माणसाचे दरडोई उत्पन्न १७२ रु. पर्यंत करता येईल. शेती आणि उद्योगावरील योजनेचा एकूण आराखडा आपल्याला या निष्कर्षापर्यंत पोहोचवितो की ही लोकयोजना विविध वस्तूंच्या आधिक्यावर राबविण्यात येणार आहे. येथे एक बिकट समस्या आपल्याला येणार आहे. ती म्हणजे हे आधिक्य कसे निर्माण करावयाचे आणि त्याचा उपयोग गुंतवणुकीसाठी कसा करावयाचा. ह्या समस्येवर विचार करताना योजनेमध्ये म्हटले आहे, की पुष्कळसे उद्योग सरकार-नियंत्रित असल्यामुळे उद्योगक्षेत्राच्या बाबतीत ही समस्या तितकीशी भासणार नाही. कारण रशियाप्रमाणे बड्या उद्योगधंद्यांकडून ते वार्षिक उलाढाल कराच्या रूपाने मिळविता येईल परंतु खरी कसोटी लागणार आहे ती शेतीच्या बाबतीत. कारण सामुदायिक शेतीच्या मोहिमेने हल्ली जोर धरलेला आहे. अर्थात् राज्यामध्ये शेतजमिनीवरील करातून केंद्रिय मदत मागून योग्य आधिक्य निर्माण करता येणे शक्य आहे. परंतु तरीसुद्धा "आर्थिक विकासाचा वेग हा आधिक्य किती प्रमाणात उपलब्ध करता येईल, यावर अवलंबून असल्यामुळे शेती क्षेत्रामधील गुंतवणुकीची समस्या बिकट रहाणार आहे."[७] पण राज्यामधील आधिक्याच्या एकत्रीकरणाची प्रक्रिया आणि देशातील लोकांचे राहणीमान यांचा फार घनिष्ठ संबंध आहे. "शिवाय शिल्लक राहिलेले उत्पन्न देशाच्या आर्थिक व सामाजिक घडीमध्ये आमूलाग्र बदल घडवून आणण्यासाठी होईल."[८]

योजना राबविण्यासाठी पहिल्या ३ वर्षांसाठी येणाऱ्या १६०० कोटी रु. भांडवल खर्चापैकी ३४० कोटी रु. जमिनीचे राष्ट्रीयीकरण करून, शेतसाऱ्याच्या वसुलीतून जमा करण्याचे योजनेत ठरविले आहे. तसेच आणखी ४५० कोटी रु. स्टर्लिंगच्या शिलकीतून आणि उरलेले ८१० कोटी रु. शासनाकडून मिळतील असा अंदाज आहे. या प्रमाणेच योजनेमध्ये कर आकारण्याच्या पद्धतीवरही भर दिला आहे. उच्चस्तर लोकांच्या मिळकतीवर जादा उत्पन्न-कर, संपत्ति-कर आणि मालमत्ता-कर लादल्याचीही योजनेत सूचना केली आहे. अचूक आकडेवारीच्या अभावी ह्या करांद्वारा किती महसूल जमा होईल ह्याचा निश्चित अंदाज योजनेत करता आला नाही. तरी हा महसूल राज्यांकडून वाढीव करपद्धती आकारून जमा करता येईल, असे योजनेत म्हटले आहे. हे शक्य न झाल्यास शासन बड्या कारखानदारांचा संचित राखीव निधी वापरू

६. P. P. S. E. – p. 39.
७. P. P. S. E.– p. 39.
८. P. P. S. E. – p. 44

शकेल किंवा उच्चस्तर वर्गावर सक्तीच्या ठेवीसुद्धा लादू शकेल.

अंतर्गत भांडवलाबरोबरच शेतकी वस्तूंची निर्यात करून त्यांच्या उत्पन्नाचाही उपयोग देशात अंतर्गत सुव्यवस्था निर्माण करण्यासाठी करता येईल. योजनेमध्ये कोणकोणत्या पद्धतीने किती-किती पैसा उभा करता येईल, याचा तपशील दिला आहे, तो खालीलप्रमाणे आहे.

| पद्धती | कोटी रु. |
|---|---|
| १. स्टर्लिंग शिल्लक | ४५० |
| २. कर आकारणीमधून अंतर्गत उत्पन्न | ८१० |
| ३. जमिनीचे राष्ट्रीयीकरण (योजनेच्या सुरुवातीच्या काळात) | ९० |
| ४. १० वर्षामध्ये शेतीवर झालेली गुंतवणूक | १०,८१६ |
| ५. उद्योग क्षेत्रातील गुंतवणूक | २८३४ |
| एकूण | १५,००० |

वरील तक्त्यावरून एक गोष्ट स्पष्ट होते, की योजना यशस्वी रीत्या राबविण्यामध्ये विशेषतः शेती क्षेत्रातील उत्पन्नाच्या आधिक्याचा वाटा फार मोठा आहे.

तसेच नित्योपयोगी वस्तूंचे वितरण अधिक कार्यक्षम आणि सुलभ करण्यासाठी नफा–केंद्रित खाजगी उद्योगधंद्यांपेक्षा देशव्यापी उत्पादक–ग्राहक सहकारी संघटनांचे जाळे पसरविणे आवश्यक आहे. सध्या चालू असलेली वितरण व्यवस्था अशीच पुढे चालू ठेवली तर देशाची अर्थव्यवस्था कोलमडल्यास नवल ते काय ? योजना यशस्वी करण्यासाठी वितरण व्यवस्थेबरोबरच वर सांगितल्याप्रमाणे किंमती नियंत्रित करून पण त्याचबरोबर खाजगी उद्योगधंद्यांना ३ टक्क्यापर्यंत निश्चित मोबदला देऊन उत्तेजन द्यावे.

लोकयोजनेच्या वरील विश्लेषणावरून असा निष्कर्ष निघतो, की नियोजन आणि विकास हे एका विशिष्ट काळापुरते मर्यादित न रहाता तो एक अखंड आणि निरंतर आक्रमावयाचा मार्ग आहे. 'लोकयोजनेचे मूळ उद्दिष्ट देशातील लोकांचे राहणीमान उंचावणे एवढेच नव्हे, तर भविष्यकाळातही ते उंचावतच राहील, या दृष्टीने प्रयत्न करणे,' हे आहे लोकयोजनेत म्हटल्याप्रमाणे दर वर्षी लोकांचे राहणीमान गतवर्षापेक्षा उंचावण्याकडेच योजनेचे लक्ष केंद्रित झाले आहे. योजनेमध्ये ह्या उद्दिष्टाला प्राधान्य देण्याचे मूळ कारण म्हणजे राहणीमान उंचावल्यामुळे लोकांच्या दैन्याला आपोआपच पूर्णविराम बसेल व त्यामुळे देशातील सर्वसाधारण माणसाचे जीवनमान ४ पटींनी सुधारेल, यात शंका नाही. "ह्यामुळे जगातील इतर देशांच्या सर्वांगीण (सामाजिक आणि सांस्कृतिकसुद्धा) विकासाशी बरोबरी करण्याच्या हेतूने त्या दिशेकडे हनुमान उडी घेण्यासाठी लोकांच्या मनात विकासाची कळकळ आणि उत्साह निर्माण केला जाईल".[८]

आतापर्यंत लोकयोजनेचे स्वरूप थोडक्यात सांगितले ह्या स्वरुपावरून लोकयोजनेचे मूळ ध्येय रशिया आणि जर्मनीमध्ये नियोजनात ज्या अडचणी आल्या त्या टाळून स्वतंत्र भारतामध्ये लोकशाही समाजवादाचे स्वप्न साकार करणे, हे होय. ह्या योजनेचे आणखी वैशिष्टय म्हणजे देशातील श्रीमंत आणि गरिबांतील विषमता नष्ट करून समाजामध्ये न्याय व साम्यवाद प्रस्थापित करणे आणि प्रत्येकाला जास्तीत जास्त स्वातंत्र्य देऊन त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा सर्वांगीण विकास साधण्याच्या हेतूने उद्याचा भारत घडविणे, ही योजनेतील तत्त्वज्ञानाची बैठक असलेल्या सामाजिक व आर्थिक ध्येय आणि धोरणामागील प्रमुख भूमिका आहे. श्री. एम्. एन्. रॉय आणि इतर रॅडिकल ह्यूमॅनिस्ट प्रभृतींनी ही भूमिका स्वीकारून आणि तिजवर श्रद्धा ठेवून योजनेला निश्चित स्वरूप दिले आहे. या दृष्टीने स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या आतापर्यंतच्या ५ योजनांपेक्षा लोकयोजना निश्चितच वेगळी आहे. पहिल्या योजनेत 'मिश्र अर्थव्यवस्थे'ची संकल्पना मांडली होती, आणि समाजवादाचा उदो–उदो होत होता. तरीसुद्धा प्रत्यक्षात मात्र त्याचे काहीच पडसाद उमटले नाहीत. त्यामुळे ह्या सगळ्या योजना फसलेल्या दिसतात. नियोजनाचे यशापयश हे नियोजनाचे स्वरूप आणि ते राबविण्याचे कसब यांवर अवलंबून असते. ह्या कसोटीला लोकयोजनेना संपूर्णपणे उतरलेली आपणास वरील विवेचनावरून सहज लक्षात येते.



अनुक्रमणिका

गरीबी आणि बेकारी या दोन समस्यांवर सतत बोट ठेवून लोकयोजनेत केवळ उत्पादनवाढ किंवा विकासाचा वेग वाढविण्यावर भर न देता सर्व-साधारण माणसाचे जीवनमान सुधारण्याच्या हेतूने उत्पादनवाढीचा फायदा त्याला लाभदायक रोज-गार मिळवून देण्यासाठी केला पाहिजे, यावर भर दिला आहे.

यानंतर लोकयोजनेत योजना प्रत्यक्षात उतर-विण्यासाठी विविध पातळीवर कार्यक्षम नेत्यांची एक सेनाच उभी केली पाहिजे. खेडचांत आणि शहरांमध्ये मध्यवर्ती संस्थेच्या शाखांतून स्थानिक नेतृत्व निर्माण करणे आवश्यक आहे. विकासाचा मार्ग हा बव्हंगी असल्यामुळे सामाजिक, मानसिक आणि राजकीय परिवर्तन घडवून आणण्यासाठी स्थानिक पातळीवरील नेतृत्वाच्या दृष्टिकोणामध्ये बदल घडवून आणणे आवश्यक आहे; पण अनु-भवावरून असे सिद्ध झाले आहे, की आर्थिक विकासाच्या समस्येवर मात करण्यासाठी एकसंधी आणि परिणामकारी नेतृत्वाशिवाय पर्याय नाही.

ही योजना राबविण्यासाठी लागणारे आधिक्य लोकांची उत्पादकता वाढवून आणि त्यांना लाभ-दायक रोजगाराची हमी देऊन निर्माण केली पाहिजे. ६ व्या योजनेतील शेतीविषयक आणि उपभोग्य वस्तूंचे उत्पादनविषयक धोरण लोकयोजनेला अनु-सरूनच आहे.

लोकयोजनेचे मुख्य गमक असे आहे, की विकास ही एक अखंड चालणारी प्रक्रिया असून ती देशातील सर्वसाधारण जनतेचे जीवनमान आणि कार्यक्षमता सुधारल्यावर साधता येईल. परंतु गेल्या ३० वर्षांत या मुख्य उद्देशाकडे दुर्लक्ष झाल्यामुळे आपले नियोजन फसले आहे, असे म्हटल्यास वावगे होणार नाही.

योजनेचा आराखडा तयार करताना तिच्या अंमलबजावणीविषयी खात्री नव्हती; पण लोक-योजनेमध्ये शासकीय यंत्रणेमध्ये काही निश्चित सुधारणा करण्याच्या दृष्टीने विचार केलेला असल्यामुळे तो नियोजनाच्या दृष्टीने पहिला प्रयत्न मानला गेला. पुरेशी आकडेवारी उपलब्ध नसल्यामुळे निश्चित ठोकताळे बांधण्यामधील अड-चणींची त्यांना जाणीव होती. चालू योजनेशी तुलना करता या योजनेची कार्यकक्षा खूपच लहान असून-देखील तिचे स्वरूप सुस्पष्ट आणि निश्चित आहे. लोकयोजनेच्या काही संकल्पना जरी अंमलात आणल्या असत्या, तरी नियोजनाचा मार्ग अधिक सुकर झाला असता. दुर्दैवाने ही योजना रॅडिकल ह्यूमनिस्ट पार्टीची असल्यामुळे व ही पार्टी आणि अधिकारारूढ पक्षाचे संबंध घनिष्ठ नसल्यामुळे ह्या योजनेकडे द्यावयास पाहिजे तितके लक्ष दिले गेले नाही. या योजनेकडे लक्ष दिले गेले असते, तर आपल्या नियोजनाच्या प्रक्रियेमध्ये निश्चितच बदल दिसून आला असता.

पहिली लोकयोजना हीच प्रा. पारीखसाहेबांच्या सर्वांगीण व्यक्तिमत्त्वाला आदरांजली आहे. त्यांचा वाचनाचा व्यासंग दांडगा तर होताच; पण त्याबरो-बरच एखाद्या समस्येचे संपूर्ण आणि सुस्पष्ट विश्लेषण करण्याची त्यांची बौद्धिक कुवतही तितकीच दांडगी होती. आणि लोकयोजनेत आपल्याला त्याची प्रची-तीही येते. दुर्दैवाने प्रा. पारीखांचा स्वभाव आपल्या कल्पना दुसऱ्यावर लादण्याचा नव्हता. इतरांच्या विवेकबुद्धीवर दृढ विश्वास त्यांनी ही योजना लोकांच्या गळी उतरविण्याचा प्रयत्न न केल्यामुळे लोकयोजना लोकप्रिय होऊ शकली नाही.

भारतीय प्रबोधन संस्थेने आखलेल्या २ ऱ्या लोककल्याण योजनेत पहिल्या योजनेत योग्य ते बदल करून आजच्या परिस्थितीला अनुरूप अशी २ री योजना तयार केली आहे. ह्या योजनेत गेल्या ३ तपांच्या नियोजनाच्या आधारे लोकांच्या अत्या-वश्यक गरजा भागविण्यासाठी जास्तीत जास्त रोजगार संधी निर्माण करण्यावर भर दिला आहे. तसेच आर्थिक नियोजनातील धोरणाची आणि उद्दि-ष्टांची पुनर्बांधणी आणि नूतनीकरण करण्यासाठी शेती आणि नित्योपयोगी वस्तूंच्या उत्पादनाला अग्रक्रम देण्यात आला आहे. ह्या योजनेची रचना, पहिल्या योजनेतील कल्पनांची या योजनेत केलेली स्वीकृती आणि आतापर्यंतच्या नियोजनाच्या अनुभवावरून पहिल्या योजनेत केलेल्या सूचनांचा फेरविचार, हीच पहिल्या योजनेला आणि ज्यांनी ती मांडण्यासाठी प्रयत्न केले, त्यांना योग्य आदरांजली आहे.

गोविंद तळवलकर

# वृत्तपत्रीय संसाराचे प्रश्न

प्रा. गोवर्धन पारीख यांचा एम. एन. रॉय यांच्या 'इंडिपेंडंट इंडिया' व पुढे 'रॅडिकल ह्यूमॅनिस्ट' या साप्ताहिकांशी संबंध होता. प्राज्ञ पाठशाळेच्या 'नवभारत'शीही ते निगडित होते आणि इतर काही नियतकालिकांशी त्यांचे जवळचे संबंध असतील. परंतु बडया वृत्तपत्र प्रकाशन संस्थेशी त्यांचा संबंध आला तो ते बेनेट कोलमन कंपनीचे संचालक झाले तेव्हा. पारीख हे विचारवंत खरे, पण व्यवहाराची त्यांना उत्तम जाण होती आणि बेनेट कोलमन कंपनीच्या संचालक मंडळाच्या बैठकीत ते मनापासून भाग घेत व त्यांच्या सूचनांचा इतर संचालक मान राखीत. या कंपनीतर्फे प्रसिद्ध होणाऱ्या दैनिकांची व नियतकालिकांची व्यावहारिक बाजू पाहाणे हे संचालक मंडळाचे मुख्य काम होते, वृत्तपत्रीय धोरणाची चर्चा करून संपादकांना मार्गदर्शन करण्याची जबाबदारी मंडळावर नव्हती. संचालक मंडळात विविध व्यवसायांतील व विविध राजकीय मतांचे सदस्य होते आणि यात तत्कालीन सरकारनेच नेमलेल्या तिघांचा समावेश होतो. परंतु मंडळातील कोणाही संचालकाने व्यक्तिशः व संघशः कोणत्याही संपादकावर विशिष्ट धोरण स्वीकारण्याची कधीही सूचना केली नाही, मग दडपण आणण्याचे तर नावच नको. हे अर्थात स्वानुभवपूर्वक मी सांगत आहे आणि ते सांगण्याचा हेतू आधुनिक वृत्तपत्र व्यवसाय कसा चालतो, याची काही कल्पना द्यावी हा आहे.

अर्थात आणीबाणी आल्यावर परिस्थिती पालटली. बेनेट कोलमन कंपनीच्या संचालकांनी कायदेशीर सल्ला घेऊन असे ठरविले, की सरकारने वृत्तपत्रांसाठी जी मार्गदर्शक तत्त्वे जाहीर केली होती ती तंतोतंत पाळावी, तसेच वेळोवेळी ज्या सूचना येतील त्या पाळाव्या. या तत्त्वांचा वा सूचनांचा भंग झाल्यास कंपनीवरच गंडांतर येईल व ते टाळावे अशी संचालक मंडळाची भूमिका होती. आपल्या या धोरणांची स्थूल रूपरेषा मांडल्यानंतर कोणत्याही संचालकाने किंवा व्यवस्थापकांनी संपादकीय कारभारात ढवळाढवळ केली नाही. या मर्यादेत राहून आपल्या वृत्तपत्राचा सूर व नूर कोणता ठेवावा, हे त्या त्या संपादकावर अवलंबून ठेवण्यात आले होते आणि संपादकांनी त्यांच्या प्रवृत्तीप्रमाणे आपले कर्तव्यच बजावले. सध्या आणीबाणीत आपण किती वृत्तपत्रीय स्वातंत्र्य प्रगट केले याचे आढावे घेण्याची स्पर्धा चालली आहे. विशेषतः जे पत्रकार तुरुंगात गेले त्यांच्यापेक्षाही जे तसे गेले नाहीत आणि ज्यांनी सुखेनैव नोकऱ्या केल्या, आकाशवाणी, दूरदर्शन यांच्याकडे रतीब घातला तेच या स्वातंत्र्याची चर्चा करण्यात पुढे असतात. आणीबाणीचा काळ नुकताच संपला असल्याने हे अपरिहार्य आहे व म्हणून त्या काळातील विविध वृत्तपत्रांच्या लिखाणाची छाननी निःपक्षपातीपणे आज होणे अशक्य आहे. तथापि आता आणीबाणी पुकारण्याच्या केंद्रीय मंत्रिमंडळाच्या अधिकाराचाच फेरविचार होत असल्याने वृत्तपत्रांचा संसार कसा चालावा व सुधारावा; यात अडचणी कोणत्या आहेत? याचा ऊहापोह करणे योग्य ठरेल.

आणीबाणीच्या संबंधात एक मुद्दा येथे मांडला पाहिजे. तो म्हणजे, उदारमतवादी विचारांच्या विरुद्ध वातावरण तयार करण्यात अनेक पक्ष व व्यक्ती यांनी घेतलेला भाग. श्रीमती इंदिरा गांधी यांनी आपल्या हातात प्रचंड सत्ता आणीबाणीत हाती घेतली ती एकाएकी नव्हे. ती एक प्रक्रिया होती व ती ६९ साली काँग्रेस फुटण्यापासून सुरू झाली. गरिबांचे कल्याण, समाजवाद यांच्या घोषणा देत व्यक्तीचे महत्त्व व स्वातंत्र्य कःपदार्थ मानणारे विचार मांडले

अनुक्रमणिका








गेले. भांडवलदार हे चोर व लुटारू ठरविण्यात आले, शेतकरी थोडा सधन झाला की तो कुलक व म्हणून समाजद्रोही ठरला, काँग्रेस पक्षात समाजवादाची जपमाळ ओढीत नव्हते, ते सर्व प्रतिगामी ठरले आणि समाजवाद मानणाऱ्या काँग्रेसजनांच्यातही जातिभेद केला गेला. यामुळे पक्ष खिळखिळा झाला, भांडवलदार चोर, लुटारू म्हणून त्यांची वृत्तपत्रे ही सामान्य जनतेच्या हितावर निखारे ठेवणारी ठरली. न्यायालयांचे अवमूल्यन झाले. मग कोणतेही उपद्व्याप करून निवडून येणारे लोकप्रतिनिधी हेच सर्व शहाणपणाचे आणि समाजहिताचे मक्तेदार झाले. संसद सार्वभौम ठरवून न्यायालयीन आढाव्यास ( ज्युडिशियल रिव्हयू ) विरोध करण्यात नाथ पै यांनी पुढाकार घेतला. सरकारी धोरणावर अंकुश ठेवणारे हे विविध घटक नामोहरम करण्यात येऊन निवडून येणे हेच महत्त्वाचे ठरले, मग जी व्यक्ती अधिकाधिक उमेदवारांना निवडून आणते किंवा अधिक प्रमाणात निवडून आलेल्या उमेदवारांचा पक्ष ज्यास आपला नेता मानतो, तो सर्वोच्च ठरला तर नवल नाही. इंदिरा गांधी या वातावरणात सर्वोच्च पदावर आल्या आणि पक्ष, पत्रे व न्यायालये यांची लांडगेतोड त्यांच्या हिताची ठरली. त्या जेव्हा या सर्वांवर टीकास्त्र सोडीत किंवा आपल्या पक्षातल्या पुढाऱ्यांचे हातपाय बांधण्याची व्यवस्था करीत; तेव्हा अनेक विरोधी पक्षांच्या पुढाऱ्यांना पुत्रलाभाचा आनंद होत होता. पण या मागे आपण येथे अनुदारतेचे वातावरण तयार करीत आहोत, एकछत्री अंमल आणण्यास अनुकूल भूमी तयार करीत आहोत याची दखल घेण्याचे त्यांना भान नव्हते आणि दुसऱ्या कोणी करून दिले तर ऐकण्याची मनःस्थिती नव्हती. तेव्हा आणीबाणी पुकारून सर्व सत्तेचे केंद्रीकरण करताना आणि लोकांच्या स्वातंत्र्याची गळचेपी करताना इंदिरा गांधींना त्यांच्या पक्षीय सहकाऱ्यांनी विरोध केला नाही हे चूकच होते, पण हे सर्व करण्यास अनकूल पार्श्वभूमी तयार करण्यामध्ये अनेक काँग्रेस विरोधी पक्षीयांचाही मोठा हात आहे हे नाकारून चालणार नाही. यावरून धडा घ्यावयाचा तो हा, की समाजातील विविध घटकांना मोकळेपणा देऊन एकमेकांवर अंकुश ठेवण्यास त्यांना वाव मिळाला पाहिजे. ज्या समाजातील विविध घटक अशा रीतीने एकमेकांवर अंकुश ठेवण्याइतके समर्थ राहू शकत नाहीत, त्यांचा तोल जातो. तसा तो आणीबाणीत गेला. तो जाण्याची पूर्वतयारी करण्यात अनेक पक्षांचा हात होता. समुदायशाहीचे राजकारण, सवंग लोकप्रियतेचा ध्यास आणि मतभेद याचा अर्थ कोणत्यातरी हितसंबंधाचे प्रतिनिधित्व व म्हणून ते समाजहित-विरोधी अशी सोपी व सोयीची भूमिका राजकीय पक्षांनी घेतली, ती खऱ्या लोकशाहीला अनुकूल नव्हती व यापुढे घेतली गेली तर ही लोकशाही वाढणार नाही. आता नव्या वातावरणात वृत्तपत्रीय स्वातंत्र्याचा विचार करताना हा सारा संदर्भ लक्षात घेणे आवश्यक आहे: हा समाज एकजिनसी नाही आणि एकसाची अर्थव्यवस्था येथे नाही. यामुळे समाजातील विविध संस्था, संघटना यांना वाढू देऊन विविध विचार प्रगट करण्यास मोकळीक दिली तरच लोकशाही स्वातंत्र्याचा विकास होऊ शकेल. वृत्तपत्रीय स्वातंत्र्याचा विषय निघाला, की आजकाल वॉटरगेट प्रकरणी अमेरिकन पत्रकारांनी दाखविलेल्या धैर्याचा उल्लेख होतो. पण केवळ 'वॉशिंग्टन पोस्टा'च्या दोन पत्रकारांच्या धैर्याने वॉटरगेट प्रकरणाची तड लागणार नव्हती. ती लागण्यासाठी सिरिका यांच्यासारखा न्यायाधीशही हवा होता. अमेरिकन समाजातील अनेक घटक आपापली कर्तव्ये बजवावयास पुढे आले, तेव्हा निक्सन पदच्युत झाले. यासाठी त्या समाजात न्यायालये, वृत्तपत्रे यांचे खच्चीकरण झाले नव्हते आणि तेथे वृत्तपत्रे भांडवलदारांच्या हाती आहेत आणि समाजात समाजवादी विचार रुजलेले नाहीत.

आता नव्या परिस्थितीत भारतातील वृत्तपत्रांच्या स्वातंत्र्याचा विचार करताना पुन्हा जर समुदायवादी तत्त्वज्ञानाचाच आश्रय केला जाणार असेल, तर स्वातंत्र्याला पोषक असे वातावरण तयार होणे शक्य नाही. या प्रश्नांचा विचार करताना पहिला मुद्दा उपस्थित होतो तो मालकीचा. काही वैयक्तिक मालकीची लहानमोठी पत्रे आहेत, काही विश्वस्त निधींची आहेत. लहान, मध्यम व मोठी अशी पत्रे असून त्या प्रत्येकाचे प्रश्न वेगळे आहेत. वृत्तपत्रांच्या मालकीच्या बाबतीत बड्या भांडवलदारांचे दडपण नसावे, हा सर्वसामान्य विचार अनेकदा बोलून दाखविला जातो.

यात संपादकावरील दडपणाचाच निषेध अभिप्रेत असेल, तर लहान व मध्यम पत्रांचे मालक आपल्या संपादकावर दडपण आणीत नाहीत असे नव्हे. किंबहुना या मालकांवर त्यांच्या जिल्ह्यातील अनेकांची दडपणे असतात व त्यांची झळ संपादकांनाही लागते. म्हणून संपादकीय स्वातंत्र्य केवळ बडे मालक धोक्यात आणतात ही चुकीची समजूत आहे. गावाच्या वा जिल्ह्याच्या पुढाऱ्यापासून राज्याच्या पुढाऱ्यापर्यंत कोणाच्याही दडपणाला बळी पडण्यात सर्वांत लहान पत्रांचा नंबर लागेल. त्यात त्यांचा दोष नव्हे. पण लहान व मध्यम पत्रांमुळे स्वातंत्र्य टिकते हा जो विचार अनेक पत्रकार आणि राजकीय पुढारी मांडीत असतात, तो निखालस चुकीचा आहे हे मात्र नमूद करणे भाग आहे.

लेखाच्या प्रारंभीं बेनेट कोलमन कंपनीच्या चालकांच्या धोरणाचा उल्लेख केला आहे. पण याचा अर्थ सर्वत्र बड्या पत्रांचे चालक असेच वागतात असे नव्हे. काहीवेळा चालक वा मालक बराच हस्तक्षेप करतात, काहीवेळा मॅनेजर वा मॅनेजिंग डायरेक्टर ढवळाढवळ करतात असे अनेक वडी पत्रे तपासल्यास दिसून येईल. एक मॅनेजिंग डायरेक्टर आपल्या पत्रकारांना बरेच जरबेत ठेवीत असले, तरी वृत्तपत्रीय स्वातंत्र्यावर भाषणे देत असतात. आणीबाणीत त्यांनी फार धैर्य दाखविले म्हणून त्यांचा गौरवही होतो. वास्तविक गौरव करावयाचा तर त्यांच्या पत्रांच्या संपादकाचा करावयास हवा. कारण संपादकाने धैर्य दाखविले नसते तर उपयोग काय ? शिवाय संपादकाऐवजी मॅनेजिंग डायरेक्टरचा गौरव करावयाचा आणि वर संपादकीय स्वातंत्र्याच्या पुरस्कर्त्याचा आव आणावयाचा ही विसंगतीच आहे.

हे सर्व लक्षात घेता वृत्तपत्रीय मालकीचा प्रश्न सोडविताना ठराविक पद्धतीनेच विचार करून चालणार नाही. यासंदर्भात मालकी हक्काचे विभाजन यासंबंधी बरेच बोलले जाते. तेव्हाही गोलमाल भाषा वापरण्यात येते. गेले सरकार याबाबतीत एक विधेयक आणणार होते. पण तेव्हा घटना दुरुस्त झाली नसल्याने ते विधेयक टिकले नसते. आताही हीच परिस्थिती होईल. मग मालकीचे स्वरूप काय असावे ? याबाबत अनेक देशांत अनेक प्रकार आहेत: ब्रिटन-अमेरिकेत खाजगी मालकी मोठ्या प्रमाणावर आहे. अर्थात काही विश्वस्तनिधीची पत्रे आहेत. जपानमध्ये बँकांचा पैसा वृत्तपत्रात गुंतला असून त्यांचे नियंत्रण आहे. पण बँका खाजगी असल्याने पर्यायाने खाजगी मालकी जपानमध्ये आहे. ब्रिटन, अमेरिका, प. जर्मनी इत्यादी देशांतील काही पत्रांचे मालक आपल्या वृत्तपत्रांच्या संपादकीय कारभारात ढवळाढवळ करीत. ब्रिटनमधील लॉर्ड नॉर्थक्लिक, लॉर्ड बीव्हरब्रूक हे याची ठळक उदाहरणे. या दोघांचा कारभार पाहिल्यावर आपल्याकडील वृत्तपत्रीय मालकांचा हस्तक्षेप काहीच नव्हे असे वाटेल. इंग्लंडमध्ये लॉर्ड थॉमसन यांनी मात्र आपल्या पत्रांना स्वातंत्र्य दिले म्हणून थॉमसन गटातील विविध पत्रे परस्पर-विरोधी मतप्रदर्शन करतानाही दिसतात. व्यवसाय म्हणूनही हे धोरण यशस्वी झालेले दिसेल. म्हणून आता नव्याने या क्षेत्रात येणारे वृत्तपत्रीय मालक थॉमसन यांचे धोरण स्वीकारताना आढळतील. या धोरणाप्रमाणेच पॅरिसहून प्रसिद्ध होणाऱ्या 'ल माँद' या पत्रानेही वरीचशी आदर्श व्यवस्था केली आहे. संपादकीय स्वातंत्र्याचे रक्षण यामुळे त्या पत्रात होऊ शकते. वृत्तपत्रीय मालकीचा विचार करताना याप्रकारचे नमुने विचारात घेणे श्रेयस्कर ठरेल. खाजगी मालकीचे पत्र असले तरी चालकांनी आपल्या राजकीय, आर्थिक व सामाजिक धोरणांचा एक जाहीरनामा प्रसिद्ध करावा आणि संपादक त्या धोरणाला बांधील असावा. एकदा संपादकाची नेमणूक झाली, की मग तो या धोरणाशी प्रतारणा करीत नसेल; वृत्तपत्रीय कार्यक्षमता दाखवीत असेल तर त्यांच्या कारभारात ढवळाढवळ चालकांनी करू नये. 'ल माँद' साधारणतः याप्रकारे चालते. येथेही असे करणे शक्य आहे.

यावर बड्या भांडवलदारांना वृत्तपत्रावर मालकीच ठेवू देऊ नये हा अतिरेकी विचार मांडणे हा सोपा उपाय काहीजण अवलंबितात. पण आपल्या घटनेप्रमाणेच हे करता येणार नाही. दुसरे असे, की जगभर हा धंदा आता अधिकाधिक खर्चिक होत आहे. आधुनिक, नवे रोटरी यंत्र आयात करावयाचे तर तीन ते साडेतीन कोटी रुपये लागतात. या यंत्रावर एकच पत्र काढून फायदेशीर ठरत

नाही. तेंव्हा तीनचार पत्रे हवी, त्यांच्या विविध आवृत्त्या हव्या. हा पैसा कोणी व कसा उभा करावयाचा ? शिवाय हा फार किफायतशीर धंदा नव्हे. एवढी मोठी रक्कम गुंतवायची तर भांडवलदार येणार. नाहीतर आधुनिक व सुसज्ज यंत्रसामग्री नको व त्यावर चालणारी पत्रे नको ही भूमिका घ्यावी लागेल. यासंबंधात ग्रामोद्योगच चालवावयाचा असेल तर गोष्ट वेगळी. पण सुसज्ज पत्रे हवी तर पैसा हवा, प्रचंड पैसा हवा व त्याच्या काही मर्यादा आपोआपच येणार. यातून वृत्तपत्रीय स्वातंत्र्य टिकविण्यासाठी कशाप्रकारचे व्यवस्थापन हवे याचा विचार करणे शक्य आहे. पण जे मोठे तेवढे खोटे ही एक दरिद्री वृत्ती झाली. तथापि वृत्तपत्रीय स्वातंत्र्यावर केवळ मालकांचेच दडपण येऊ शकते, हीसुद्धा चुकीची कल्पना आहे. या संबंधात लंडनच्या इंव्हिनिंग स्टॅन्डर्डचे संपादक चार्लस् विन्टूर यांचे ' प्रेशर्स ऑन द प्रेस ' हे पुस्तक अभ्यसनीय ठरेल. इंव्हिनिंग स्टॅन्डर्ड हे पत्रही खाजगी कंपनीच्या मालकीचे असून भांडवलदारी मालकी हे गृहीत कृत्य मान्य करून विन्टूर यांनी ही चर्चा केली आहे. ती करताना वृत्तपत्र हे अधिकाधिक आकर्षक, लोकहिताचे रक्षक कसे होईल याचाच विचार ते प्रमुख मानतात. आपला वृत्तपत्रव्यवसाय आधुनिक व सुसज्ज करावयाचा असेल, तर या व इतर अनेक अडचणींचा व दडपणांचा विचार करावा लागेल. विशेषतः आपल्याकडे स्थानिक स्वरूपाच्या अनेक अडचणी आहेत. त्यांचीही दखल घेणे भाग आहे.

विन्टूर यांनी वृत्तपत्राच्या संपादकाला व संपादक वर्गाला व घड्याळाशी जो सामना द्यावा लागतो व त्याचे जे दडपण मनावर असते त्याचा उल्लेख केला आहे. लॉर्ड मोर्ले यांनी वृत्तपत्र हे घाईतील वाङ्मय असे म्हटले आहे. या घाईगर्दीची कल्पना यावी म्हणून विन्टूर यांनी आपला सकाळी उठल्यापासूनचा दिवसभरचा कार्यक्रम वर्णन केला आहे. अर्थात् पाश्चात्त्य वृत्तपत्रांतील स्पर्धा व त्यामुळे येणारे मानसिक दडपण येथे त्या प्रमाणात नाहीत. त्या वृत्तपत्रांची पानांची संख्या भरपूर, विविध विषय इत्यादींचा विचार करता आपल्या इंग्रजी पत्रांच्या संपादक वर्गावर वेळेचा कमी ताण पडतो व भाषिक वृत्तपत्रांत तर त्याहून कमी असतो. तथापि ब्रिटिश पत्राच्या संपादकास कोणीही केव्हाही भेटावयास जाऊन त्याचा वेळ खाऊ शकत नाही. येथे त्या उलट स्थिती आहे. विन्टूर याने अनावश्यक पत्रे व लेख यांचे वाचन व ज्यांचा कसलाच उपयोग नाही त्यांची भेट वगैरेमध्ये जाणारा वेळ यांचा उल्लेख केला आहे. येथे यापेक्षा वेगळी परिस्थिती नाही. हा जो ताण पडतो त्यातूनच वृत्तपत्र तयार करावयाचे असते. या जोडीला आपल्याकडील वृत्तपत्रापुढील आणखी एक समस्या उल्लेखनीय आहे. ती म्हणजे जुळणी व छपाई यासंबंधातील जुनाट यंत्रसामग्री. याबाबत पाश्चात्त्य वृत्तपत्रे आणि जपानी वृत्तपत्रे यांनी आश्चर्यकारक प्रगती केली असल्याने त्यांना जेवढा मजकूर जितक्या वेळात देता येतो, तो आपल्याला देणे शक्य नसते. साहजिकच घड्याळाचा दबाव आपल्याला अधिक जाचक ठरतो.

भांडवलदारी वृत्तपत्रांवर जाहिरातदारांचे दडपण पडते, अशी एक खुळी समजूत आहे. वास्तविक लहान वृत्तपत्रांवर ते पडत असते. टाइम्स ऑफ इंडियात आपल्या जाहिरातीला हव्या त्या दिवशी व हव्या त्या ठिकाणी जागा मिळावी म्हणून जाहिरातदारांनाच प्रयत्नशील राहावे लागते. मग दडपण कसे येणार ? चार्ल्स यांनी याप्रकारचे दडपण येत नाही असाच अनुभव दिला आहे. पाश्चात्त्य वृत्तपत्रांत धूम्रपानाविरुद्ध बरेच लिखाण येते व तरीही सिगरेटच्या जाहिराती येतात. या जाहिरातीमुळे सिगरेटींचा खप वाढतो म्हणावे तर रशियात कसल्याच जाहिराती वृत्तपत्रात येत नसता सिगरेटचा खप का वाढतो ? असा विंटूर यांचा प्रश्न आहे. येथेही मद्याच्या जाहिराती येत नाहीत तरीही मद्यपानाचे प्रमाण बरेच वाढले आहे हे लक्षात घेण्यासारखे आहे.

इंग्लंडमध्ये कामगार संघटनांचे दडपण वृत्तपत्रांवर वाढत असून त्या एकप्रकारे सेन्सॉरशिप आणू पाहतात अशी विंटूर यांची तक्रार आहे. त्यांनी हे पुस्तक लिहिले तेव्हापेक्षा आज हे अधिक खरे आहे. अनेकदा ब्रिटिश पत्रातील जुळाऱ्यांनी वा इतर कर्मचाऱ्यांनी कामगार संघटनेच्या विरुद्ध टीका करणारे पत्रक वा मजकूर छापण्यास नकार देऊन वृत्तपत्राचा अंक बाहेर येऊ दिलेला नाही. याविरुद्ध

अनुक्रमणिका

अर्थात सर्वच संपादकांनी व व्यवस्थापकांनी भूमिका घेतली असून कामगार संघटनांची सेन्सॉरशिप येऊ देण्यास विरोध केला. येथे अद्याप ही परिस्थिती नाही. पण ती येणार नाही असेही नव्हे. कामगार संघटनांविरुद्ध युक्तिवादपूर्वक टीका केली तरी त्या वृत्तपत्राचा अंक जाळण्याचा प्रकार काही संघटना करीत असतात. इतरही संघटना व पक्ष या मार्गाचा मधूनमधून अवलंब करतात. याच लोकांनी संपादकावरील दडपणाची चर्चा करावी हा विनोद ठरेल. संघटित वर्गाचे दडपण हाही वृत्तपत्रीय स्वातंत्र्याला धोका आहे.

आपल्याकडे सर्वच वस्तूंची टंचाई. साहजिकच मग परवाने आले आणि परवाने आले की दडपण आले. केंद्र सरकारच्या हाती वृत्तपत्रीय कागद, यंत्रसामग्री इत्यादी सर्वांचेच नियंत्रण आहे आणि नवे सरकार येऊन अद्यापही याबाबत वेगळे धोरण स्वीकारले जाण्याची शक्यता नाही. सरकारी नियंत्रण येण्यास हे अधिकार हे एक साधन आहे. बँका राष्ट्रीकृत कराव्या ही अनेकांची मागणी होती. समाजवाद आणण्याचे ते साधन मानले गेले. पण या बँकांनी कोणाला किती कर्ज द्यावे वा देऊ नये यावर आणीबाणीत सरकारने नियंत्रण ठेवले. सरकार वृत्तपत्रांची कोंडी करण्याचे मनात आणील तर ते अनेक प्रकारे त्यास शक्य आहे. यासाठी समुदायवादाचा जो प्रभाव आपल्या विचारावर पडला आहे तो बदलावा लागेल.

संसद ही सार्वभौम व वृत्तपत्रे ही चौथी मिळकत ही भाषा मोठी लोकप्रिय आहे. पण संसद अनेक बाबतीत निर्णय घेत नाही. निर्णय घेते सरकार, नोकरशाही व मंत्री. या निर्णयावर संसद अनेकदा शिक्कामोर्तब करते. तेव्हा सरकारी धोरणाचा उगम संसदेत आहे, हे म्हणणे बरोबर नाही असे विन्टूर यांनी दाखवून दिले आहे. पण सार्वभौमत्वाचा दिमाख मिरविणारी संसद वा विधिमंडळे यांच्या स्वतःच्या खास अधिकाराबद्दल काही कल्पना आहेत. त्यामुळे त्यांच्यावर जरा थोडी टीका झाली की हक्कभंगाचा ठराव येतो आणि तो आला की सर्वजण बहुधा एक होतात. वास्तविक एखाद्या सभासदाने संसदेत वा विधिमंडळात बेलगाम वा निर्बुद्धपणाचे भाषण केले तर त्याची तशी संभावना केली तर बिघडले कोठे ? हा हक्कभंगाचा बडगा हासुद्धा वृत्तपत्रीय स्वातंत्र्यावर, खुल्या चर्चेवर आघात करणारा आहे.

वृत्तपत्रांच्या मार्गात आणखी एक अडचण येते व ती म्हणजे बातमीचे नियंत्रण. न्यूज मॅनेजमेंट ही सरकार आणि हितसंबंधी वर्ग मोठ्या कौशल्याने करते. बाजारात कापूस येतो तेव्हा यंदा कापसाची टंचाई भासणार असून परदेशातून कापड आणण्याचा सरकारचा विचार आहे अशी हमखास बातमी गिरणी मालकांच्या संगनमताने संबंधित सरकारी अधिकारी प्रसिद्ध करतात. साहजिकच कापसाचे भाव पडतात. पण ही बातमी अशा वेळी व अशा रीतीने येते की ती तपासण्याची कोणाला फुरसतच नसते. राजकीय बातम्याही कुशल मंत्री व अधिकारी त्यांना योग्य अशा वेळी प्रसृत करतात. वार्ताहरांना या रीतीने वळविण्याच्या कामी काही राजकारणी कुशल असतात. त्यांचे कौशल्य इतके असते की उघड उघड खोटी गोष्ट खरी म्हणून प्रसिद्ध होते. काँग्रेसमध्ये फूट पडली तेव्हा इंदिरा गांधींच्या बाजूला संसदीय पक्षात बहुमत नव्हते. पण ते आहे असे दडपून छापण्यात आले. त्यांच्या पाठीराख्यांच्या अर्जाची चळत पत्रकारांपुढे ठेवण्यात आली होती; पण एकानेही त्यापैकी किती अर्जांवर सह्या आहेत हे तपासून पाहिले नव्हते. यालाच 'न्यूज मॅनेजमेंट' म्हणतात. वृत्तपत्रांपुढे हाही एक महत्त्वाचा धोका असतो. एकंदर समाजाच्या नीतिमत्तेची जी पातळी तीच पत्रकारांची असणार. यामुळे प्रलोभनांचा मोहही आपल्या समाजात अधिक आहे आणि पत्रकारांपुढेही तो आहे. यापायीही बातम्यांचे नियंत्रण होते; माहिती मतलबासाठी प्रसिद्ध होऊ शकते. दुसरे एक वैचारिक नियंत्रण असते. सध्या भांडवलदारांच्या पत्रात सुखेनैव नोकऱ्या कराव्या, मिळतील तेवढ्या सवलती लाटून शिवाय आणखी मिळण्यासाठी दडपणे आणावी आणि वर आपण जहाल, डावे आहोत म्हणून कामगार, दलित–हरिजन यांच्या प्रश्नांची फोडणी लावण्यासाठी लिखाण करावे असे एक तंत्र काही फॅशनेबल डाव्यांनी अवलंबिले आहे. ही मंडळी तर ठरवून खोट्या बातम्या देत असतात. आजकाल अशा वार्ताहरांचे राजकारण हे प्रत्यक्ष राजकारणाशी स्पर्धा करू लागले आहे. यांच्यामुळेही वृत्तपत्रांचा संसार सुरळीत चालत नाही. त्यांना अडचणींना तोंड

द्यावे लागते. आपल्याकडील बदनामीच्या कायद्याचा व्यापकपणा हाही वृत्तपत्रांच्या स्वातंत्र्यावर बंधने आणणारा आहे.

या साऱ्या अडचणी व अडथळ्यांचा विचार वृत्तपत्राचे मालक व पत्रकार यांच्या संघटना करीत नाहीत. सरकारही करीत नाही. प्रत्येक क्षेत्रात सर्वोत्कृष्ट (एक्सलन्ट) जे असेल ते आपण साध्य करावे या वृत्तीची वाढ समाजाच्या पुढाऱ्यांनी आपल्या वागण्याने व धोरणाने करावयाची असते. पण ती करावयाची तर मग सामान्य बाबतीतही तडजोड चालत नाही, किंमत द्यावी लागते. ती देण्याची समाजाच्या पुढाऱ्यांची तयारी नाही. वृत्तपत्रीय क्षेत्र याला अपवाद कसे असेल ? म्हणून पत्रकारांच्या संघटना वेतनवाढ, सवलती इत्यादींच्या मागण्या सतत करीत असतात, पण आपल्या क्षेत्रात प्रावीण्य संपादन करावे यासाठी कष्ट करण्यासाठी फारशी कोणाची तयारी नाही. मंत्री काही फारसे वाचत नाहीत, म्हणून त्यांची टिंगल करणारे पत्रकार त्यांच्याइतकेच अज्ञानी असतात. अनेकांच्या हाताला पुस्तकांचा वर्षावर्षात स्पर्श झालेला नसतो. ही मंडळी समाजाचे वैचारिक मार्गदर्शन करू पाहतात, ही मोठी शोकान्तिका आहे. पण अशांची संख्या अधिक आहे. म्हणून वृत्तपत्रात विविध विषयांवर लिखाण येत नाही; जे येते ते बरेचसे उथळ असते. विषय समजावून घेण्यासाठी मेहनत केलेलीही दिसत नाही. कायद्याने नोकरीचे संरक्षण मिळाले; पण म्हणून पत्रकारांच्या गुणवत्तेची वाढ झाली असे नव्हे. मोठमोठ्या इंग्रजी वा भाषिक पत्रांना लायक असा पत्रकारांचा वर्ग मिळविणे कठीण जात आहे. राजकीय, सामाजिक, आर्थिक, व्यापार व्यवहार, उद्योग इत्यादी विषयांवर लोकांना समजेल अशा भाषेत लिहिणाऱ्यांचा विलक्षण तुटवडा भासत असून तो अधिक वाढणार आहे. चित्रपट, नाटके या विषयांवर लिहिणाऱ्यांचा तोटा नाही. अर्थात त्यावरही फार जाणतेपणाने लिहिले जाते असेही नव्हे. याप्रकारची मनुष्यसामग्री असल्यावर वृत्तपत्रांचा खरा विकास कसा होणार ?

वृत्तपत्रीय स्वातंत्र्याची एकांगी व जुजबी चर्चा फार होते. वृत्तपत्रांच्या मार्गातील विविध अडचणी, त्यावरील खरी दडपणे यांचा विचार क्वचित होतो. पारीखांचा बेनेट कोलमन कंपनीशी संचालक म्हणून संबंध आला, तेव्हा व्यवस्थापन, यंत्रसामग्री, पत्रकार, साधनसामग्री, दळणवळण इत्यादी संबंधातील अनेक प्रश्नांची त्यांना चांगली ओळख झाली होती. वृत्तपत्रांपुढे भौतिक, यांत्रिक व बौद्धिक दुर्भिक्ष हे मोठे संकट आहे; अशा वातावरणात स्वातंत्र्याचाही फारसा उपयोग नसतो. ज्या पत्रकारांना आपल्या समाजाच्या प्रश्नांचा खोलात जाऊन व मेहनत घेऊन अभ्यास करावयास नको त्यांना स्वातंत्र्य मिळाल्याने काय सुधारणा होणार ? याचा अर्थ स्वातंत्र्य नको असा नव्हे. पण स्वातंत्र्य हे साधन आहे. आत्मविकास आणि समाजहित हे साध्य आहे. बौद्धिकदृष्ट्या दुर्बळ वा दिवाळखोर अशांच्या हाती चांगले साधन पडले, तरी त्यामुळे साध्य मिळविता येते असे नव्हे.

---

अनुक्रमणिका

नी. वि. सोवनी

# प्रा. पारीखांचे आर्थिक विचार

प्रा. पारीखांचे आर्थिक लेखन थोडे आहे आणि त्यातील पुष्कळसे त्यांच्या सार्वजनिक आयुष्याच्या सुरुवातीच्या काळातील आहे. मानवेंद्रनाथ रॉय ह्यांच्या विचारांना पूरक असे पारीखांचे आर्थिक लेखन असून त्यातून रॉय ह्यांच्या विचारांचे समर्थन आणि विवेचनही आढळते. ह्या लेखनाचे तीन भाग पाडता येतील :

(१) रॉय ह्यांनी १९२८ साली मांडलेल्या निर्वसाहतीकरणाच्या सिद्धांतावर पारीखांनी १९३९ साली लिहिले. नव्या माहितीच्या आधारे हा सिद्धांत अद्ययावत करण्याचा आणि तो ऐतिहासिक कसोटीस कसा उतरतो, हे दाखवून देण्याचा प्रयत्न पारीखांनी आपल्या लेखनात केलेला आहे.

(२) दुसऱ्या महायुद्धाच्या काळात, हिंदुस्थानात जी चलनअतिवृद्धी झाली तत्संबंधी रॉय ह्यांनी 'इंडिपेंडंट इंडिया' या साप्ताहिकात लेख लिहिले होते. 'पॉव्हर्टी अँड प्लेंटी' या पुस्तकात ते संग्रहीत असून त्यास पारीख यांनी प्रस्तावना लिहिलेली आहे. रॉय यांच्या ह्या लेखांतील विश्लेषणाचे अभिनिवेशपूर्ण समर्थन पारीखांनी ह्या प्रस्तावनेत केलेले आहे.

(३) अगदी अलीकडे, म्हणजे १९७१ साली, पारीखांनी रॉय ह्यांच्या 'इंडिया इन ट्रँझिशन' ह्या १९२१-२२ साली प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांच्या नव्या आवृत्तीस एक छोटीशी प्रस्तावना लिहिली. तीत अभिनिवेश दिसत नाही; पण ऐतिहासिक तौलनिक दृष्टी मात्र विशेषत्वाने दिसते. ह्या सर्व लेखनाचा विचार ह्या लेखात करण्याचे योजिले आहे.

## (१) निर्वसाहतीकरणाचा सिद्धांत

१९२८-२९ साली हिंदुस्थानच्या प्रश्नासंबंधी लिहिलेल्या रॉय यांच्या प्रबंधात हा सिद्धांत मांडलेला होता. 'निर्वसाहतीकरणाचा सिद्धांत' असे त्याचे मूळचे नाव नव्हते. ते त्याच्या टीकाकारांनी त्याला ठेवलेले नाव आहे व त्या नावानेच तो प्रसिद्ध आहे. या प्रबंधामुळेच रॉय यांचा कम्युनिस्ट इंटरनॅशनलशी मतभेद होऊन त्यांना त्या संस्थेतून काढून टाकण्यात आले होते, असे रॉय यांचे टीकाकार म्हणत असत. हा प्रबंध रॉय यांनी १९३८ मध्ये 'अवर डिफरन्सेस' या नावाच्या पुस्तकात, हिंदुस्थानात प्रसिद्ध केला. त्यामुळे तो सर्वत्रांस सुलभतेने उपलब्ध होऊन त्यावर चर्चा करणे शक्य झाले. त्यावेळी पारीख हे विद्यार्थिदशेत होते व पदव्युत्तर परीक्षेचा अभ्यास करीत होते. त्या वेळी ते पूर्णपणे रॉयवादी झालेले होते व रॉयिस्ट मंडळीतही समाविष्ट झाले होते. रॉय यांचा निबंध १९२८ साली प्रसिद्ध झाला होता. त्यानंतरच्या काळातील घडामोडी लक्षात घेऊन, अद्ययावत माहिती पडताळून रॉय यांचा सिद्धांत कितपत कसोटीला उतरतो ते पहावे असे वसंतराव कर्णिकांनी (संपादक, 'इंडिपेंडंट इंडिया') योजून पारीख यांना ते काम दिले. त्याप्रमाणे अभ्यास करून त्या विषयावर ६ लेख पारीख यांनी १९३९ साली 'इंडिपेंडंट इंडिया' या साप्ताहिकात लिहिले. ते २६ मार्च, २, ९, १६, २३ व ३० एप्रिलच्या त्या साप्ताहिकाच्या अंकांतून प्रसिद्ध झाले. लेखक म्हणून 'ए क्रिटिक' असे टोपण नाव पारीख त्यांनी घेतले होते.

यासंबंधीची त्यावेळची एक गोष्ट सांगण्यासारखी आहे. वसंतराव कर्णिकांनी पारीख यांना तयार करावयास सांगितलेल्या लेखमालेसंबंधी स्वतः रॉय यांना काहीच माहिती नव्हती. त्यावेळी रॉयही मुंबईत नव्हते. २६ मार्चला पारीख यांचा पहिला लेख 'ए क्रिटिक' या टोपण नावाने 'इंडिपेन्डन्ट इंडिया'त प्रसिद्ध झाला तेव्हा तो रॉय यांच्या नजरेस आला. त्यानंतर कर्णिकांना लिहिलेल्या एका

अनुक्रमणिका

पत्रात रॉय यांनी लिहिले " काय भरताड मजकूर तुम्ही 'इंडिपेन्डन्ट इंडिया'मध्ये छापता ! अशा भरताड मजकुराचे उदाहरण म्हणजे 'ए क्रिटिक' याचा हा लेख आहे. हा नुसता माझ्या प्रबंधाचा गोषवारा आहे." तथापि रॉय यांची ही नापसंती कर्णिकांनी लक्षात घेतली नाही व लेखमाला ठरल्याप्रमाणे छापली. त्यातला ५ वा व शेवटचा लेख २३ व ३० एप्रिलला प्रसिद्ध झाला. त्यानंतर लिहिलेल्या पत्रात रॉय यांनी कर्णिकांना लिहिले : "हा व त्याच्या अगोदरचा लेख हे फारच चांगले आहेत. हा कोण लेखक आहे ?" कर्णिकांनी हा किस्सा पारीख यांना पत्र पाठवून पुण्यास कळविला होता. हे पत्र आम्हा मित्रमंडळीत त्यावेळी वाचले गेले होते.

निर्वसाहतीकरणाचा सिद्धान्त हे नाव मूळचे नाही हे पूर्वीचे नोंदले आहे. 'हिंदुस्थानच्या प्रश्नासंबंधी' अशा मथळ्याच्या प्रबंधात निर्वसाहतीकरण' अशी संज्ञा रॉय यांनी वापरली आहे. परंतु ती मुख्यत: हिंदुस्थानातील परिस्थितीला उद्देशून आहे. सर्वसाधारणपणे जागतिक पातळीवर ही निर्वसाहतीकरणाची प्रक्रिया चालू आहे हा हिंदुस्थानच्या उदाहरणावरून काढलेला ध्वन्यर्थ आहे. तसे रॉय यांचे विवेचन जागतिक पातळीवर नाही. ह्या ध्वन्यर्थाप्रमाणे दुसऱ्या महायुद्धानंतर जगभर निर्वसाहतीकरण झालेले आहे, असे कोणी मानीत असल्यास ते चूक ठरेल. रॉय यांच्या हिंदुस्थानविषयक विश्लेषणातून यासंबंधी मांडलेली कार्यकारणमीमांसा खुद्द हिंदुस्थानच्या बाबतीतसुद्धा चूक आहे हे पुढे दाखविलेच आहे. ती जागतिक पातळीवर चूक आहे हे निराळे सांगावयास नको.

रॉय यांच्या हिंदुस्थानविषयक मीमांसेचा मुख्य आधार लेनिनची साम्राज्यशाहीची मीमांसा आहे. साम्राज्यशाही देशांची भांडवलनिर्यातीची प्रचंड शक्ती व भांडवलशाहीच्या प्राकृतिक पेचप्रसंगावर मात करण्यासाठी त्याची नितांत जरूरी हे लेनिनच्या मीमांसेप्रमाणे साम्राज्यशाहीच्या उद्गमाचे व विकासाचे मुख्य कारण आहे. तोच विचाराचा धागा पुढे नेऊन रॉय यांनी हिंदुस्थानच्या पहिल्या महायुद्धानंतरच्या काळातील परिस्थितीचे विश्लेषण केले आहे. त्यांच्या मते या काळात हिंदुस्थानातील साम्राज्यशाहीचा पाया पोखरला जात होता. ब्रिटिश साम्राज्याच्या केन्द्रस्थानी म्हणजे खुद्द ब्रिटनमध्ये भांडवलशाहीचा ऱ्हास होत आहे. त्यामुळे त्या साम्राज्यशाहीस हिंदुस्थानवरील कणभरही सत्ता सोडण्याची इच्छा नसल्यामुळे पिळवणुकीचे नवे मार्ग व पद्धती अवलंबाव्या लागत आहेत. या पद्धतीतील बदलामुळे हिंदुस्थानातील ब्रिटिश राज्य उलथून टाकण्यास अनुकूल अशी परिस्थिती निर्माण होत आहे. ब्रिटनला न्यून उत्पादनाने ( underproduction ) ग्रासले आहे. त्याची भांडवल निर्यात करण्याची कुवत हळूहळू कमी होत आहे. ब्रिटनच्या निर्यात व्यापाराचा ऱ्हास होत आहे. विशेषत: कोळसा, लोखंड व पोलाद, कापड, जहाजबांधणी या धंद्यातील निर्यात कायमचीच कमी झाल्याचे दिसते. निर्यात व्यापाराद्वारेच पूर्वी भांडवलनिर्यात होत असे. आता निर्यातीसाठी उपलब्ध होणारे भांडवल ब्रिटनला कमी पडत आहे. ब्रिटनमधील राष्ट्रीय बचत कोसळली आहे. यावरून तेथे भांडवलसंचय पूर्वीपेक्षा वेगाने होत आहे असे दिसते. ब्रिटनमधील उपभोगासाठी लागणाऱ्या मालाची मागणी वाढल्यामुळे त्या मानाने निर्यातीस कमी माल उपलब्ध होत आहे.

याचा हिंदुस्थानवर असा परिणाम होतो, की ब्रिटनमधील निर्यातीतील वाढाव्याची कूस कमी झाल्यामुळे ब्रिटिश भांडवलदारवर्गाला साम्राज्याच्या इतर निकडीच्या गरजा भागवून फार थोडे भांडवल हिंदुस्थानात निर्यात करण्यासाठी उपलब्ध होते. त्यामुळे प्रथम जरी हिंदुस्थानची औद्योगिक प्रगती कुंठित झाली, तरी त्यामुळेच हिंदुस्थानची औद्योगिक प्रगती करण्याची निकड जास्त तीव्र होते असा हा विरोधाभास आहे. ब्रिटिश भांडवलदारवर्गाने ब्रिटनच्या भांडवलनिर्मितीतील कमताई भरून काढण्यासाठी नफा मिळवण्याची नवी उगमस्थाने शोधून काढली नाहीत तर ब्रिटनच्या साम्राज्याचा सर्वच डोलारा ढासळेल. पिळवणुकीचे नवीन मार्ग स्वीकारल्यास अशा नफ्याचे हिंदुस्थान हे उगमस्थान होऊ शकेल. ब्रिटनमधून निर्यात करण्यासाठी भांडवल उपलब्ध नसल्यामुळे भांडवलशाही वित्त-


अनुक्रमणिका

व्यवस्थेच्या नेतृत्वाखाली हिंदुस्थानातील भांडवल संघटित करून या कामी लावण्याची ही नवी योजना आहे.

ब्रिटनमधील औद्योगिक ऱ्हासामुळे देशाबाहेरून येणाऱ्या उत्पन्नाचा वाढता अंश ब्रिटनमध्येच वापरला जात आहे. परंतु हे मूळ उत्पन्नही ऱ्हास पावत आहे. निर्यातीत घट झाल्यामुळे ब्रिटनचा आयात-निर्यात व्यापाराचा ताळेबंद प्रतिकूल झाला आहे. ही न्यूनता ज्याच्यातून भरून काढावयाची ते बाहेरून येणारे ब्रिटनचे उत्पन्न कमी झाले आहे. त्यामुळे ब्रिटनजवळ निर्यातीसाठी उपलब्ध होणारे भांडवल फार मर्यादित झाले आहे. लंडनच्या आन्तरराष्ट्रीय नाणेबाजारात गेल्या काही वर्षांत उभारली गेलेली परदेशी कर्जे ही त्या परदेशी रोख्यांच्या निव्वळ हस्तांतरणाच्या स्वरूपाची होती. एक प्रकारे ब्रिटनच्या मालकीचे परदेशातील भांडवल किती कमी झाले आहे याचेच ते माप होते.

ब्रिटनच्या या मूलभूत परिस्थितीतूनच ब्रिटनचे या काळातील हिंदुस्थानविषयक धोरण घडलेले आहे. सांप्रत ( १९२८–२९ ) आंतरराष्ट्रीय व्यापारवस्तू मूल्यतुल्यता दर ( terms of trade ) हा हिंदुस्थानला प्रतिकूल झाला असल्यामुळे हिंदुस्थानला पूर्वीपेक्षा जास्त माल निर्यात करून कमी माल आयात करता येतो. १९२३ पासून हिंदुस्थानाचे आन्तरराष्ट्रीय व्यापार आधिक्य (निर्यात आधिक्य) ब्रिटनला दरवर्षी द्यावयास लागणाऱ्या खंडणी इतकेही नाही. हिंदुस्थानसाठी लंडन बाजारात या काळात उभारले गेलेले कर्जही पूर्वीच्या मानाने फार घटले आहे. त्यामुळेही न वसूल झालेली खंडणी पुन्हा हिंदुस्थानात गुंतवलेली दिसत नाही. याचा अर्थ हिंदुस्थानचे ब्रिटिश साम्राज्यातील स्थान टिकवण्यासाठी ब्रिटनचे हिंदुस्थानातील येणे इतर साम्राज्यशाही देशांनी निर्लेखित केले असले पाहिजे असा होतो. हिंदुस्थानातील जनतेने अधिक ( मूल्याचे ) उत्पादन केले तरच हिंदुस्थानची ब्रिटनला द्यावयाची खंडणी वाढविता येईल. म्हणून तेथील उत्पादनाची साधने वाढवण्याची व पद्धती सुधारण्याचे ब्रिटनच्या साम्राज्यशाहीचे धोरण आहे. मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणा, संरक्षक जकातीच्या धोरणास परवानगी, ही याचीच लक्षणे आहेत.

हिंदुस्थानात आयात होणारा माल अधिकांशी ब्रिटनमधून येतो. परंतु हिंदुस्थानातून निर्यात होणारा माल बहुतांशी ब्रिटनेतर देशांत जातो. पूर्वी हे ब्रिटनच्या फायद्याचे होते. कारण हिंदुस्थानचे ब्रिटनेतर देशातील या निर्यातीनिमित्त येणे म्हणजे त्या देशांना निर्यात केलेले ब्रिटनचे तेवढे भांडवलच होय. परंतु आता ब्रिटनचे निर्यात आधिक्य घटल्यामुळे, जे ब्रिटनेतर देश हिंदुस्थानचा माल घेतात ते हिंदुस्थानला आपला तेवढा माल देऊन त्याची फेड करतात. याचा परिणाम ब्रिटनची हिंदुस्थानातली बाजारपेठ संकोचण्यात होतो. हिंदुस्थानच्या ब्रिटनेतर देशातील ज्या निर्यात आधिक्याची फेड अशा प्रकारे होत नाही ते हिंदुस्थानचे साम्राज्याबाहेर निर्यात केलेले भांडवलच होय. ते थांबविण्यासाठी ब्रिटिश साम्राज्यशाहीला हिंदुस्थानचे औद्योगिकीकरण करण्याचे तिच्या स्वतःच्या दृष्टीने अनुचित असे धोरण स्वीकारावे लागते. १९२३ पासून हिंदुस्थान सरकारने ब्रिटनमध्ये कर्ज उभारलेले नाही. जरूर तेवढे भांडवल देशातच उभारलेले आहे. या धोरणामुळे ब्रिटिश साम्राज्यशाहीचे हिंदी भांडवलदार वर्गावरील दडपण कमी झाले आहे. आणि म्हणूनच तो वर्ग राष्ट्रीय चळवळीसंबंधी अधिक उदासीन बनला आहे, बनत आहे. जनतेची पिळवणूक वाढत असून तिची क्रांतिकारक प्रवृत्ती वाढत आहे. म्हणून कामकरी व शेतकरी यांनीच ब्रिटनचे जोखड झुगारून दिले पाहिजे. ब्रिटन फक्त हिंदी भांडलवलदार वर्गापुरते निर्वसाहतीकरण करीत आहे. जनतेचा त्यात समावेश नाही.

१९२८ पर्यंतच्या माहितीच्या आधारे रॉय यांनी केलेले हे विश्लेषण १९३९ पर्यंतच्या माहितीच्या आधारे पारीख यांनी पुढे नेले आहे व रॉय यांनी नोंदलेल्या प्रवृत्ती, त्यांचे निष्कर्ष व विश्लेषण हे नवीन माहितीच्या आधारे कसे संपूर्णतया बरोबर ठरतात व ठरले आहेत हे त्यांनी दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. ब्रिटनची हिंदुस्थानातील बाजारपेठ कशी घटत आहे हे १९३८ पर्यंतच्या उपलब्ध आकडेवार माहितीने पारीख यांनी विस्तृतपणे दाखविले आहे व १९३१ सालापासून हिंदुस्थानातून सुरू झालेल्या सुवर्ण निर्यातीमुळे रॉय

अनुक्रमणिका

यांच्या विश्लेषणाला कसा जोरदार पाठिंबा मिळतो हेही दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

पारीख हे येथे रॉय यांचा पाठपुरावा करीत असल्यामुळे त्यांच्या लिखाणाचे परीक्षण रॉय यांच्या मूळच्या सिद्धान्ताचे परीक्षण केल्याशिवाय करता येणार नाही. रॉय यांचा सिद्धान्त व विश्लेषण ही दोन्हीही सपशेल चूक आहेत असे माझे स्पष्ट मत आहे व ते आरंभीच नोंदले आहे. त्या सिद्धान्ताचे तपशीलवार विवेचन अगर परीक्षण करण्याचे हे स्थळ नव्हे व त्याला येथे अवकाशही नाही. दोन तीन प्रमुख मुद्यांचा थोडक्यात परामर्श घेऊन मी त्या सिद्धान्ताला व विश्लेषणाला चूक का मानतो यासंबंधी कल्पना देता येईल.

पहिल्या महायुद्धानंतर ब्रिटन पूर्वीच्या आर्थिक व राजकीय उच्चस्थानापासून ढळले, ढळत गेले हे सत्यच आहे. तेथून रॉय सुरवात करतात व त्याबद्दल वाद नाही. परंतु ब्रिटनच्या ह्या ऱ्हासाचे लक्षण रॉय यांना लेनिनच्या साम्राज्यशाहीच्या विश्लेषणाच्या अनुषंगाने ब्रिटनची भांडवल निर्यात करण्याची कुवत कमी होण्यात सांपडले. ती तशी कमी झाली आहे असे आपल्या मते सिद्ध करून रॉय आपल्या पुढच्या सर्व विश्लेषणाची इमारत त्यावर उभारतात. यासंबंधी उपलब्ध असलेली आकडेवार माहिती तपासली तर रॉय यांचा हा निष्कर्ष प्रत्यक्षप्रमाणानेच चूक ठरतो. वानगीदाखल पुढील आकडे पहा. १९१४ साली पहिले महायुद्ध सुरू झाले. त्या वेळी ब्रिटनचे परदेशी गुंतवलेले भांडवल पौंड ४ अब्ज होते. त्या युद्धात यापैकी पौं. ८०० कोटींच्यावर मोडण्यात आले व त्यातून युद्धखर्च भागविण्यात आला. या युद्धाच्या शेवटी (१९१८ साली) ब्रिटनचे परदेशी गुंतवलेले भांडवल पौं. ३.२ अब्ज होते. १९३९ साली दुसरे महायुद्ध सुरू झाले. त्यावेळी ब्रिटनचे परदेशी गुंतवलेले भांडवल पौं. ५ अब्ज होते. म्हणजे १९१९ ते १९३९ या वीस वर्षांच्या कालखंडात ब्रिटनने पौं. १.८ अब्ज भांडवल निर्यात केले. प्रतिवर्षी साधारणपणे पौं. ९० कोटी. १८७५ ते १९१४ या काळात ब्रिटनचे परदेशी गुंतवलेले भांडवल पौं. १.२ अब्जापासून पौं. ४ अब्जापर्यंत वाढले. या चाळीस वर्षांत प्रतिवर्षीची निर्यात सुमारे पौं. ७० कोटी होती. यावरून १९१९ नंतरच्या काळात ब्रिटनने पूर्वीपेक्षा जास्त दराने भांडवल निर्यात केली हे आंकड्यांवरून सिद्ध आहे. रॉय यांच्या विश्लेषणाचे पायाभूत गमकच त्यामुळे उन्मळून पडते.

रॉय यांचे दुसरे विधान असे, की १९१९ नंतर हिंदुस्थानात ब्रिटिश भांडवलाची निव्वळ आयात जवळजवळ झाली नाही कारण ब्रिटनची तशी कुवतच नव्हती. हेही विधान आकड्यांच्या आधारे संपूर्णपणे चुकीचे आहे असे दाखविता येते. अरुणकुमार बानर्जी यांनी हिंदुस्थानच्या १९२१ ते १९३८ या कालखंडातील आन्तरराष्ट्रीय आयव्ययाचा हिशोब करून ताळेबंद तयार केला आहे. त्या अनुसार या काळात हिंदुस्थानात एकूण रु. २१७ कोटींची परदेशी भांडवलाची निव्वळ गुंतवणूक झाली व त्यापैकी बहुतांश ब्रिटनमधून आलेले होते. म्हणजे या काळात परदेशी गुंतवणुकीचा प्रतिवार्षिक दर सरासरी रु. १२–१३ कोटी पडला. हा दर पहिल्या महायुद्धापूर्वीच्या प्रतिवर्षी सरासरी दरापेक्षा जास्त होता. १८९८ ते १९१३ या कालखंडाचा वरच्या सारखाच हिंदुस्थानच्या आंतरराष्ट्रीय आयव्ययाचा ताळेबंद वाय. एस्. पंडित यांनी तयार केला आहे. त्याप्रमाणे त्या काळात हिंदुस्थानातील परदेशी भांडवलाची निव्वळ गुंतवणूक रु. १५० कोटींनी वाढल्याचे दिसते. म्हणजे हा दर प्रतिवर्षी सरासरी रु. १० कोटी होता. याप्रमाणे रॉय यांच्या विश्लेषणाचे हे दुसरे गृहीत तत्त्व निराधार व चूक ठरते.

पारीख यांनी आपल्या लेखात १९३१ पासून हिंदुस्थानातून सुरु झालेली सुवर्णाची निर्यात हा रॉय यांच्या विश्लेषणाचा व सिद्धान्तातून निघणाऱ्या अचूक भविष्याचा पुरावाच मानला आहे. त्यांच्या मते सुवर्ण निर्यात करून हिंदुस्थान त्या काळात आपल्या भांडवलावर जगत होता. म्हणजे आपले भांडवल मोडून आपली चालू गरज भागवीत होता. आंतरराष्ट्रीय आयव्ययाची खोलवर माहिती असणारांना हे विधान हास्यास्पद वाटेल. पण फार खोलात न शिरता एक दोन गोष्टी सहज ध्यानात येण्यासारख्या आहेत. प्रथमतः हिंदुस्थानातील सोने हे उत्पादकरीत्या उद्योगधंद्यातील गुंतवलेल्या भांडवलासारखे नव्हते. लाखो लोकांनी स्वतःजवळ

वाळगलेला साठा हेच त्याचे स्वरूप होते. म्हणून ही भांडवलाची खऱ्या अर्थाने निर्यात नव्हती. फक्त त्यामुळे पूर्वीचा साठा ( बचत ) कमी होत होता एवढेच. परंतु त्यामुळे हिंदुस्थान देश दरिद्री होत होता असे नाही. याचे कारण असे, की तसे म्हणावयाचे असेल तर ज्यावेळी-म्हणजे १९३१ पूर्वीच्या शंभराहून अधिक वर्षे हिंदुस्थानात सोन्याची दरवर्षी निव्वळ आयात होत होती त्यावेळी हिंदुस्थान देश श्रीमंत होत होता असे ओघानेच मानणे प्राप्त होते. हे तर रॉय अगर पारीख यांना मुळीच मान्य झाले नसते.

मला वाटते की रॉय यांच्या या विश्लेषणा-संबंधीच्या पारीख यांच्या लेखांची एवढी चर्चा मूळ सिद्धान्ताचा फोलपणा सिद्ध करण्यास पुरेशी आहे. आता दुसऱ्या लिखाणाकडे वळू.

२) 'पॉव्हर्टी अॅन्ड प्लेन्टी' ह्या पुस्तकात रॉय यांनी 'इंडिपेन्डन्ट इंडिया'त १९४३ साली लिहिलेल्या हिंदुस्थानातील आर्थिक परिस्थितीबाबतच्या काही लेखांचा संग्रह आहे व त्याला पारीख यांनी ३७ पानी प्रस्तावना लिहिली आहे. शिवाय मूळ लिखाणाला ठिकठिकाणी पदटीपा देऊन पूरक पुरावा जोडला आहे. परिशिष्ट 'सी' मध्ये चलन-विषयक कोष्टकेही जोडली आहेत. प्रस्तावना १ डिसेंबर १९४३ या तारखेची आहे.

दुसऱ्या महायुद्धाच्या काळात दोस्तांच्या युद्ध-प्रयत्नांना साह्य करण्यासाठी इतर साम्राज्यान्तर्गत देशाप्रमाणेच हिंदुस्थानातही, विशेषतः १९२१ पासून, फार मोठ्या प्रमाणावर ब्रिटन माल खरेदी करू लागले. त्यासाठी लागणारा पैसा ब्रिटनकडून हिंदुस्थानला पौंडाच्या कर्जरोख्यात मिळे व त्या आधारावर हिंदुस्थानसरकार येथे चलनवाढ करू लागले. त्यामुळे चलनाची अतोनात वाढ होऊ लागली व देशातील उत्पादन त्या मानाने न वाढ-ल्यामुळे ( व त्या गतीने वाढण्याची युद्धकाळात सुतराम् शक्यता नसल्यामुळे ) सर्वच किंमती भराभर वर जाऊ लागल्या व चलन अतिवृद्धीची परिस्थिती निर्माण झाली. परिस्थितीचे हे निदान बरोबर आहे की नाही या संबंधात हिंदुस्थानातील निरनिराळ्या हितसंबंधांच्या गटांमध्ये पुष्कळ वाद निर्माण झाला. त्या वादाच्या अनेक बाजूंपैकी एक बाजू रॉय यांची होती व तिच्या अभिनिवेशपूर्ण समर्थनार्थ पारीख यांची प्रस्तावना होती.

युद्धप्रयत्नांना पाठिंबा देऊन सरकारशी सहकार्य करणारे व या सर्वांना विरोध करणारे असे या वादाचे दोन मुख्य तट होते व प्रत्येक तटात बऱ्याच निरनिराळ्या विचारप्रवृत्ती उपतटांच्या स्वरूपात होत्या. युद्धप्रयत्नांना पाठिंबा देणाऱ्या गटात रॉय होते. या तटातील प्रमुख ब्रिटिश सरकार, हिंदुस्थान सरकार व त्यांचे समर्थक हे होते. काही राजकारणी गट, कम्युनिस्ट पक्ष व रॉय यांचा पक्ष हे त्यातले दुय्यम होते. चलन-अतिवृद्धी झाली आहे हे मान्य केले तर आपणावर दोष येईल व आधीच नाखूष असलेली जनता अधिकच नाखूष होईल या भीतीने ब्रिटिश व हिंदुस्थान सरकार यांनी प्रथम चलन-अतिवृद्धी झालेलीच नाही असे सांगण्याची भूमिका घेतली. परंतु लवकर त्यांनाही ती टिकविणे अशक्य झाले व १९४३ च्या उत्तरार्धात त्यांनी ती सोडली. १ ऑगस्ट १९४३ च्या श्री. चिं. द्वा. देशमुख यांच्या रोटरी क्लबातील भाषणात या मतपरिवर्तनाची पहिली नांदी झाली व १९४४ मार्चच्या अंदाज-पत्रकातील भाषणात रेसमन यांनी ती गोष्ट संपूर्ण-पणे मान्य केली.

हिंदुस्थानात चलन-अतिवृद्धीची परिस्थिती नाही अशी रॉय यांची भूमिका होती व ती कायम राहिली. त्यांच्या मते युद्धकालातील चलनविस्ताराचा फायदा घेऊन हिंदुस्थानातील सर्व प्रकारचे उत्पादन अनेक पटीने वाढविता येईल. देशाच्या फार मोठ्या आर्थिक विकासाची ही संधी आहे. परंतु युद्धप्रयत्नांना ज्यांचा विरोध आहे त्या हिंदी भांडवलदार वर्गाला तसे व्हावयास नको आहे. म्हणून तो वर्ग चलन-अतिवृद्धीबद्दल आरडा-ओरडा व कांगावा करीत आहे. हिंदुस्थान सरकारही त्यांच्या आहारी जाऊन ही तथोक्त चलन-अतिवृद्धी काबूत आणण्यासाठी नियंत्रणे वगैरे बसविण्याच्या मागे लागले आहे. या मत-प्रणालीचे समर्थन पारीख यांनी आपल्या प्रस्तावनेत अभिनिवेशाने केले आहे.

अनुक्रमणिका

१९४३ मध्ये हिंदुस्थानातील वीस नामवंत अर्थशास्त्रज्ञांनी जाहीर पत्रक काढून देशातील चलन-अतिवृद्धीच्या परिस्थितीकडे लक्ष वेधले होते. त्या पत्रकावर पारीख यांनी विशेष टीका केलेली आहे. हिंदी भांडवलदार वर्ग द्विधा किंवा त्रिधा मनःस्थितीत आहे. त्याचा सर्वसाधारणपणे युद्धप्रयत्नांना विरोध होता. परंतु युद्धकालीन आर्थिक परिस्थितीचा—चलन अतिवृद्धीचा—फायदाही त्यांला उठवावयाचा होता. परंतु चलन-अतिवृद्धीची परिस्थिती आहे असे मान्य केल्यास त्याच्या मागोमाग येणारी नियंत्रणे त्याला मुळीच नको होती. उलट रॉय यांना नियंत्रणे— नियोजन हवे होते व नियोजनाने सर्व प्रकारचे उत्पादन वाढवण्याच्या शक्यतेवर त्यांचा भर होता. चलन-अतिवृद्धीची परिस्थिती देशात आहे हे मान्य करण्यात हिंदुस्थान सरकार भांडवलवाल्यांच्या आहारी जात आहे असे त्यांचे म्हणणे होते.

रॉय यांच्या लिखाणातील राजकीय बाजू वगळून त्यांचे आर्थिक परिस्थितीचे निदान व त्याचे पारीख-कृत विद्यानिष्ठ भूमिकेतून केलेले समर्थनच येथे विचारात घ्यावयाचे आहे. पहिल्या लिखाणाप्रमाणेच या लेखातील रॉय यांचे विश्लेषण सर्वस्वी चूक होते. रॉय यांच्या हिंदुस्थानातील व विशेषतः युद्ध-कालीन आर्थिक परिस्थितीसंबंधीच्या कल्पना अव्यवहारी व कल्पनारम्य होत्या. युद्धकालीन परिस्थितीत एका अप्रगत अर्थव्यवस्थेत उपस्थित असलेल्या तुटपुंज्या उत्पादक सामुग्रीच्या आधारे उत्पादन किती वाढवता येईल या संबंधीचे रॉय यांचे अंदाज संपूर्णपणे अवास्तव होते. सर्व साधनांची अनुकूलता व फार मोठी नैसर्गिक संपत्ती असणाऱ्या अमेरिकेतसुद्धा युद्धकाळात पूर्वीच्या ५० टक्के उत्पादन वाढू शकले हे आकडयांनीच सिद्ध आहे. हिंदुस्थानात एवढेही शक्य नव्हते. या उलट हिंदुस्थानात चलनाची वाढ पूर्वीच्या ५ ते ६ पट झाली होती व आणखी वाढ होतच होती. येथील उत्पादन-सामग्री वाढवून या मागासलेल्या अर्थव्यवस्थेची उत्पादनक्षमताच या चलनवाढीशी समतोल करण्याइतकी वाढवावयाची ही रॉय यांची कल्पना अद्‌भुतातच गणली पाहिजे आणि या शक्यतेच्या ठाम भूमिकेवरून रॉय हिंदुस्थानात चलन अतिवृद्धीची परिस्थिती नाही असे प्रतिपादित होते! पारीख यांनी हा सिद्धांत प्रस्थापित करण्याचा जो प्रयत्न केला तो अर्थातच शास्त्रीय निकषावर कसास उतरला नाही. आता तर यासंबंधी वादही उरला नाही. युद्धकालीन चलन-अतिवृद्धी ही गोष्ट ऐतिहासिक सत्य म्हणून सर्वांनीच स्वीकारली आहे.

( ३ ) 'इंडिया इन ट्रँझिशन ' या रॉय यांच्या पुस्तकाच्या १९७१ च्या आवृत्तीस पारीख यांनी लिहिलेली प्रस्तावना येथे विचारात घ्यावयाची आहे. १९२२ साली प्रथम प्रसिद्ध झालेले, मार्क्सवादी विचारसरणीच्या आधारे हिंदुस्थानातील ऐतिहासिक परिस्थितीचा विचार व विश्लेषण करणारे हे पहिले लिखाण. (कारण त्यावेळी मार्क्सचे १८५३ चे हिंदुस्थानावरील लिखाण उपलब्ध झालेले नव्हते व रॉय यांनाही ते माहीत नव्हते. ) सर्वस्वी स्वतंत्र. त्यात रॉय यांचे निदान असे, की हिंदुस्थान सरंजामशाही अवस्थेत नाही व भांडवलशाहीचा पूर्ण विकास तेथे न झाल्यामुळे भांडवलशाही अवस्थेतही नाही. ब्रिटिश सरकारने चालू दिलेले सरंजामशाही युगाचे काही घटकावयव जरी तेथे दिसत असले, तरी तेथील सरंजामशाहीचा अंत झाला आहे व भांडवलशाहीच्या कक्षेत हा देश सामील झालेला आहे. म्हणून या परिस्थितीचे वर्णन ' संक्रमणावस्थेतील हिंदुस्थान ' हे उचित आहे.

या संक्रमणावस्थेत हिंदी भांडवलदार वर्ग हा ब्रिटिश भांडवलदार वर्गाचा दुय्यम भागीदार झालेला आहे. आपल्या ज्येष्ठ भागीदाराकडून सवलती मिळवण्याइतका तो बलशाली आहे. त्याला सवलती दिल्याशिवाय आपली पेंड चालणार नाही हे ब्रिटिश भांडवलदार वर्गाला पटलेले आहे. तेथील शेतकी व ग्रामीण भागातील उत्पादन भांडवलशाही पिळवणुकीच्या कक्षेत आणले गेले आहे. व्यापाऱ्यांनी शेतीतील केंद्रस्थान पटकावले आहे. हस्त-व्यवसायातील कारागीर यांत्रिक बनावटीच्या परदेशी मालाच्या आयातीने नष्ट झाले व त्यांचा भार शेतीवरच पडला. हिंदी भांडवलदार वर्गानेच स्वातंत्र्य चळवळीस सुरवात केली व ती वाढवली. परंतु जनतेच्या हिताच्या दृष्टीने स्वातंत्र्याचा लढा ही त्यांच्या सामाजिक मुक्ततेची सुरवात आहे; म्हणून

अनुक्रमणिका

स्वातंत्र्याचा लढा व वर्गयुद्ध हे बरोबरीनेच चालले आहे. स्वातंत्र्याच्या लढ्याबद्दलचा वकवा फार मोठा असला तरी त्यासोबतचे वर्गयुद्ध त्यामुळे झाकले जात नाही.

रॉय यांच्या विवेचनाचा हा त्रुटित गोषवारा आहे. त्यात चर्चिलेल्या प्रश्नासंबंधी मार्क्सवाद्यांत अजूनही हिरीरीने चर्चा चालू आहे व त्यांची निश्चित उत्तरे अजूनही आढळत नाहीत. पारीख यांनी या पुस्तकाला लिहिलेल्या प्रस्तावनेत अत्यंत विदग्ध व समतोल अशी चर्चा केली आहे. त्यात अभिनिवेशाचा संपूर्ण अभाव आहे. त्यांच्या आयुष्यातील शेवटच्या पर्वातील प्रशांत व ऋजू असे त्यांचे व्यक्तिमत्त्व या प्रस्तावनेत भरून राहिलेले आहे. रॉय यांच्या या पुस्तकातील मीमांसा आता फक्त ऐतिहासिक रसवस्तू एवढ्याच स्वरूपाची राहिली आहे असे त्यांनी म्हटले आहे. या पुस्तकाच्या पहिल्या प्रकरणात केलेले भारतीय भांडवलदार वर्गाच्या उदयाचे विवेचन हे त्यात वापरलेल्या अशोधित आकडेवार माहितीमुळे दूषित झालेले आहे असे खुद्द रॉय यांनीच नंतर मान्य केल्याचे पारीख नोंदतात. त्याचप्रमाणे रॉय यांनी केलेले गांधींच्या चळवळीचे मूल्यमापन चुकीचे होते हे इतरांनी दाखविल्याचे पारीख आपल्या प्रस्तावनेत स्वसंमती दर्शवून ग्रथित करतात. ह्या सर्व गोष्टी देऊन पारीख या पुस्तकाकडे ऐतिहासिक रसवस्तू म्हणून पाहण्याची वाचकांना शिफारस करतात. मार्क्सवादात संपूर्ण अवगाहन करून पुढे त्याच्या मर्यादा ओळखून त्याच्या पार जाणाऱ्या विचारवंताचे हे लिखाण आहे. आणि या मर्यादा ओळखल्या म्हणून मार्क्सवादाच्या कडव्या विरोधाची भूमिका न घेता त्याच्यापुढे विचारसंशोधन केले पाहिज असे मानणाऱ्या मनाचे हे विलसित आहे हे लक्षात ठेवावे असे पारीख बजावतात.

पारीख यांची ही निराग्रही व शुद्ध विश्लेषणाची दृष्टी त्यांनी येथे चर्चिलेल्या त्यांच्या व रॉय यांच्या आधीच्या दोन लिखाणांकडे वळवली असती तर माझ्याप्रमाणेच त्यांनाही त्या गोष्टी ऐतिहासिक रसवस्तू अशाच आता भावल्या असत्या. याबद्दल मला मुळीच शंका वाटत नाही.








अनुक्रमणिका

अ. भि. शहा

# विद्यापीठीय प्रशासन

[ 'विद्यापीठीय प्रशासन' हा कै. पारीख यांच्या जिव्हाळ्याचा विषय होता. बारा वर्षे त्यांनी या प्रशासनात घालविली. विद्यापीठांची पुन्हा नव्या पायावर रचना केल्याशिवाय भारतीयांच्या उच्च विद्या शिक्षणाला चांगले भवितव्य नाही. या दृष्टीने या लेखातील विचार मार्गदर्शक ठरतील. पारीख यांचे प्रस्तुत लेखक निकटचे स्नेही होते, त्यांचा परस्पर विचारविनिमयही वारंवार होत होता, ही गोष्टही या संदर्भात ध्यानात घ्यावी. – का. सं. ]

सार्वजनिक जीवनाच्या कुठल्याही क्षेत्रात प्रशासन हे साध्य नसून एक साधन असते. संस्थेची उद्दिष्टे साध्य होण्यास आवश्यक असलेल्या सवलती उपलब्ध करून देणे आणि संस्थेत कार्य करणाऱ्या घटकांमध्ये संघर्ष निर्माण होऊ नये व झाल्यास संस्थेच्या उद्दिष्टास बाध येऊ नये अशा पद्धतीने त्याचे निराकरण व्हावे, या दृष्टीने सत्तेची वाटणी करणे, हे प्रशासन-व्यवस्थेचे दोन महत्त्वाचे हेतू होत. विद्यापीठांच्या बाबतीत (यात महाविद्यालयांचाही समावेश आहे) तर हे विशेष महत्त्वाचे आहे.

प्रशासनाचे हे हेतू काही अंशी परस्परविरोधी आहेत, कारण सेवासंस्था आणि सत्तासंस्था या दोन्ही यशस्वीरीत्या चालविण्यास लागणारे गुण सहसा एकत्र आढळत नाहीत. म्हणून प्रशासन प्रामुख्याने सेवासंस्था राहाण्याऐवजी सत्तासंस्था होऊ नये याकरता काही संकेत पाळले गेले पाहिजेत. उदा., विद्यापीठातील प्रशासनशाखेवर त्याच्या ज्ञानशाखेचा अंकुश पाहिजे. म्हणजे विद्यापीठाच्या रचनेत प्रशासन करणारे अधिकारी व अधिकारमंडळे (ऑथॉरिटीज) ज्ञानशाखेवर कुरघोडी करणार नाहीत अशी व्यवस्था केली पाहिजे. तसेच प्रशासनाचे संकेत आणि प्रशासकांचे अधिकार यांची व्याख्या स्पष्ट असावयास पाहिजे. ज्ञानशाखा आणि प्रशासन यांच्यामध्ये, तसेच प्रशासनाच्या विविध अंगांमध्ये, कर्तव्य आणि अधिकार यांची वाटणी निःसंदिग्ध स्वरुपाची असावयास पाहिजे.

भारतीय विद्यापीठांची प्रशासकीय व्यवस्था या निकषावर उतरू शकत नाही. या व्यवस्थेत कोणते दोष आहेत आणि अधिक निकोप व्यवस्था निर्माण करावयाची असेल तर तिचे स्वरूप काय असेल, याचा विचार करण्यापूर्वी सध्याची प्रशासकीय व्यवस्था कशी आहे याची थोडक्यात माहिती करून घेणे योग्य होईल.

मुंबई, मद्रास आणि कलकत्ता येथील पहिली तीन भारतीय विद्यापीठे १८५७ मध्ये, म्हणजे १२० वर्षांपूर्वी स्थापन झाली. त्यावेळच्या भारतातील ब्रिटिश राज्यकर्त्यांना लंडन विद्यापीठाचे स्वरूप स्वीकारावेसे वाटले आणि म्हणून ही विद्यापीठे लंडन विद्यापीठाच्या धर्तीवर घडवली गेली. याप्रकारच्या विद्यापीठांचे एक महत्त्वाचे वैशिष्टच म्हणजे ती स्वतः शिक्षणाची जबाबदारी न घेता प्रत्यक्षात शिक्षणकार्य करणाऱ्या महाविद्यालयांना संलग्न संस्था म्हणून आपल्याशी जोडून घेतात, वेग-वेगळ्या परीक्षांचे अभ्यासक्रम ठरवून देतात आणि महाविद्यालयात शिकत असलेल्या विद्यार्थ्यांच्या परीक्षा घेण्याची व्यवस्था करतात. लंडन विद्या-पीठाचे स्वरूप यानंतर काही वर्षांत बदलण्यात आले आणि ते विद्यापीठ इंग्लंडमधल्या इतर विद्या-पीठांप्रमाणे प्रत्यक्ष शिक्षण देणारे विद्यापीठ झाले. परंतु भारतातील विद्यापीठे पूर्वीप्रमाणे महाविद्या-लयांना संलग्न करून घेणारी विद्यापीठे म्हणूनच राहिली. कालक्रमाने ही विद्यापीठे पदव्युत्तर

अनुक्रमणिका

शिक्षण देण्याची जबाबदारी स्वीकारू लागली आणि काही विद्यापीठे पदवीपूर्व शिक्षणही देऊ लागली आहेत. परंतु बहुतेक विद्यापीठे संलग्न करून घेणाऱ्या संस्था म्हणूनच कार्य करीत आहेत. काही विद्यापीठे सोडता, पदवीपूर्व शिक्षण घेणारे जवळ-जवळ सर्व विद्यार्थी आजसुद्धा संलग्न महाविद्यालयांत शिकत असतात आणि विद्यापीठांचे प्रत्यक्ष शिक्षणकार्य पदव्युत्तर शिक्षणापुरते मर्यादित असते.

संलग्न महाविद्यालयांमुळे भारतीय विद्यापीठांची रचना एका विशिष्ट स्वरूपाची राहिली आहे. सामान्यतः प्रत्येक विद्यापीठात तीन प्रकारची अधिकारमंडळे असतात. त्यातली विधिसभा ही विद्यापीठाच्या कारभारावर सर्वसामान्य देखरेख ठेवत असते व तिच्यावर शिक्षणक्षेत्रातील बाहेरच्या घटकांना बरेच प्रतिनिधित्व असते. विद्वत्सभा ही केवळ शिक्षकांची बनलेली असते व विद्यापीठांचे —आणि पर्यायाने महाविद्यालयांचे— शैक्षणिक कार्य कुठल्या स्वरूपाचे असावे याबाबतीत सल्ला देते व बऱ्याच प्रमाणात ठरवून देते. वेगवेगळ्या परीक्षांचे अभ्यासक्रम, परीक्षांचे नियम, इत्यादी गोष्टी विद्वत्सभा ठरवत असते.

विद्यापीठाची कार्यकारिणी, स्वतः आणि इतर अधिकारमंडळांनी केलेले निर्णय अंमलात आणत असते. प्रत्यक्षात कार्यकारिणी ही सर्वांत अधिक महत्त्वाची ठरते.

वर उल्लेख केलेल्या अधिकारमंडळांव्यतिरिक्त अभ्यासमंडळे ( बोर्ड्ज ऑफ स्टडीज ), ज्ञानशाखा ( फॅकल्टिज ), ज्ञानविभाग ( डिपार्टमेंट्स ) हे विद्यापीठांचे इतर महत्त्वाचे घटक असतात. तसेच कुलगुरू, कुलसचिव आणि वित्त अधिकारी (फिनॅन्स ऑफिसर ) हे तीन महत्त्वाचे अधिकारी आहेत.

विद्यापीठांची कार्यपद्धती सामान्यतः अशी असते. एखादा शैक्षणिक उपक्रम सुरू करावयाचा असेल तर अभ्यासमंडळ, ज्ञानशाखा, किंवा विद्वत्सभेमध्ये त्याबद्दल प्रथम सूचना करावी लागते. या सूचनेवर विद्वत्सभेचे मत कार्यकारिणीस कळविले जाते आणि कार्यकारिणीने संमती दिली, तर तो निर्णय कालक्रमाने अंमलात आणला जातो.

एखाद्या शैक्षणिक प्रश्नास आर्थिक अंग असले तर ती सूचना विधिसभेकडेसुद्धा पाठविली जाते आणि विधिसभेचे मत विद्वत्सभेच्या मताबरोबरच कार्यकारिणीपुढे येते. या पद्धतीत सामान्यतः कुठल्याही सूचनेवर निर्णय घेऊन ती मान्य झाल्यास अमलात यावयास फार वेळ लागू नये, असे सकृद्दर्शनी वाटते. परंतु प्रत्यक्ष अनुभव असा आहे, की कोणतीही महत्त्वाची सूचना ती केल्यापासून तिच्यावर अंतिम निर्णय होईपर्यंत सामान्यतः दोन वर्षे लागतात. म्हणजे सध्याची प्रशासनव्यवस्था, तिच्यात दुसरे काही दोष नसते तरी अतिशय वेळखाऊ आहे, हे मान्य केले पाहिजे. परंतु तिच्यात इतरही काही महत्त्वाचे दोष आहेत. या सर्व दोषांचे थोडक्यात वर्णन करावयाचे झाल्यास असे सांगता येईल की, आजची विद्यापीठीय प्रशासनव्यवस्था केंद्रीकरणाच्या तत्त्वावर उभारली आहे आणि म्हणून ती उपक्रमशीलता आणि शैक्षणिक स्वातंत्र्य या दोन्ही मूल्यांस स्वभावतःच मारक आहे. उदाहरण म्हणून कार्यकारिणीने संमत केल्याशिवाय कुठलेही शैक्षणिक निर्णय घेतले जाऊ नयेत, या दंडकाचा उल्लेख करता येईल. एखाद्या ज्ञानविभागास आपली अंतर्गत व्यवस्था शिक्षणाच्या दृष्टीने अधिक कार्यक्षम करावयाची असली तरीही त्याकरता ज्ञानशाखा, विद्वत्सभा आणि कार्यकारिणी यांची पूर्वसंमती मिळविणे आवश्यक असते. एखाद्या शिक्षकास नवीन अभ्यासक्रम सुरू करावयाचा असल्यास त्याकरता विभागप्रमुखाचीही संमती मिळविण्याची आवश्यकता असते. थोडक्यात, विद्यापीठास कोणताही आर्थिक भुर्दंड बसणार नाही, इतरांचे काही नुकसान होणार नाही आणि विद्यापीठीय शिक्षणात त्या विषयापुरती तरी प्रयोगशीलता येऊ शकेल, असा उपक्रम सुरू करण्याचेही स्वातंत्र्य आजच्या व्यवस्थेत शिक्षकांस किंवा ज्ञानविभागास नाही.

विद्यापीठात कार्य करणाऱ्या शिक्षकांस किंवा ज्ञानविभागास जसे स्वातंत्र्य नाही तसेच महाविद्यालयांना आणि महाविद्यालयात कार्य करणाऱ्या शिक्षकांनाही या अर्थाने शैक्षणिक स्वातंत्र्य नसते. या केंद्रीकरणामुळे किती हास्यास्पद परिस्थिती निर्माण होऊ शकते याचे एकच उदाहरण दिले तर

पुरे होईल. पुणे–मुंबईसारख्या शहरांतील महाविद्यालयांत जो अभ्यासक्रम शिकविला जातो तोच अभ्यासक्रम इस्लामपूर–अलिबागसारख्या विभागात कार्य करणाऱ्या महाविद्यालयांनासुद्धा सक्तीने शिकवावा लागतो. कारण सोपे आहे; सत्तेचे केंद्रीकरण असल्यामुळे वेगवेगळ्या महाविद्यालयांतील शिक्षक आपापल्या विद्यार्थ्यांच्या गरजेनुसार अभ्यासक्रम ठरवू शकत नाहीत. तसेच अभ्यासक्रम ठरविताना प्रगत महाविद्यालये व विद्यापीठाच्या ज्ञानविभागातील शिक्षक हे सामान्यतः प्रभावी ठरतात आणि म्हणून अभ्यासक्रमाचे स्वरूप केवळ नागर, पांढरपेशा आणि सांस्कृतिक दृष्ट्या पुढारलेल्या विद्यार्थ्यांपुरते ठरविले जाते.

महाविद्यालयीन पातळीवर प्रशासन आणखी एका कारणामुळे दूषित होत असते. काही अपवाद सोडले तर सामान्यतः महाविद्यालयांचा व्यवस्थापक वर्ग बहुतांशी शिक्षणक्षेत्राकडे एक सत्ताकेंद्र म्हणून पाहात असतो. यामुळे महाविद्यालयाच्या कारभारात जात, धर्म, गटवाजी आणि अरेरावी हे दोष प्रकर्षाने आढळतात. शिक्षणामुळे ज्या मूल्यांची जोपासना व्हावयास पाहिजे ती मूल्ये या व्यवस्थापकाना खऱ्या अर्थाने परिचित नसतात आणि म्हणून बरीचशी महाविद्यालये एका अतिशय मर्यादित अर्थानेच शिक्षणसंस्था म्हणून कार्य करीत असतात.

संलग्न महाविद्यालयांमुळे विद्यापीठांच्या कारभारावरसुद्धा एक महत्त्वाचे बंधन येते. उदा. विद्यापीठातील ज्ञानविभाग आणि त्याचे शैक्षणिक व प्रशासकीय प्रश्न यांच्याबाबतीत अनेकदा संलग्न महाविद्यालयांच्या संकुचित हिताच्या दृष्टीने निर्णय घेतले जातात. एवढेच नव्हे तर विद्यापीठाच्या कार्यकारिणीतसुद्धा विद्यापीठात कार्य करणारे शिक्षक आणि ग्रामीण महाविद्यालयांचे प्रतिनिधी अशाप्रकारचे गट दिसतात आणि या गटवाजीचा विद्यापीठाच्या इतर कार्यावरसुद्धा परिणाम होत असतो.

विद्यापीठीय प्रशासनातले हे दोष दूर करावयाचे असल्यास केंद्रीकरणाच्या तत्त्वास मूठमाती दिली पाहिजे. कारण या तत्त्वावर उभारलेल्या व्यवस्थेत कोणतेही बदल घडवून आणणे अवघड असते. बदल करताना तो विद्यापीठाशी संलग्न असलेल्या सर्व महाविद्यालयांना एकसारखा लागू पडला पाहिजे, या जाणिवेमुळे कुठलीही मूलगामी सूचना मान्य होऊ शकत नाही. याउलट विकेंद्रित व्यवस्थेत प्रयोग आणि सुधारणा करणे सोपे असते आणि प्रशासनव्यवस्था परिवर्तनशील परिस्थितीशी सुसंगत ठेवणे शक्य होते.

विद्यापीठ कायद्यात या दृष्टीने बदल करताना खालील गोष्टीं लक्षात ठेवणे आवश्यक आहे. (१) महाविद्यालयांना संलग्न करून घेणारी संस्था, असे विद्यापीठाचे स्वरूप न ठेवता प्रत्येक विद्यापीठास, पदवीपूर्व पातळीपासूनच प्रत्यक्ष शिक्षण देणारी संस्था केले पाहिजे. त्याचबरोबर, प्रत्येक महाविद्यालय विद्यापीठापासून सर्व बाबतीत स्वतंत्र व्हावयास पाहिजे आणि स्वतःचा अभ्यासक्रम ठरवून स्वतःच आपल्या विद्यार्थ्यांची परीक्षा घेऊन पदवीदान करण्याचा अधिकार त्याला मिळाला पाहिजे.

या सूचनेवर असा आक्षेप घेता येईल, की महाविद्यालयांना शिक्षण आणि परीक्षा याबाबत स्वातंत्र्य दिले तर शिक्षणाचा दर्जा फार खाली येईल. परंतु या म्हणण्यात काही अर्थ नाही. आज शिक्षणाचा दर्जा इतका घसरलेला आहे, की महाविद्यालयांना स्वातंत्र्य दिल्यामुळे तो अधिक घसरणे शक्य नाही. उलट आज सर्व महाविद्यालये एका दावणीत बांधली गेली असल्यामुळे, ज्यांना शिक्षणाचा दर्जा सुधारण्याची हौस आणि कुवत आहे त्यांनाही काही करता येत नाही. तसेच संलग्न महाविद्यालयांची धोंड विद्यापीठाच्या पायातून गेल्यानंतर त्यालाही आपले कार्य अधिक समाधानकारकरीत्या करता येईल.

(२) महाविद्यालयांना जशी विद्यापीठापासून स्वायत्तता मिळावयास पाहिजे तसेच प्रत्येक ज्ञानविभागाला प्रशासनाच्या दैनंदिन सत्तेपासून स्वातंत्र्य मिळाले पाहिजे. एकदा विद्यापीठाच्या अधिकारमंडळाने ज्ञानविभागाचे बजेट मान्य केले, की मग त्यानुसार खर्च करताना प्रत्येकवेळी अधिकाऱ्यांची पूर्वसंमती मिळविण्याची गरज राहू नये. तसेच विद्यापीठावर आर्थिक बोजा न टाकता

कुठल्याही ज्ञानविभागास शैक्षणिक दृष्टया प्रयोग किंवा बदल करावयाचा असल्यास त्याला हे स्वातंत्र्य असावे.

(३) विद्यापीठातील ज्ञानविभागासारखेच स्वातंत्र्य महाविद्यालयांतील ज्ञानविभागांस मिळाले पाहिजे.

(४) विद्यापीठीय किंवा महाविद्यालयीन प्रशासनापासून ज्ञानविभागास जसे स्वातंत्र्य मिळावयास पाहिजे तसेच ज्ञानविभागाच्या एकूण योजनेशी सुसंगत अशी स्वायत्तता प्रत्येक शिक्षकासही मिळावयास पाहिजे.

(५) विद्यापीठाच्या आणि महाविद्यालयांच्या अधिकारमंडळावर शिक्षकांना किमान ५० टक्के प्रतिनिधित्व मिळावयास हवे. असे झाल्यास दोन फायदे होतील. प्रशासनाचे काही प्रश्न खरोखर अवघड असतात आणि त्यांच्यावर केवळ पुस्तकी भूमिका घेऊन चालत नाही हे शिक्षकांना समजेल. त्याचबरोबर शैक्षणिक प्रश्नावर आज संचालक वर्ग जी बहुतांशी शिक्षणविरोधी भूमिका घेत असतो, तिलाही बऱ्याचप्रमाणात आळा बसेल.

प्रशासनातील विद्यार्थ्यांच्या सहभागाबद्दल आजकाल बरेच बोलले जाते. काही विद्यापीठांच्या कायद्यात विद्यार्थ्यांना विधिसभेवर प्रतिनिधित्व देण्याची तरतूदसुद्धा आहे. परंतु ही एका अर्थाने पलायनवादी भूमिका आहे. विद्यापीठ किंवा महाविद्यालयांच्या कारभारात काही गोष्टी विद्यार्थ्यांच्या सहभागाने झाल्या, किंबहुना त्यांनीच केल्या तर त्या अधिक चांगल्या होतील. म्हणून अशा बाबतीत, घालून दिलेल्या नियमांच्या मर्यादेत, विद्यार्थ्यांना संपूर्ण स्वातंत्र्य आणि जबाबदारी दिली पाहिजे. परंतु इतर बाबतीत विचारपूर्वक निर्णय घेण्याची विद्यार्थ्यांची कुवत नसते. उदा. अभ्यासक्रमाचे स्वरूप काय असावे, परीक्षापद्धतीत कोणत्या सुधारणा करता येतील, इत्यादी. अशा बाबतीत विद्यार्थ्यांशी विचारविनिमय करून अंतिम निर्णय त्या त्या प्रश्नावरचे तज्ज्ञ असतील त्यांनीच घेतला पाहिजे. शिक्षणक्षेत्रातील लोकशाही आणि राजकीय जीवनातील लोकशाही यात काही बाबतीत मूलभूत फरक असतो हे विसरता कामा नये. आपल्या देशात महाविद्यालयीन विद्यार्थ्यांचे वयोमान लक्षात घेता हा फरक अधिकच महत्त्वाचा ठरतो. त्याच्याकडे दुर्लक्ष केले, तर उच्च शिक्षणाच्या क्षेत्रात लोकशाहीच्या ऐवजी झुंडशाही प्रस्थापित होण्याचा संभव अधिक आहे.

याचबरोबर, विद्यार्थ्यांच्या तक्रारींचे त्वरेने व रास्तपद्धतीने निराकरण व्हावे आणि महाविद्यालयीन पातळीवर शिस्त स्वयंप्रेरणेने पाळली जावी, याकरता विद्यार्थ्यांचे प्राधान्य असलेली यंत्रणा निर्माण करणे आवश्यक आहे.

गेल्या काही वर्षांत विद्यापीठांच्या आणि महाविद्यालयांच्या कारभारात सरकारी हस्तक्षेप वाढला आहे. उदा. शिक्षकांनी किती तास घ्यावेत, नवीन लघुलेखक किंवा टंकलेखक घ्यावयाचा किंवा नाही, इत्यादी बाबतीतसुद्धा विद्यापीठे आता सरकारी शिक्षण खात्याच्या आणि कुलपतीच्या दप्तराचा एक विभाग बनली आहेत. याचे कारण विद्यापीठे आणि महाविद्यालये त्यांच्या दैनंदिन अस्तित्वाकरता सरकारी अनुदानावर अवलंबून असतात. म्हणून विद्यापीठीय प्रशासनात कोणतीही मूलभूत सुधारणा करावयाची असल्यास विद्यापीठांचे सरकारवरचे अवलंबित्व संपुष्टात आणले पाहिजे. याकरता दोन सूचना करून मी हा लेख संपवितो.

उच्च शिक्षणव्यवस्था खऱ्या अर्थाने स्वतंत्र व जिवंत व्हावयाची असेल, तर तिला दैनंदिन खर्चाकरता सरकारी अनुदान अजिबात मिळू नये. प्रत्येक विद्यापीठाला किंवा महाविद्यालयाला खर्चाची तोंडमिळवणी करण्याकरता शिक्षणशुल्क वाढविण्याचे स्वातंत्र्य असले पाहिजे. असे केले तर विद्यापीठे आणि महाविद्यालये सरकारी नियंत्रणापासून स्वतंत्र तर होतीलच; परंतु त्याचबरोबर बहुजन समाजाने प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष कराच्या स्वरूपात दिलेल्या पैशातून आपण मध्यम व वरिष्ठ वर्गांतील मुलांना उच्च शिक्षणाकरता जी सबसिडी देतो तीही बंद होईल आणि तो पैसा प्राथमिक शिक्षणाकरता उपयोगात आणता येईल. यावर असे म्हणता येईल, की फी वाढ झाल्यास बुद्धिमान परंतु गरीब विद्यार्थी उच्च शिक्षण घेऊ शकणार नाहीत. ही तक्रार रास्त आहे; परंतु तिच्यावर साधा तोडगा उपलब्ध



अनुक्रमणिका

आहे. उच्च शिक्षण सरकारपासून स्वतंत्र राहावे म्हणून आवश्यक असणारी वाढीव फी जे विद्यार्थी देऊ शकत नाहीत त्यांना कर्जाऊ शिष्यवृत्ती देण्याची व्यवस्था करता येईल. काही देशांत ही व्यवस्था बऱ्याच वर्षांपासून यशस्वीरीत्या अंमलात आणली जात आहे. विद्यार्थी मिळवू लागल्यानंतर त्याच्या पगारातून या शिष्यवृत्तीचे हप्ते आपोआप कापले जाऊन सरकारी तिजोरीत जमा करण्यात येतील, या प्रकारची कायदेशीर व्यवस्था करता येईल.

उच्च शिक्षणास सरकारी अनुदान अजिबात मिळू नये ही सूचना गांधीजींच्या विचारांशी जुळणारी असली, तरी आजच्या राजकीय पक्षांना आणि केंद्र किंवा राज्य सरकारांना ती मान्य होण्याचा संभव कमी आहे. म्हणून सध्यापुरती दुसरी एक अशी सूचना करता येईल, की विद्यापीठे आणि महाविद्यालये यांना देण्यात येणारे अनुदान विद्यापीठ समन्वय समिती ( युनिव्हर्सिटी कोऑर्डिनेशन कमिटी ) सारख्या एखाद्या स्वायत्त संस्थेच्या मार्फत दिले जावे. अशी संस्था निर्माण करणे शैक्षणिक दृष्टया नाहीतरी आवश्यक आहे. कारण, तिच्यामुळे वेगवेगळया विद्यापीठांच्या शैक्षणिक कार्यात थोडीतरी सुसूत्रता आणून आपल्याला उपलब्ध असलेल्या मनुष्यबळाचा आणि साधनसामुग्रीचा अधिकाधिक उपयोग करून घेता येईल. त्याचबरोबर प्रत्यक्षात उच्च शिक्षण देणाऱ्या संस्था आणि सरकार यांच्यामध्ये ही संस्था वफर म्हणून कार्य करू शकेल. केंद्रीय विद्यापीठांच्याबाबतीत विद्यापीठ अनुदान आयोगाचे काम या प्रकारचे आहे, किमान असावयास पाहिजे होते. राज्य पातळीवर विद्यापीठ समन्वय समिती हे कार्य करू शकेल आणि मग विद्यापीठे आणि महाविद्यालये आपल्या कारभारात काही मूलभूत सुधारणा घडवून आणण्यास समर्थ होतील अशी आशा बाळगता येईल.



अनुक्रमणिका

मे. पुं. रेगे

# विषमता, विवेक आणि हिंसा

हा अंक प्रा. गोवर्धन पारीख ह्यांच्या स्मृतीला वाहिलेला आहे. पारीखांच्या काही काळ सहवासात आलेल्या कुणावरही जर त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या कोणत्या अंगाचा सर्वात खोल आणि टिकून राहणारा असा ठसा उमटत असेल, तर तो त्यांच्या विवेकशीलतेचा असे. आपल्याशी संबंधित असलेली, आपल्या आजूबाजूला असलेली माणसे, आणि आपल्याला अज्ञात असणारी पण सर्वत्र विखुरलेली माणसे, मग ती कुठेही असोत, कधीही असोत ह्या साऱ्यांचे स्वास्थ्य, प्रतिष्ठा आणि कल्याण यांविषयी त्यांना खरीखुरी आस्था होती. म्हणून जे काही करायचे ते विचारपूर्वक, त्याच्या समग्र आणि दीर्घकालीन परिणामांचा अंदाज घेऊन, जपून, सावधानतेने ते करीत. अशा वृत्तीने वागण्यात सर्वांच्या कल्याणाची जबाबदारी आपल्या शिरावर आहे ही प्रौढी किंवा अहंकार नव्हता किंवा स्वतःच्या कर्तृत्वाविषयी भ्रम आणि दुरभिमानही नव्हता. एक नैतिक कर्ता म्हणून आपल्या असलेल्या जबाबदारीच्या व्याप्तीची उत्कट आणि सदैव जागरूक अशी जाणीव होती. ह्यामुळे जे करणे इष्ट/योग्य असेल ते करण्याचे त्यांनी कधी टाळले नाही; पण इष्ट किंवा योग्य काय आहे हे ठरविताना कितीही तीव्र असलेल्या भावनांचा किंवा कितीही उत्कट अशा ऊर्मींचा पगडा स्वतःवर कधी बसू दिला नाही. त्यांची नैसर्गिक वृत्ती अतिशय भावनाप्रधान आणि संवेदनशील होती ही गोष्ट ध्यानात घेतली तर ही विवेकशीलता अधिकच उठून दिसते.

आज एका खोल आणि तीव्र असंतोषाने आणि अस्वस्थतेने मानवी समाजाचे अंतरंग ढवळून निघत आहे आणि ह्या अस्वस्थतेचे हिंसक, विध्वंसक, अनेकदा आंधळे आणि आततायी म्हणता येतील असे उद्रेक सर्वत्र होताना आढळून येत आहेत. ही हिंसक कृत्ये इतक्यांदा आणि इतकी वारंवार होत आहेत की आपल्याला आता त्यांचा सराव होऊ लागला आहे. ह्या पार्श्वभूमीवर पारीखांसारख्यांच्या विवेकशीलतेला अधिकच महत्त्व प्राप्त होते. पण हे कोणत्या प्रकारचे महत्त्व आहे ? एखाद्या प्रकारचे कृत्य नैतिक आहे की नाही हे त्याच्या संभाव्य, अपेक्षित परिणामांवरून आपण ठरवितो. मोहाच्या, वैयक्तिक अडचणीच्या प्रसंगी जे नैतिक असेल ते कृत्य करायला नैतिक नेकी लागते आणि म्हणून नैतिक नेकीचेही नैतिक व्यवहाराच्या दृष्टीने मूल्य असते. पण ज्यांना आपण काठावरचे, टोकावरचे प्रसंग म्हणू अशा प्रसंगांची कल्पना करता येते. अशा प्रसंगी कृत्यांच्या परिणामांची दखल घ्यायचे कारण नसते कारण ज्यांच्या वतीने ह्या परिणामांची दखल घ्यावी लागली असती त्यांचे अस्तित्वच हे परिणाम विकसित होण्याअगोदर संपुष्टात येईल अशी परिस्थिती असते. मरणोन्मुख सर फिलिप सिडनीने आपल्या मरणोन्मुख सैनिक सहकाऱ्याला आपल्या तोंडचा पाण्याचा प्याला दिला हा प्रसंग काहीसा ह्या स्वरुपाचा आहे. समजा, अणुयुद्ध झाले आहे, विषारी किरणोत्सर्गाने सर्वच जीवन पुढील अर्ध्या तासात नष्ट होणार हे निश्चित झाले आहे, अशा वेळी यातनांनी तळमळत असलेल्या एखाद्या डॉक्टरने स्वतःजवळील गुंगीच्या औषधाची शेवटची कुपी जवळच्या, तळमळत असलेल्या लहान मुलाला पाजून संपविली तर ह्या डॉक्टरची नैतिक नेकी धीरोदात्त ठरेल. व्यवहाराच्या दृष्टीने तिचे महत्व फारसे असणार नाही. पण मानवतेचे प्रतीक म्हणून, माणूस स्वतःच्या सुखदुःखापलीकडे जाऊ शकतो, स्वतःची सुखदुःखे बाजूला सारून केवळ इतरांसाठी म्हणून कृत्ये करू शकतो ही शक्यता, माणसाच्या ठिकाणी असलेली ही नैतिक कुवत, हिचे

प्रतीक म्हणून डॉक्टरच्या नैतिक नेकीचे महत्त्व असाधारण आहे. पारीख आणि त्यांचे सहधर्मी ह्यांच्या विवेकशीलतेचे महत्त्व असेच केवळ प्रतीकात्मक आहे, की आजच्या आणि भावी सामाजिक व्यवहाराच्या आणि उद्दिष्टांच्या दृष्टीनेही तिला महत्व आहे?

वर म्हटल्याप्रमाणे हिंसाचारी कृत्यांचा आज आपल्याला सराव होतो आहे. पण हा हिंसाचार इतक्यांदा, इतक्या वारंवार, अनेकदा इतक्या निर्घृण आणि अनाकलनीय स्वरूपात होत आहे, अनपेक्षित व्यक्तींकडून होत आहे, की मानवसमाजापुढची एक मोठ्या चिंतेची बाब असे रूप त्याला प्राप्त झाले आहे. आज जगभर विमानवाहतुकीचे जाळे पसरले आहे. प्रवाशांना जलद प्रवास करता यावा, प्रवासात सुरक्षितता असावी, पुरेशा सुखसोयी असाव्यात ह्यासाठी एक मोठीच मानवी यंत्रणा उभारण्यात आली आहे आणि ती एकंदरीत पाहता अतिशय कार्यक्षमतेने आपले काम पार पाडीत आहे. आणि तरीही मधूनमधून अपघात घडतात. अपघात कितीही हानिकारक असले तरी एवढ्या प्रमाणावर विमानवाहतूक होत असताना मधूनमधून कुठेकुठे अपघात होणे जवळ जवळ अटळ आहे असेच आपण म्हणू. तरीही अपघात होणार नाहीत अशी सर्वतोपरी खबरदारी घेणे, हे ह्या यंत्रणेचे प्राथमिक कर्तव्य आहे असेही आपण म्हणू. विमानांच्या अपघातांकडे आपण पाहतो तसेच कदाचित् ह्या हिंसक कृत्यांकडे आपण पहात असू. म्हणजे अपघात होणे जसे हानिकारक आणि अनिष्ट असते तसेच हिंसाचार हाही अनिष्ट आणि हानिकारक असतो. पण आजची प्रचंड लोकसंख्या पाहिली, लोकांमधील गुंतागुंतीचे आर्थिक, सामाजिक आणि राजकीय संबंध ध्यानात घेतले, कोणत्याही आर्थिक, सामाजिक, राजकीय धोरणामुळे सुरू होणाऱ्या व पसरत जाणाऱ्या बऱ्यावाईट परिणामांची, कित्येकांना बऱ्या, कित्येकांना वाईट असलेल्या परिणामांची, मालिका ध्यानी घेतली तर मधूनमधून कुठे ना कुठे हिंसेचा उद्रेक होणे अटळ ठरणार. तथापि ह्या हिंसाचार कमीत कमी वेळा होईल, आणि जेव्हा घडेल तेव्हा त्याच्यापासून कमीत कमी हानी होईल ह्यासाठी आवश्यक ते सर्व परिणामकारक मार्ग शोधून काढून वापरणे हे सर्व जबाबदार संबंधितांचे, उदा. राजकारणी, पोलिस अधिकारी, गुप्त हेर ह्यांचे कर्तव्य असते. तेव्हा मधूनमधून हिंसाचार घडणार हे अटळ असले तरी हिंसाचाराचा बंदोबस्त कसा करायचा असा आपल्यापुढील प्रश्न आहे.

पण हिंसाचार ही अपघातासारखी अनिष्ट आपत्ती नसते, ती कित्येकांची कृती असते. जे हिंसाचार करतात त्यांच्या दृष्टीने हिंसक कृत्य हानिकारक असले, त्यामुळे काही माणसे मरत असली, जायबंदी होत असली, मालमत्तेचा विध्वंस होत असला, तरी ते करणे हे त्याचे कर्तव्य असते; ते न करणे हे त्यांच्या दृष्टीने कर्तव्यात कुचराई करणे असते. एक मोठा अन्याय करण्यात आलेला असतो आणि चालू ठेवण्यात आलेला असतो व अनेक माणसे त्याने गांजलेली असतात. पण तो दूर करायला ती असमर्थ असतात, ती हतबल असतात. हा अन्याय दूर करू शकतील असे अनेक लोक, अन्याय चालू ठेवण्यात त्यांचा लाभ असल्यामुळे, निदान त्यांची प्रत्यक्ष हानी होत नसल्यामुळे, त्याचे निराकरण करायला प्रवृत्त होत नाहीत. अशा स्थितीत अन्याय दूर करण्यासाठी आवश्यक असेल तर हिंसेचा वापर करून सर्व ते प्रयत्न करणे हे न्यायाच्या बाजूने उभे राहाणाऱ्याचे न टाळता येण्याजोगे कर्तव्य ठरते. तेव्हा हिंसक कृत्यांविषयीचा आपला सर्वसामान्य दृष्टिकोन आणि अनेकांचा त्यांच्याविषयीचा दृष्टिकोन ह्यांच्यांत मूलभूत भेद विरोध आढळून येतो. आपल्याला निर्घृण, हिडिस वाटतील अशी कृत्ये करणाऱ्या व्यक्ती अनेकांच्या दृष्टीने अन्यायाविरुद्ध लढताना सर्वस्वाचे बलिदान करणारे हुतात्मे असतात. समजा, ब्रिटिश अमदानीत जर एखाद्या, ब्रिटिशांमध्ये खंबीर प्रशासक म्हणून मान्यता पावलेल्या आणि भारतीयांमध्ये बेदरकार आणि जुलमी म्हणून कुप्रसिद्ध झालेल्या ब्रिटिश कलेक्टरवर हल्ला करण्यासाठी म्हणून फेकलेला बॉम्ब एखाद्या म्हाताऱ्या मिशनरी बाईवर पडून तिची हत्या झाली असती, तर ह्या हिंसक कृत्याकडे पाहाण्याची सर्वसाधारण ब्रिटिशांची दृष्टी आणि सर्वसाधारण सुशिक्षित भारतीयांची दृष्टी ह्यांच्यांत असाच खोलवर जाणारा विरोध आढळून आला असता. वर मी हिंसक कृत्यांकडे पाहण्याचा 'आपला'

दृष्टिकोन आणि 'अनेकांचा' दृष्टिकोन असा भेद केला आहे. ह्यातून 'आपला' म्हणजे कोणाचा हा प्रश्न उपस्थित होतो. ह्या प्रश्नाला पुढे स्पर्श होईलच. ह्या क्षणी एवढेच स्पष्टीकरण करणे आवश्यक आहे, की ज्याचा 'अनेकांचा' दृष्टिकोन म्हणून मी उल्लेख केला आहे, आणि ज्याच्यात आणि 'आपल्या' दृष्टिकोनात भेद केला आहे तो काही मूठभर लोकांचा, अल्पसंख्य, माथेफिरू, विकृत आततायी मंडळींचा दृष्टिकोन आहे असे सूचित करण्याचा माझा उद्देश नाही. किंबहुना हिंसक कृत्यांकडे आणि ती करणाऱ्यांकडे प्रथमपासूनच अशा रीतीने पाहिले जाऊ नये असे पटविणे हा ह्या विवेचनाचा एक प्रमुख उद्देश आहे. हिंसक कृत्यांना आळा कसा घालावा अशी आपल्यापुढे व्यावहारिक समस्या आहे असे आपण मानतो. पण हिंसक कृत्यांकडे पाहण्याचे हे जे परस्परविरोधी दृष्टिकोन आहेत त्यांचा उलगडा कसा करायचा, त्यांच्यातील कोणता दृष्टिकोन एकंदरीत पाहता प्रमाण आहे आणि का प्रमाण आहे हे काही विवेकाधिष्ठित (रॅशनल) तत्त्वांच्या, प्रमाण युक्तिवादांच्या आधारे कसे ठरविता येईल हे पाहणे ही आपल्यापुढील तात्त्विक समस्या आहे आणि ह्या तात्त्विक समस्येचे स्वरूप स्वतःशी बरेचसे स्पष्ट केल्याशिवाय आपल्यापुढे नेमकी कोणती व्यावहारिक समस्या आहे, हे स्पष्ट होणार नाही.

पण आजच्या विद्यापीठीय नैतिक आणि राजकीय तत्त्वज्ञानात राजकीय हिंसेविषयी तात्त्विक पातळीवर मूलगामी विचार होताना आढळत नाही. ह्या प्रश्नाविषयी एक प्रकारची अनास्था, अरुचीही म्हणता येईल, आढळून येते. ह्याचे एक महत्त्वाचे कारण असे, की येथे एक गंभीर, उग्र असा व्यावहारिक प्रश्न असला तरी तात्त्विक असा कोणताही प्रश्न नाही. फारतर मानसशास्त्रीय प्रश्न आहे असेच मानण्याकडे बहुतेक तत्त्ववेत्त्यांची प्रवृत्ती असते. म्हणजे असे, की हिंसक कृत्ये ही गैर, अनैतिक, अविवेकी असतात हे स्वयंसिद्ध आहे, किंवा उघड आहे, हे तत्त्वांपासून सिद्ध करायचा खटाटोप करता येईल; पण तो अनावश्यक आहे, फारतर, असे असतानाही काही माणसे हिंसाचाराला का प्रवृत्त होतात, त्यांची अशी मनोधारणा का बनते ह्याची मानसशास्त्रीय आणि सामाजिक कारणे शोधून काढण्याचा एक प्रश्न मानसशास्त्रज्ञांपुढे आणि समाजशास्त्रज्ञांपुढे आहे असे म्हणता येईल, अशीच बहुतेक तत्त्ववेत्त्यांची ह्या बाबतीतील सर्वसाधारण भूमिका असते. पण तात्त्विक दृष्ट्या पाहता ही भूमिका प्रारंभापासून स्वीकारणे योग्य होणार नाही. नैतिक तत्त्वांच्या आधारे केलेल्या युक्तिवादांचा निष्कर्ष म्हणून ह्या भूमिकेला आपण येऊन ठेपलो तर ते योग्य ठरेल. हिंसाचाराची तात्त्विक मीमांसा करायला तत्त्ववेत्ते इतके अनुत्सुक का असतात, हाही मग आपल्यापुढील एक प्रश्न होऊन बसतो.

ह्या एकंदर परिस्थितीत विषमता आणि हिंसा ह्याविषयी आपण सर्वसाधारणपणे ज्या पद्धतीने विचार करतो तिच्या संबंधात टेड हाँडेरिक यांनी उपस्थित केलेले मुद्दे वाचकांना विचारार्ह वाटतील.*

एका गोष्टीचा सुरवातीलाच खुलासा करणे इष्ट ठरेल. हाँडेरिक यांनी ज्या पद्धतीने हे मुद्दे उपस्थित केले आहेत ती लक्षात घेता हिंसक कृत्यांचे समर्थन करण्याकडे त्यांचा कल आहे असा एखाद्याचा ग्रह होण्याची शक्यता आहे. पण ह्या उद्देशाने हे मुद्दे उपस्थित करण्यात आले आहेत असे मानायचे कारण नाही. हिंसक कृत्यांचा तात्त्विक पातळीवरून चोखपणे विचार करायचे आपण टाळतो, त्यांचा विचार केलाच तर घाईगर्दीने एखाद्या न रुचणाऱ्या समस्येची वासलात लावावी आणि ती बाजूला सारावी अशा पद्धतीने त्यांचा विचार करतो हे दाखवून देणे, हे त्यांचे उद्दिष्ट आहे. कोणत्या परिस्थितीत केलेली, कोणत्या प्रकारची हिंसक कृत्ये, कोणत्या कारणांसाठी, कितपत समर्थनीय ठरतात, की कोणतीही हिंसक कृत्ये कधीही समर्थनीय ठरत नाहीत हा पुढचा, कोणत्या तत्त्वांचा अवलंब करून ह्याविषयी विचार करावा हे काहीसे निश्चित झाल्यानंतर करायचा विचार आहे. आजची परिस्थिती अशी आहे, की हिंसक कृत्यांविषयी असा पद्धतशीर विचार करण्याविषयी एक खोल

* विषमता आणि हिंसा, आणि आपण त्यांच्यांत जो भेद करतो त्या वेषयी; 'नेचर अँड काँडक्ट, रॉयल इन्स्टिटयूट ऑफ फिलॉसॉफि लेक्चर्स, खंड ८ वा.

अरुची विचारवंतांच्या मनांत आढळून येते. ह्या वस्तुस्थितीचे विश्लेषण करणे हा हॉंडेरिक यांचा प्रमुख उद्देश आहे.

पहिला मुद्दा असा, की आजचे बरेचसे नैतिक, सामाजिक आणि राजकीय तत्त्वज्ञान काही सामान्य तत्त्वे घालून देते किंवा उद्घोषित करते. पण ज्या मूर्त आणि वास्तव परिस्थितीत ह्या तत्त्वांना अनुसरून धोरणे आखावी लागतात किंवा कृत्ये करावी लागतात तिचा तपशिलवार विचार करीत नाही. तत्त्वज्ञानाचे उद्दिष्ट संकल्पनांचे विश्लेषण करणे, स्पष्टीकरण करणे एवढेच आहे असे मानण्यात येते. उदा. 'कर्तव्य', 'नीती', 'न्याय', 'समता', 'कायद्याचे राज्य', 'सार्वभौमत्व', इ. संकल्पना. ह्या संकल्पनांशी काही तत्त्वे निगडित असतात हेही मान्य करू या. उदा. 'सर्वांना समान संधी मिळणे योग्य आहे' किंवा 'सर्वांना सारखी वागणूक मिळणे योग्य आहे', इ. आता ज्या वास्तव परिस्थितीत ह्या संकल्पनांचे आणि तत्त्वांचे उपयोजन करावे लागते तिचा विचार करायचा, तर वस्तुस्थिती काय आहे हे पहावे लागते. पण वस्तुस्थितीचा (फॅक्ट्स) अभ्यास करणे हे तत्त्वज्ञानाचे कार्य नव्हे, ते सामाजिक विज्ञानांचे कार्य आहे असे मानण्यात येते. एखाद्या तत्त्ववेत्याने सामाजिक वस्तुस्थितीचा तत्त्वांचा वापर कसा केला पाहिजे ह्याची काही उदाहरणे देण्यासाठी म्हणून केवळ नव्हे, तर वस्तुस्थिती प्रत्यक्षात कशी आहे हे समजून घेण्यासाठी म्हणून अभ्यास केला किंवा आपल्या लिखाणात निर्देश केला, तर तो तत्त्वज्ञानाचे विहित क्षेत्र सोडून दुसऱ्याच ज्ञानशाखेत रिघला आहे असेच मानण्यात येईल. तात्त्विक लिखाणात वस्तुस्थितीचे तपशीलवार निवेदन अनावश्यक आणि अस्थानी असते ह्या समजुतीमुळे बरेचसे तात्त्विक लिखाण अमूर्त (ॲब्स्ट्रॅक्ट) आणि वांझोटे ठरते. त्याच्यात कित्येक तत्त्वांची मांडणी करण्यात येते, त्यांचे परस्परसंबंध स्पष्ट करण्यात येतात; पण एक अधांतरी चाललेला बौद्धिक खेळ यापलीकडे ह्या बौद्धिक प्रयत्नाला अर्थ रहात नाही. पण आजघडीला कोणती तत्त्वे स्वीकारणे आणि त्यांचे कसे उपयोजन करणे योग्य ठरेल ह्याविषयी सम्यक् निर्णय घ्यायचा झाला, तर ज्या परिस्थितीत आज आपल्याला व्यवहार करायचा आहे तिची नीट माहिती आपल्याला असली पाहिजे, ही गोष्ट उघड आहे.

हिंसक कृत्यांविषयी तात्त्विक विचार करायचा, तर त्यांच्याशी विशेष संबंधित असलेली वस्तुस्थिती म्हणजे आजची विषमता. ह्या संदर्भात 'हिंसक कृत्यां'चा अर्थ असा करू : 'शासनाची व्यवस्था, शासनकर्ती मंडळी किंवा शासनाची धोरणे ह्यांच्यांत बदल घडवून आणण्याच्या उद्देशाने आणि ह्याचा परिणाम म्हणून आपल्या किंवा इतर समाजातील व्यक्तींच्या परिस्थितीत, जीवनात बदल घडवून आणण्याच्या उद्देशाने, व्यक्तींविरुद्ध किंवा मालमत्तेविरुद्ध बळाचा फार मोठ्या प्रमाणावर केलेला, विध्वंसक वापर.' ह्या स्वरूपाच्या कृत्यांना राजकीय हिंसा म्हणू. उदा. एका देशाने दुसऱ्या देशाशी युद्ध केले, तर ती ह्या अर्थाने राजकीय हिंसा ठरत नाही. राजकीय हिंसेचा आणि सामाजिक विषमतेचा घनिष्ठ संबंध आहे ह्यात शंका नाही.

ह्या विषमतेचे प्रमाण लक्षात येण्यासाठी हॉंडेरिक ह्यांनी कित्येक सत्य, ज्यांच्याविषयी संशय घ्यायला जागा नाही, अशा गोष्टींचा उल्लेख केला आहे. आज अमेरिकेत (युनायटेड स्टेट्समध्ये) गोऱ्या लोकांचे सरासरी आयुर्मान काळ्या लोकांच्या सरासरी आयुर्मानापेक्षा सात वर्षांनी कमी आहे. अमेरिकेत जर काही मूलभूत आर्थिक आणि सामाजिक बदल झाले नाहीत तर पुढील वीस वर्षात काळ्या लोकांचे आयुर्मान वाढेल पण गोऱ्या लोकांच्या बरोबरीने येणार नाही. ह्या संदर्भात विकसित आणि अविकसित देशांतील प्रजेच्या सरासरी आयुर्मानाचे आकडे लक्षात घेण्यासारखे आहेत.

जन्माच्या वेळची आयुर्मानाची अपेक्षा

| | गिनी | नायजीरिया | भारत | कोलंबिया |
|---|---|---|---|---|
| पुरुष | २६ | ३७ | ४२ | ४४ |
| स्त्री | २८ | ३७ | ४१ | ४६ |

| | फ्रान्स | इंग्लंड | अमेरिका |
|---|---|---|---|
| पुरुष | ६९ | ६९ | ६ |
| स्त्री | ७६ | ७५ | ७४ |

म्हणजे सर्वसाधारण भारतीय ज्याला मध्यम वय म्हणता येईल त्या वयाला येईतो मरतो. गिनीच्या सर्वसाधारण रहिवाशाच्या एका आयुष्याबद्दल

प्रगत देशातील सर्वसाधारण माणसाला दोन आयुष्ये लाभलेली असतात.

अमेरिकेतील गोऱ्या आणि काळ्या माणसांच्या आयुर्मानात असलेली ही तफावत भरून काढता येणे शक्य आहे का? ही भरून काढण्यासाठी आवश्यक असलेले वैज्ञानिक आणि तांत्रिक ज्ञान आणि भौतिक साधनसामग्री पुरेशा प्रमाणात उपलब्ध आहे का? हा ह्या संदर्भातील अतिशय महत्त्वाचा प्रश्न आहे. आणि त्याचे उत्तर, हे शक्य आहे असे द्यावे लागेल. कारण गोऱ्या लोकांचे सरासरी आयुर्मान १९२० मध्ये ५४.९ होते, १९४० मध्ये ६४.२ होते आणि १९६० मध्ये ७०.६ होते. म्हणजे २० वर्षांच्या अवधीत आयुर्मानात ७ वर्षांची वाढ करणे शक्य आहे.

अविकसित देशांच्या बाबतीतील परिस्थिती अधिक गुंतागुंतीची आहे. अनेक सांस्कृतिक, सामाजिक, राजकीय, भौतिक कारणांमुळे अविकसित देशांची झपाट्याने आर्थिक प्रगती व्हायला प्रतिबंध होतो असे मानण्यात येते आणि त्याच्यात तथ्य आहे. पण एक संबंधित वस्तुस्थिती लक्षात घेतली पाहिजे. ती ही की आज जगात जे तंत्रज्ञान आणि साधनसामुग्री उपलब्ध आहे ती लक्षात घेता, अविकसित देशांचा आर्थिक विकास साधण्याचा खराखुरा प्रयत्न झाला तर त्याला किती प्रमाणात यश येईल, किती प्रमाणात हा आर्थिक विकास साधता येईल हे ज्याच्या आधारे ठरविता येईल असा पुरावा उपलब्ध नाही; कारण असा प्रयत्नच झालेला नाही. आर्थिक दृष्ट्या प्रगत असलेल्या देशांनी अप्रगत देशांना मदत करण्यासाठी म्हणून आपल्या वार्षिक राष्ट्रीय उत्पन्नाचा एक टक्का देण्याचे १९६४ साली मान्य केले होते. बहुतेक प्रगत देशांनी हे वचन पाळले नाही; फारच थोड्या देशांनी एक टक्क्यापेक्षा अधिक मदत केली. पण सर्व प्रगत देशांकडून मिळून त्यांच्या एकत्रित राष्ट्रीय उत्पन्नाचा एक टक्का इतका भाग कोणत्याही वर्षी मागासलेल्या देशांना लाभला नाही. मागासलेल्या देशांतील भयानक दारिद्र्य दूर करण्याची 'कुवत' प्रगत देशांच्या ठिकाणी आहे की नाही ह्या प्रश्नाचा विचार करताना आपल्या राष्ट्रीय उत्पन्नाच्या एक टक्क्याहून कमी संपत्तीचा, साधनसामग्रीचा वापर प्रगत राष्ट्रांनी ह्या कामासाठी केला तर काय काय साधता येईल एवढ्याच गोष्टीचा विचार करून भागणार नाही हे उघड आहे. बहुसंख्य माणसे हलाखीच्या अवस्थेत जगत आहेत ही एक निकडीची आणि भयानक समस्या आहे असे जर मानले तर तिच्यातून मार्ग काढायला निकराचे प्रयत्न करणे 'युद्धकालीन प्रयत्नांसारखे प्रयत्न करणे' आवश्यक आहे अशीच कुणाचीही धारणा होईल. असे प्रयत्न झालेलेच नाहीत.

तेव्हा समाजाच्या अंतर्गत असलेली विषमता आणि वेगवेगळ्या समाजांच्या दरम्यान असलेली विषमता ही आजची एक मूलभूत आणि व्यापक वस्तुस्थिती आहे. ही विषमता दूर करण्याची व्यावहारिक शक्यता असूनही ती दूर करण्याची, निदान बरीचशी सौम्य करण्याची कुवत ज्यांच्या ठिकाणी आहे ते ह्यासाठी प्रयत्न करीत नाहीत, हीही वस्तुस्थिती आहे. शिवाय ही विषमता केवळ विषमता म्हणून आक्षेपार्ह आहे असे नाही. समजा एखाद्याने परिपूर्ण सामाजिक समता हा आदर्श म्हणून स्वीकारला असेल आणि हे ध्येय मानून ते साध्य करण्याचा त्याचा प्रयत्न असेल, अशा व्यक्तीच्या दृष्टीने कोणत्याही दोन सामाजिक गटांमधील विषमता, ती केवळ विषमता आहे म्हणून, कोणत्याही परिस्थितीत आक्षेपार्ह राहील. म्हणजे ह्या दोन गटांमधील जो कनिष्ठ गट आहे तो सुस्थितीत असला, तरी त्याच्यातील आणि श्रेष्ठ गटातील विषमता समतेच्या ह्या पुरस्कर्त्यांच्या दृष्टीने अनिष्ट असेल व ती दूर करण्याचा त्याचा प्रयत्न राहील. पण आज जी विषमतेची समस्या आहे तिचे स्वरूप ह्या प्रकारचे नाही. मागासलेल्या देशातील बहुसंख्य लोक दारिद्र्याने गांजलेले आहेत. वर सरासरी आयुर्मानाचे जे आकडे दिले आहेत त्यांचे रूपांतर माणसांच्या दैनंदिन अनुभवात करणे आवश्यक आहे. उपासमार, रोग, शारीरिक वेदना, असह्य काबाडकष्ट, लाचारी, अप्रतिष्ठा, मुलाबाळांचे आजार, त्यांचे अपमृत्यू, असहायता, सबंध जीवन ग्रासून टाकणारी निराशा अशा स्वरूपात हा त्यांचा अनुभव आपल्याला डोळ्यांसमोर स्पष्टपणे आणि स्थिरपणे आणावा लागेल.

आता एक गोष्ट म्हणता येईल. ही विषमता दूर करण्याची किंवा बरीचशी सौम्य करण्याची कुवत ज्यांच्या ठिकाणी आहे, ते ह्या उद्देशाने काही दृढ प्रयत्न करीत नाहीत. ह्याचे एक महत्त्वाचे कारण असे, की तिचे हे भयानक स्वरूप त्यांच्या ध्यानी नसते. सर्वसाधारण अमेरिकन गोरा माणूस घेतला, तर भारतातील प्रचंड दारिद्र्याची स्पष्ट कल्पना त्याला नसते. ह्याविषयीचे काही आकडे मधूनमधून त्याच्या वाचनात, ऐकण्यात येत असतील. पण ते तेवढ्यापुरतेच असते आणि ह्या आकड्यांचे प्रत्यक्ष मानवी अनुभवात रूपांतर करण्याइतकी, त्यांचा अर्थ ध्यानी घेण्याइतकी फुरसद त्याला नसते. सर्वसाधारण सुशिक्षित मध्यमवर्गीय भारतीय घेतला, तर स्वतःच्या संकुचित व्यावसायिक आणि सामाजिक वर्तुळापलीकडे जे घडते किंवा असते त्याची त्याला फारशी कल्पना नसते; त्याच्यात त्याला फारसा रसही नसतो. दारिद्र्याविषयीच्या अनास्थेचे एक कारण दारिद्र्याच्या भयानक स्वरूपाविषयीचे अज्ञान होय. सर्वसाधारण माणसे पूर्णपणे निःस्वार्थी, इतरांची दुःस्थिती कमी करावी ह्यासाठी कोणत्याही स्वार्थत्यागास तयार असलेली अशी नसतात हे जसे खरे आहे, त्याप्रमाणे ती पूर्णपणे निर्दय, सहानुभूतिशून्य नसतात हेही खरे आहे. पण मग असे म्हणता येईल. आपली उद्दिष्टे, धोरणे, कार्यक्रम ह्यांविषयी निर्णय घेताना ज्या परिस्थितीत आपण हे निर्णय घेतो तिची पुरेशी माहिती आपण करून घ्यावी, हे जर विवेकाला धरून वागण्यात अंतर्भूत असेल, अशी माहिती करून घेणे हा जर विवेकशील वर्तनाचा भाग असेल, तर मग ह्या विषमतेची पुरेशी जाण बाळगणे हे विवेकाला अनुसरून आपले कर्तव्य ठरते.

ह्याच दृष्टीने पाहता हिंसक कृत्यांच्या स्वरुपाची व परिणामांची पुरेशी जाण बाळगणे हेही आपले कर्तव्य ठरते. उदा. समजा बाँबचा स्फोट केला आणि त्यामुळे काही माणसे मेली आणि काही जायबंदी झाली. हे स्फोटाचे लगेच घडून आलेले परिणाम होत. पण समजा ह्यात कुटुंबातील एकुलता एक कमावणारा माणूस मरण पावला. तर त्याचे परिणाम कुटुंबातील माणसांना दीर्घकाल भोगावे लागणार. एखाद्या माणसाचे डोळे गेले तर आंधळा माणूस म्हणून त्याला जन्म काढावा लागणार.

आता समजा विषमता आणि हिंसक कृत्ये ह्यांच्याविषयीची सर्व संबंधित वस्तुस्थिती आपण ध्यानात घेतली. ह्यानंतर काही संकल्पनांना किंवा तत्त्वांना अनुसरून आपण त्यांच्याविषयी काही निर्णय घ्यायला प्रवृत्त होतो. हिंसक कृत्यांचा विचार करू. आपण हे तत्त्व स्वीकारलेले असेल, की लोकशाही राज्यात राज्यसंस्थेचा किंवा शासनाचा नागरिकांवर न्याय्य अधिकार असतो आणि म्हणून कायद्याने घातलेली बंदी तोडून हिंसक कृत्य करणे हे नेहमीच निषिद्ध असते. किंवा आपण असे मानत असू, की राजकीय हिंसेचा आणि लोकशाही पद्धतीचा जवळचा संबंध आहे. काही विशेषाधिकार भोगीत असलेल्या आणि त्यांच्यावर दावा सांगणाऱ्या मूठभर मंडळींची सत्ता मोडून काढून लोकशाही राजवट अस्तित्वात येते, ही सत्ता मोडून काढण्यासाठी हिंसेचा अनिवार्यपणे वापर करण्यात आलेला असतो आणि लोकशाही राजवट टिकून रहायची, तर त्या त्या वेळच्या सत्ताधाऱ्यांवर लोकमताचा दबाव सतत राखावा लागतो, सत्ताधारी जर सत्ता स्वतःकडे केंद्रित करू लागले, तर लोकांना उठाव करण्याची तयारी सतत बाळगावी लागते आणि हा उठाव अपरिहार्यपणे हिंसक असतो, इ. तेव्हा हिंसात्मक कृत्ये योग्य असतात की अयोग्य असतात, ह्याविषयी निर्णय करताना अशा काही तत्त्वांचा आधार आपण घेतो. पण ह्या तत्त्वांचा विचार करण्यापूर्वी विषमता आणि हिंसा ह्याविषयीच्या आपल्या ज्या स्वाभाविक, अशिक्षित भावना असतात त्यांचा विचार करणे योग्य ठरेल. कारण ह्या यातना विषमतेशी किंवा हिंसक कृत्यांशी साक्षात निगडित असतात. उलट ज्या तत्त्वांचा आधार घेऊन विषमतेविषयी किंवा हिंसक कृत्यांविषयी आपण निर्णय घेतो, ती विषमतेच्या किंवा हिंसेच्या आपल्या प्रत्यक्ष अनुभवाशी साक्षात् निगडित नसतात; त्यांचा ह्या वस्तुस्थितीशी असलेला संबंध काहीसा दूरचा असतो.

आता कुणी असे म्हणणे शक्य आहे, की विषमतेच्या अनुभवामुळे आपल्या मनात जागृत होणाऱ्या भावना ही वेगळी गोष्ट असते आणि विषमतेविषयी काय करणे योग्य आहे ह्याचा निर्णय घेणे ही वेगळी गोष्ट असते. असा निर्णय नैतिक तत्त्वाला अनुसरून

घ्यावा लागतो किंवा घेतला पाहिजे. तेव्हा ह्या संदर्भात संबंधित नैतिक तत्त्वे कोणती हे विचाराने ठरवावे लागेल. उलट आपल्या नैसर्गिक 'कच्च्या' भावनांची परिणती जर काही वर्तनात, कृत्यांत घडली, तर एका परिस्थितीला आपण स्वाभाविकपणे दिलेला प्रतिसाद एवढेच त्याचे स्वरूप राहील; पण ह्या वर्तनाला काही नैतिक प्रामाण्य असणार नाही. पण हे म्हणणे पूर्णपणे योग्य नाही. एका बाजूला आपल्या भावना आणि दुसऱ्या बाजूला आपण स्वीकारतो ती नैतिक तत्त्वे, किंवा कृत्ये योग्य का ठरतात ह्यांची आपण देत असलेली नैतिक कारणे ह्यांच्यामधील संबंध अधिक गुंतागुंतीचे असतात. परिस्थितीच्या किंवा कृत्यांच्या दर्शनाने आपल्या मनांत जागृत होणाऱ्या काही भावनांचे रूपांतर आपण नैतिक तत्त्वांत किंवा कृत्यांच्या नैतिकतेला आधारभूत असलेल्या कारणांत (रीझन्स) करू शकतो. उदा. एखाद्याने केलेल्या कृत्याचा आपल्याला राग आला आणि त्याचा प्रतिकार करावा अशी प्रेरणा आपल्या मनात जागृत झाली, तर ह्या भावनिक अनुभवाचे रूपांतर काही वेळा ते कृत्य अयोग्य होते व त्याबद्दल कर्त्याला शासन करणे किंवा त्याचा प्रतिकार करणे योग्य ठरते, ह्या नैतिक निर्णयात होऊ शकेल. आपल्या नैसर्गिक भावना आणि कृत्यांना नैतिक, अनैतिक ठरवायला आधारभूत होणारी कारणे ह्यांमधील संबंधांचा नैतिक तत्त्वज्ञानात अधिक कसोशीने विचार झाला पाहिजे.

ह्या दृष्टीने, विषमतेच्या दर्शनामुळे शाणि हिंसक कृत्याच्या दर्शनामुळे आपल्या मनात ज्या नैसर्गिक, अशिक्षित भावना जागृत होतात त्यांच्याकडे पाहिले, तर त्यांच्यामध्ये एक महत्त्वाचा भेद आढळून येतो. नैसर्गिक किंवा अशिक्षित भावना असा त्यांचा उल्लेख करण्यात एक गोष्ट अभिप्रेत असते ती अशी, की अनेकदा माणसांनी काही सामाजिक, ऐतिहासिक, इ. सिद्धांत स्वीकारलेले असतात आणि त्यांना अनुसरून ते सामाजिक वस्तुस्थितीचा अर्थ लावतात. आणि मग वस्तुस्थितीच्या दर्शनाने त्यांच्या मनात ज्या भावना उत्तेजित होतात त्या ह्या सिद्धांतांशी अनुरूप असतात, त्यांच्या विचारांप्रमाणेच त्यांच्या भावनांनाही ह्या सिद्धांतांनी एक विशिष्ट वळण दिलेले असते. उदा. एखाद्या माणसाने मार्क्सवाद स्वीकारलेला असेल आणि त्यामुळे बहुसंख्य लोकांच्या दारिद्र्याचा तो एक विशिष्ट अर्थ लावीत असेल. भांडवलदारवर्ग किंवा जमीनदार वर्ग करीत असलेल्या पिळवणुकीमुळे बहुसंख्य लोक दरिद्री राहतात अशी त्यांची खात्री असेल आणि म्हणून त्यांच्या दारिद्र्याच्या दर्शनाने त्याच्या मनात भांडवलदारांविषयी संताप निर्माण होईल. ज्याला मार्क्सवाद, पिळवणूक, काही माहीत नसेल त्याचा भावनिक प्रतिसाद वेगळा राहील. बहुसंख्य माणसांनी असा कोणतातरी सामाजिक सिद्धांत स्वीकारलेला नसतो. अशांच्या विषमतेविषयीच्या आणि हिंसक कृत्यांविषयीच्या अशिक्षित भावना कशा असतात असा हा प्रश्न आहे.

सर्वसाधारणपणे असे म्हणता येईल, की विषमता आणि दारिद्र्य यांच्या दर्शनाने आपल्याला वाईट वाटेल, खेद होईल, सहानुभूती वाटेल, आपण विषण्ण होऊ, हतबुद्ध होऊ. म्हणजे ह्या भावना शांत असतात, उत्तेजक नसतात, आपल्याला तात्काळ काही करायला प्रेरणा देणाऱ्या अशा त्या नसतात.

उलट हिंसक कृत्याच्या दर्शनाने आपल्याला संताप येईल, क्रोध येईल, तिटकारा, घृणा वाटेल, हे भयानक आहे असे आपल्याला वाटेल. म्हणजे ह्या स्तब्ध भावना नसतात, आपल्याला काही करायला प्रवृत्त करणाऱ्या अशा त्या भावना असतात. अशा तऱ्हेची कृत्ये करणाऱ्यांना प्रतिबंध करावा, अशी कृत्ये परत घडणार नाहीत अशी तजवीज करावी, अशी प्रवृत्ती ह्या भावनांमुळे आपल्यात निर्माण होईल.

विषमतेच्या दर्शनाने निर्माण होणाऱ्या भावना आणि हिंसक कृत्याच्या दर्शनाने निर्माण होणाऱ्या भावना ह्यांच्या स्वरूपात हा जो भेद आहे,– एक कृतिप्रेरक नसतात व दुसऱ्या कृतिप्रेरक असतात– त्याचे मूळ शोधून काढले पाहिजे. नाहीतर ह्या भावनांवर नकळत आपण नैतिक तत्त्वे उभारू. उदा. इतरांच्या दुःस्थितीबद्दल योग्य तेवढी सहानुभूती बाळगणे योग्य असते, हिंसक कृत्यांना प्रतिबंध करणे नेहमीच योग्य असते अशी ही नैतिक तत्त्वे असू शकतील. म्हणजे विषमतेपासून किंवा दारिद्र्यापासून काही विशिष्ट दिशेने कृती करीत राहण्याचे

अनुक्रमणिका

नैतिक आवाहन आपल्याला मिळणार नाही. आपल्याला विषाद वाटेल, पण ह्या बाबतीत आपले काही कर्तव्य आहे अशी आपली धारणा होणार नाही. उलट हिंसक कृत्यांविषयीची आपली नैतिक वृत्ती वेगळी राहील.

ह्या दोन भावनांमध्ये असा भेद असायचे एक कारण हे असेल, की हिंसक कृत्यांचे कर्ते ठळकपणे आपल्या नजरेसमोर असतात, ते कोण कोण आहेत, त्यांनी काय काय केले हे अगदी स्पष्ट असते, पण विषमतेचे कर्ते असे ठळकपणे नजरेसमोर नसतात. विषमतेचे कर्ते म्हणजे ज्यांच्यामुळे विषमता नांदत राहते ते लोक. हे लोक कोण आहेत हे आपण शोधून काढायचे ठरविले तर ते फारसे कठीण जाणार नाही. हे लोक म्हणजे ज्यांनी विषम व्यवस्था मान्य केलेली असते, ती चालू राहणे ज्यांना लाभदायक असते, पण ती बदलण्याची कुवत ज्यांच्यात असते असे लोक.

आता ह्या लोकांविषयीची एक महत्त्वाची गोष्ट अशी, की आपल्यातील जवळजवळ सर्व व्यक्ती ह्या लोकांत मोडतात. आपल्यातील म्हणजे उदा. हा लेख वाचतील ते जवळजवळ सर्व. दुसरी गोष्ट अशी, की हा एक मोठाच विस्तृत वर्ग आहे आणि अमूक अमूक निश्चित व्यक्तींमुळे विषमता नांदते अशी त्यांची नेमकी ओळख पटविता येत नाही. तिसरी गोष्ट अशी, की हिंसक कृत्याच्या कर्त्याचा आणि हिंसक कृत्याचा जसा साक्षात् संबंध दिसून येतो— ह्या माणसाने बत्ती शिलगावली आणि झालेल्या स्फोटात पाच माणसे ठार आणि पन्नास जखमी झाली— तसा विषमतेच्या कर्त्याचा आणि विषमतेचा साक्षात् संबंध दिसून येत नाही. अमूक अमूक माणसांनी अमूक अमूक कृत्ये केल्यामुळे दलितांची सामाजिक अप्रतिष्ठा होण्याचे चालूच राहिले आहे आणि शेतमजुरांच्या दुःस्थितीत सुधारणा होत नाही असा सरळ कार्यकारणसंबंध जोडता येत नाही.

सारांश, हिंसक कृत्यांच्या कर्त्यांचा आणि त्यांच्या कृत्यांमुळे घडून येणाऱ्या हानीचा सरळ संबंध जोडता येतो, ह्या हानीबद्दल त्यांना सरळ जबाबदार धरता येते आणि तिच्या दर्शनाने ज्या तीव्र भावना आपल्या मनात उत्तेजित झालेल्या असतात त्या ह्या कर्त्यांवर केन्द्रित होतात. विषमतेच्या कर्त्यांची अशी ओळख पटविता येत नाही, विषम परिस्थितीबद्दल कित्येक व्यक्तींना सरळ जबाबदार धरता येत नाही आणि म्हणून कित्येक व्यक्तींवर ह्या भावना केंद्रित होत नाहीत. पण एक महत्त्वाचा मुद्दा असा, की विषमता आणि हिंसा ह्यांच्याविषयीच्या आपल्या भावनांत त्यांच्या कर्त्यांना काही प्रमाणात स्थान असणे योग्य असले, तरी प्रामुख्याने ह्या भावना त्यांचे बळी ठरलेल्या व्यक्तीविषयींच्या भावना असल्या पाहिजेत. म्हणजे जे दुःख, पीडा, विपन्नावस्था टाळता येण्यासारख्या आहेत, पण त्या ज्यांना भोगाव्या लागतात त्यांच्याविषयींच्या ह्या भावना असल्या पाहिजेत. आणि ह्या दृष्टीने पाहिले, तर विषम व्यवस्थेविषयीच्या आपल्या भावना प्रासंगिक राजकीय हिंसेविषयीच्या भावनांपेक्षा कितीतरी अधिक तीव्र असणे योग्य ठरते.

आता ह्यावर एक मुद्दा बहुधा असा उपस्थित करण्यात येईल, की हिंसेविषयीच्या आपल्या भावना हिंसेच्या कर्त्यांशी निगडित होत असल्यामुळे अधिक तीव्र असतात हे जरी खरे असले, तरी ही तीव्रता समर्थनीय आहे. म्हणजे असे, की ह्या भावना प्रामुख्याने कर्त्यांविषयी संतापाच्या भावना असतात, हिंसेचे बळी ठरलेल्याविषयी अनुकंपेच्या भावना कमी प्रमाणात असतात असे असले, तरी भावी हिंसक कृत्यांचे बळी ठरू शकतील अशा व्यक्तींच्याच दृष्टीने ही गोष्ट इष्ट अशी आहे. कारण कर्त्यांवर केंद्रित झालेल्या ह्या भावनांच्या तीव्रतेमुळे आपण त्यांचे शासन करायला प्रवृत्त होतो, त्यांच्याविरुद्ध कडक उपाय योजितो आणि ह्यामुळे भावी हिंसक कृत्यांना आळा बसायला मदत होते. ह्या युक्तिवादात कितपत तथ्य आहे ह्याविषयी फार खोलात न शिरता असे म्हणता येईल, की हिंसक कृत्यांच्या कर्त्यांविषयीच्या आपल्या तीव्र भावना केवळ ह्या कृत्यांमुळे घडून येणाऱ्या मानवी हानीशी संबंधित नसतात; ह्या हानीला ही काही माणसे जबाबदार आहेत, ती अपराधी आहेत हा दोषारोप ह्या भावनांचा महत्त्वाचा घटक असतो. विमानाच्या अपघातामुळे होणाऱ्या हानीने आपले हृदय हेलावते, असे अपघात परत घडून येऊ नयेत ह्यासाठी आवश्यक ती तजवीज करायला आपण प्रवृत्त होतो. हिंसक कृत्याविषयीची

आपली भावनिक प्रतिक्रिया केवळ ह्या स्वरूपाची नसते हे उघड आहे. ही माणसे ह्या हानीला जबाबदार आहेत आणि त्यांचे शासन करण्यात आले पाहिजे, त्यांना शिक्षा देण्यात आली पाहिजे अशा दृष्टीने आपण हिंसेकडे पाहतो, हे खरे असेल, तर विषमतेच्या कर्त्यांविषयीच्या आपल्या दोषारोपाच्या भावना तितक्याच उत्कट असणे योग्य ठरेल, हेही मान्य करावे लागेल.

विषमता आणि हिंसा ह्याविषयीच्या आपल्या भावनांमधील भेदाचे दुसरे कारण असे असू शकेल, की विषमता आपल्या सवयीची असते, अंगवळणी पडलेली गोष्ट असते. हिंसक कृत्ये अशी सवयीची नसतात. हिंसक कृत्याच्या दर्शनाने आपल्याला धक्का बसतो; विषमता कितीही दुःखदायक वाटली, तरी तिच्यामुळे आपल्याला एखादा अचानक धक्का मिळाल्याचा अनुभव येत नाही. तिसरी गोष्ट अशी की विषमता दृढमूल असते, तिची पाळेमुळे इतिहासात, व्यक्ति व्यक्तींमधील संबंधाच्या जाळ्यात रुजलेली असतात. हिंसक कृत्ये, ह्या सुट्या, अधून मधून घडणाऱ्या घटना असतात, त्या प्रत्यक्षात घडलेल्या असल्या तरी त्या न घडणेही शक्य असते, असे आपल्याला वाटते. आणि म्हणून त्यांना प्रतिबंध करायला आपण उद्युक्त होतो. विषमता अशी जिचे चटकन निर्मूलन करता येईल अशी गोष्ट नसते, ती सहन करायची आपली तयारी असते. आता विषमता संपुष्टात आणणे किंवा सौम्य करणे, ही सहजी साधेल अशी गोष्ट नाही हे अगदी खरे आहे. पण एखादी गोष्ट दृढमूल आहे, ती सामाजिक परिस्थितीत बळकटपणे रुजलेली आहे असे म्हणणे वेगळे आणि मानवी परिस्थितीचा तो अनिवार्य, अपरिहार्य असा भाग आहे असे मानणे वेगळे. पण विषम सामाजिक व्यवस्थेमध्ये सुधारणा करता येते, दृढमूल अशी सामाजिक विषमताही नष्ट करता येते, हे इतिहासाच्या साक्षीनेच दाखवून देता येते. गुलामगिरीच्या पद्धतीचे उदाहरण घ्या. विषमता अनिवार्य आहे असे जे मानतात आणि म्हणून तिला विश्वाच्या रचनेतच काही अधिष्ठान शोधतात– उदा. पूर्वकर्मांना अनुसरून आपले सारे सुखदुःखद अनुभव निश्चित होतात असे मानणारे लोक– त्यांच्याविरुद्ध घेण्यात येणारा प्रमुख आक्षेप असा, की ज्या केवळ मानवी रचना आहेत आणि म्हणून माणसे आपल्या निर्णयांनी ज्या बदलू शकतात त्यांत सुधारणा करण्याऐवजी चिरंतन विश्वरचनेचे अपरिवर्तनीय घटक असे त्यांना मानून, आहे त्या अमानुष परिस्थितीचा सहनशीलतेने स्वीकार करायची लोकांना ते शिकवण देतात. कर्मसिद्धांत असत्य आहे असे कुणी सिद्ध केलेले नाही, पण तो सत्य आहे की असत्य आहे हे ठरवायच्या भानगडीत पडायचे कारणही नाही. अस्पृश्यता पाळणार नाही असा निर्णय जर सर्व संबंधितांनी केला, तर अस्पृश्यता नष्ट होईल आणि अस्पृश्यता नष्ट झाली तर अस्पृश्यतेच्या चालीमुळे ज्या अडचणी आणि अप्रतिष्ठा अनेकांच्या वाट्याला येते ती, कर्मसिद्धांत सत्य असला तरी, येणार नाही. तेव्हा विषमता जरी दृढमूल असली, तरी ती जर अनिवार्य नसेल, ती संपुष्टात आणणे जर प्रयत्नसाध्य असेल, तर केवळ ती दृढमूल आहे ह्या जाणिवेने तिच्याविषयीच्या आपल्या भावनांना मिळणारे विशिष्ट वळण– उदा. ती मान्य करण्याची तयारी–गैर मानले पाहिजे. कारण ह्या संदर्भातील मध्यवर्ती गोष्ट म्हणजे विषमतेचे बळी असणाऱ्या व्यक्तींची असह्य परिस्थिती.

ह्याच्याशी संबंधित असा आणखी एक मुद्दा हा की विषमता सामाजिक व्यवस्थेचा भाग म्हणून आपल्यासमोर येते, तर हिंसक कृत्य एक स्वैर बेशिस्तपणे करण्यात आलेले कृत्य अशा स्वरूपात आपल्याला दिसते. आणि आपण सर्वसाधारणपणे व्यवस्थेच्या बाजूचे असतो व स्वैराचाराच्या विरुद्ध असतो. पण माणसांची दुःस्थिती, विपन्नावस्था इत्यादी गोष्टींकडे प्रारंभापासूनच सामाजिक व्यवस्थेचा भाग म्हणून पाहणे गैर आहे. काही माणसांची दुःस्थिती हा कोणत्याही शक्य असलेल्या सामाजिक व्यवस्थेचा अटळ भाग असतो ह्या निष्कर्षाला आपण अखेरीस, विचारान्ती येऊन पोचूही. पण सुरवातीला माणसांच्या सामाजिक दुःस्थितीला जो भावात्मक प्रतिसाद आपण द्यायचा तो ह्या दुःस्थितीला सरळ दिलेला प्रतिसाद ह्या स्वरूपाचा असला पाहिजे, सामाजिक व्यवस्थेचा भाग म्हणून जर तिला आपण प्रतिसाद दिला तर तो विकृत ठरेल.

शिवाय असेही असणे शक्य आहे, की विषमतेचे बळी असलेल्यांविषयी आपल्याला जेवढी सहानुभूती वाटते तिच्यापेक्षा हिंसेचे बळी ठरलेल्यांविषयी अधिक सहानुभूती वाटते. कारण हिंसक आक्रमण एकाएकी होते, कुणावर त्याचा एकाएकी घाला पडतो आणि त्याची होणारी दुर्दशा नाट्यपूर्ण रीतीने होते. विषमतेचे जे बळी असतात त्यांना त्यांच्या दुःस्थितीचा सराव झालेला असतो, आपल्यालाही तिचा सराव असतो आणि म्हणून ती भडकपणे उठून दिसत नाही. समजा आपल्याला स्वतःसाठी किंवा आपल्या मायेच्या एखाद्या व्यक्तीसाठी अशी निवड करावी लागली; तुम्ही हिंसक आक्रमणाचे बळी होणे पसंत कराल की विषमतेचे बळी होणे पसंत कराल? बहुधा आपण हिंसक कृत्याचे बळी ठरणे ही अधिक दुर्दैवी आपत्ती मानू. पण ह्या बाबतीतही आपली तात्काळ होणारी प्रतिक्रिया आणि आपण विचारपूर्वक करू तो निर्णय एकमेकांशी जुळतीलच असे मानणे धाडसाचे ठरेल. आणखी एक गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. अनेकदा राजकीय हिंसेचे बळी ठरणाऱ्या व्यक्तींचा त्या हिंसक कृत्याने जी राजकीय उद्दिष्टे साधायची असतात त्यांच्याशी काहीही साक्षात् संबंध असत नाही. उदा. सरकारला हैराण करून आपले धोरण बदलायला लावण्यासाठी मी आगगाड्या पाडतो आणि अनेक माणसे मरतात आणि जायबंदी होतात. ह्या माणसांचा सरकाराच्या धोरणाशी काही संबंध नसणे शक्य असते. म्हणजे हिंसेचे बळी काळजीपूर्वक निवडलेले नसतात आणि म्हणून हिंसात्मक कृत्यांचे स्वरुप भयानक भासते. मानवी जीवनाविषयी, माणसांच्या सुखदुःखांविषयी पाषाणवृत्ती असल्याशिवाय अशी कृत्ये कुणी करणार नाही असे आपल्याला वाटते. पण ह्याबरोबरच हेही लक्षात घेतले पाहिजे, की विषमतेचे बळीही काळजीपूर्वक निवडलेले नसतात.

पण विषमतेविषयीच्या आपल्या भावना इतक्या शांत आणि हिंसेविषयीच्या आपल्या भावना इतक्या उग्र असायचे अतिशय महत्त्वाचे कारण असे असणे शक्य आहे, की ही विषम व्यवस्था आपल्याला लाभदायक असते आणि शिवाय सुदैवाने तिचे बळी असणाऱ्या व्यक्तींचा आणि आपला साक्षात् संबंध येत नाही. आगगाडीत एखाद्या अपंग म्हाताऱ्याला माझ्यासमोर उठवून मला जागा करून दिली तर मी ती कदाचित् स्वीकारणार नाही. पहिल्या वर्गात दिवे मालवून मी बर्थवर आरामशीर झोपतो तेव्हा दुसऱ्या वर्गात गर्दीत उभा असलेला अपंग म्हातारा माझ्या दृष्टिआड असतो.

ह्या विवेचनाचा सारांश असा, की वेगवेगळ्या प्रकारच्या परिस्थितीला किंवा कृत्यांना आपण जो स्वाभाविकपणे भावनिक प्रतिसाद देतो तो मानवी नीतीच्या संदर्भात केवळ भावनिक प्रतिसाद रहात नाही. ह्या प्रतिसादांच्या आधारावर कोणती कृत्ये योग्य आहेत, कोणती अयोग्य आहेत, प्रथमदर्शनी कर्तव्ये म्हणून आपल्यापुढे उभे रहाणाऱ्या कृत्यांतील कोणत्या कृत्याचा आपल्यावरील दावा सर्वांत अधिक वरचढ असतो हे ठरविण्याचे निकष आपण निष्पन्न करून घेतो. आता हिंसक कृत्यांना आपण स्वाभाविकपणे जो भावनिक प्रतिसाद देतो तो उग्र, कृतिप्रेरक अशा स्वरुपाचा असतो, उलट विषमतेविषयीच्या आपल्या भावना तुलनेने शांत असतात. ह्यामुळे हिंसक कृत्यांना प्रतिबंध करणे हे आपले तातडीचे आणि अधिक प्रमाण असे कर्तव्य आहे. विषमता अनिष्ट खरी आणि ती दूर करण्याचे प्रयत्न करणे योग्य आहे हेही खरे; पण विषमतेविषयी आपले तातडीचे, ज्याच्यातून सुटका नाही असे बंधनकारक कर्तव्य नसते असा ग्रह होण्याचा संभव आहे. ह्यासाठी विषमतेविषयीच्या आणि हिंसक कृत्यांविषयीच्या आपल्या भावनिक प्रतिसादांचे विश्लेषण करून त्यांच्यात आढळून येणारा भेद गैरलागू घटकांवर आधारलेला असतो. ह्या दोन्ही प्रतिसादांचा विषय एकच असतो, एकाच प्रकारच्या परिस्थितीला दिलेले ते प्रतिसाद असतात आणि ती परिस्थिती म्हणजे माणसाची दुःस्थिती, दुःख इ. आणि म्हणून विषमतेने व हिंसेने जर सारख्याच प्रमाणात दुःस्थिती निर्माण केली असेल, तर तिला आपण देऊ तो प्रतिसाद सारखाच तीव्र असला पाहिजे, जर विषमतेला आपण देतो तो प्रतिसाद जर अधिक सौम्य असेल, तर काही गैरलागू कारणांमुळे तो अधिक सौम्य असतो आणि म्हणून ह्या भावनांमधील भेदाच्या आधारावर हिंसेविषयीचे आपले कर्तव्य विषमतेविषयीच्या

आपल्या कर्तव्यापेक्षा अधिक सबळ असते असे मानणे गैर आहे, हे दाखवून देणे ह्या विवेचनाचे उद्दिष्ट होते.

पण एक मुद्दा असा मांडण्यात येईल, की कित्येक प्रकारची कृत्ये स्वभावतःच गैर, अनैतिक आणि म्हणून वर्ज्य असतात असे आपण मानतो, आणि माणसांची हत्या करणे हे कृत्य ह्या प्रकारच्या कृत्यांत मोडते. ह्या प्रकारची कृत्ये निषिद्ध आहेत हे ती केली तर कोणते परिणाम घडून येतील व न केली तर कोणते परिणाम घडून येतील किंवा कोणती अवस्था असेल ह्याचे तौलनिक मूल्यमापन करून आपण ठरवीत नाही. ह्या कृत्यांचे स्वतःचे स्वरूपच असे असते, की त्याच्यामुळेच ती निषिद्ध ठरतात. हिंसेकडे बरेचजण अशा प्रकारे बघतात ह्यात शंका नाही. सर्वसाधारणपणे पाहता हा दृष्टिकोण धार्मिक परंपरेवर आधारलेला असतो. पण असा धार्मिक दृष्टिकोन न स्वीकारणाऱ्यांना हिंसा, माणसांना ठार मारणे सर्व प्रसंगी, कोणत्याही परिस्थितीत निषिद्ध असते ह्या तत्त्वाचे समर्थन कसे करता येईल, हा एक प्रश्न आहे. व्यवहारात हे तत्त्व कुणी पाळणार नाही ही गोष्ट बाजूला सारू आणि ह्या बाबतीत आपली तात्त्विक भूमिका काय असणे शक्य आहे ह्याचा विचार करण्यासाठी पुढील प्रश्न उपस्थित करू : समजा एका माणसाची हत्त्या केल्याने फार मोठी हानी टळेल हे निश्चित असेल, उदा. एका सबंध प्रदेशाची वाताहत होणे, शेकडो माणसे मृत्युमुखी पडणे टळेल हे निश्चित असेल तर त्या माणसाची हत्त्या करणे योग्य, आपले कर्तव्य ठरणार नाही का ? अधिक कठीण प्रश्न असे : एका माणसाची हत्त्या केल्याने अशा स्वरूपाची हानी टळेल हे जवळजवळ निश्चित असेल तर, ( अतिशय संभवनीय असेल तर, बरेचसे संभवनीय असेल तर ) त्याची हत्त्या करणे योग्य ठरणार नाही का ?

तरीही, हिंसा करणे, हत्त्या करणे ह्या प्रकारच्या कृत्यांविषयी आपल्या मनात स्वाभाविकपणे घृणा असते ह्यात शंका नाही. आणि ही घृणा योग्य आहे असेही आपण मानतो. ह्यावर विचाराची अशी एक दिशा आधारता येईल, मी हिंसक कृत्ये केल्याने विषमता बरीचशी सौम्य करता येईल हे मला निश्चितपणे माहीत आहे असे समजू या. आणखी असे समजू या की प्रचलित विषमव्यवस्थेचा मी व्यक्तिशः कमीतकमी फायदा घेतो. उदा. मी अगदी साधेपणे जगतो, ह्या व्यवस्थेतील कोणतेही अधिकारपद मी स्वीकारलेले नाही, इ. ह्या परिस्थितीत जर विषमता कमी करण्यासाठी जाणून-बुजून मी हिंसक कृत्ये केली, तर त्या कृत्यांची माझ्यावर सरळ जबाबदारी आहे. मी हिंसक कृत्ये केली, तर विषमता सौम्य होईल हे माहीत असताना जर हिंसक कृत्ये केली नाहीत, तर विषमता चालू राखण्याची काही जबाबदारी माझी असेल ही गोष्ट खरी आहे. पण ही जबाबदारी अप्रत्यक्ष असेल. विषमता चालू ठेवणारी कृत्ये करणाऱ्या आणि तिचा लाभ उठविणाऱ्या माणसांची ती जशी साक्षात् जबाबदारी असते, तशी ती माझी असणार नाही. पण हिंसक कृत्यांची माझी जबाबदारी मात्र साक्षात् असेल. आणि म्हणून मी हिंसक कृत्य करणार नाही. विषमता शक्य तितक्या लवकर संपुष्टात यावी ह्याविषयी मनापासून आस्था असणारे, पण हिंसक कृत्यांचा तिटकारा करणारे लोक ह्या स्वरूपाचा युक्तिवाद करीत असतील. पण ह्या युक्तिवादामागील तत्त्व अस्पष्ट आहे. अनिष्ट गोष्टी शक्य तितक्या लवकर नाहीशा कशा कराव्यात ह्याच्या विचाराऐवजी त्या असण्याच्या किंवा चालू राहण्याच्या बाबतीतील स्वतःची जबाबदारी कमीत-कमी आहे असे कसे ठरेल, ह्याविषयीचा हा विचार आहे. मी एका माणसाला ठार केले नाही तर तो शेकडो माणसांना ठार करणार आहे हे मला निश्चितपणे माहीत असेल, तर ह्या युक्तिवादाला अनुसरून मी कसे वागणे योग्य ठरेल?

अनेकदा हिंसा आणि विवेक ह्यांच्यामध्येच विरोध कल्पिण्यात येतो. उदा. कार्ल पॉपर ह्यांनी ह्या स्वरूपाची विधाने केली आहेत, 'विवेक ... ही सत्तेची साधने आणि हिंसा ह्यांच्या नेमकी विरोधी असलेली गोष्ट आहे.' 'मी विवेकवादी ( रॅशनॅलिस्ट ) आहे ह्याचे कारण असे, की हिंसेला विवेकनिष्ठ वृत्ती हा एकच पर्याय आहे.' जेव्हा असतो तेव्हा तो निकालात काढायचा एक मार्ग म्हणजे हिंसा आणि दुसरा म्हणजे विवेकाचा अवलंब करून तो शमविणे. विवेकाचा मार्ग म्हणजे









दोन्ही पक्षांनी परस्परांशी संवाद करण्याचा, आपापले म्हणणे, युक्तिवाद दुसऱ्यापुढे मांडण्याचा, दुसऱ्याच्या म्हणण्यातील तथ्य मान्य करायला, स्वतःच्या चुका मान्य करायला तयार असण्याचा, वाद मिटला नाही तर प्रश्न त्रयस्थाकडे सोपविण्याचा मार्ग. आता प्रश्न असा आहे, की कोणतीही व्यावहारिक समस्या सोडविण्याचा हा विवेकनिष्ठ मार्ग हाच योग्य मार्ग असतो आणि हिंसेचा मार्ग नेहमीच अयोग्य असतो हे आपण कशाच्या आधारावर ठरविणार ? कारण विवेकशील वर्तनाचे वर जे वर्णन केले आहे त्याशिवाय विवेकी कृत्याचा दुसरा एक निकष आहे आणि तो पॉपर ह्यांनीच मांडला आहे. 'आपले उद्दिष्ट साधण्यासाठी उपलब्ध साधनांचा सर्वांत चांगला उपयोग करणे म्हणजे विवेकाला अनुसरून वागणे.' विवेकशील वर्तनाचे पॉपर ह्यांनी केलेले जे वर्णन वर दिले आहे त्याला अनुरूप असलेले वर्तन प्रत्येक प्रसंगी आपले उद्दिष्ट साधताना उपलब्ध साधनांचा सर्वांत चांगला उपयोग करणारे वर्तन असते, असे कशाच्या आधारावर म्हणता येईल ?

आपण जर असे दाखवून देऊ शकलो, की सामान्यपणे पाहता राजकीय हिंसेमुळे हानी निश्चितपणे घडून येते; पण ज्या उद्दिष्टांसाठी म्हणून हिंसा करण्यात येते ती तिच्यामुळे साधली जातील की नाही हे नेहमीच अनिश्चित राहते तर हिंसा ह्या निकषाप्रमाणे अविवेकी ठरेल. हिंसेच्या बाबतीत वस्तुस्थिती नेहमीच अशी असते का हे ठरविण्यापूर्वी एक दोन मुद्दे बाजूला सारले पाहिजेत. एक असा, की पूर्णपणे आदर्श अशा प्रकारची सामाजिक व्यवस्था–युटोपिया–निर्माण करणे हेच राजकीय हिंसेचे एकमेव उद्दिष्ट असते असे अनेकदा मानण्यात येते. अशी आदर्श व्यवस्था निर्माण करणे हे व्यवहार्य उद्दिष्ट होऊच शकत नाही आणि म्हणून हिंसा अविवेकी ठरते. पण राजकीय हिंसेचा अवलंब नेहमीच आदर्श समाजव्यवस्था निर्माण करण्यासाठी करण्यात येतो असे नाही. मर्यादित उद्दिष्टांसाठीसुद्धा राजकीय हिंसेचा वापर करण्यात येतो. दुसरी गोष्ट अशी की हिंसाचार करणाऱ्या व्यक्ती स्वतःला फसवीत असतात, ज्या उद्दिष्टांसाठी म्हणून त्या हिंसा करतात, ती त्यांची खरीखुरी उद्दिष्टेच नसतात, उदा. जुलमी जमीनदाराची हत्त्या करणारा माणूस स्वतःच्या वडिलांवर असलेला अजाण ( अन्कॉन्शस ) राग व्यक्त करीत असतो, असे मानण्यात येते; पण असे मानणे योग्य नाही.

आपले उद्दिष्ट साधण्यासाठी उपलब्ध साधनांचा सर्वांत उत्तम वापर करणे, ह्या अर्थाने हिंसक कृत्ये विवेकी ठरू शकतात, की हे ठरविताना तपशिलात जाऊन विचार करावा लागेल. हिंसक कृत्यांतील हिंसेचे प्रमाण,– उदा. केवळ मालमत्तेची हानी होईल की माणसे मरतील, किती मरतील, किती जायबंदी होतील, व. – मालमत्तेची व मानवी जीविताची कमीतकमी हानी होईल अशी दक्षता घेतली होती की नाही, हिंसक कृत्याचे उद्दिष्ट त्याच्यामुळे साधले जाण्याची निश्चिती किंवा संभवनीयता किती होती, इ. गोष्टींचा विचार करून अशा कृत्यांच्या विवेकशीलतेविषयीचा निर्णय घ्यावा लागेल. सामाजिक जीवनाच्या एका विशिष्ट भागात आज आहे त्याहून अमूक इतक्या प्रमाणात अधिक समान व्यवस्था असण्याला जे मूल्य असेल त्याची, हिंसेने ते घडवून आणण्यात मानवी जीवनाची जी हानी पत्करावी लागेल त्याच्याशी तुलना करावी लागेल. ह्याप्रकारे विचार करून जर आपण पुढील प्रश्न उपस्थित केला, तर त्याचे उत्तर देणे सोपे नाही : समाजातील सर्वांत दुःस्थितीत असलेल्या वर्गाचे, म्हणजे समजा ५ कोटी लोकांचे सरासरी आयुर्मान इतरांबरोबर आणण्यासाठी, इतरासारखे जीवन त्यांना जगता यावे यासाठी केलेल्या कृत्यामुळे, (मानवी जीविताची शक्य तितकी कमी हानी होईल असा आटोकाट प्रयत्न करून सुद्धा ) जर हजारो माणसे ठार झाली आणि जायबंदी झाली, तर असे कृत्य विवेकशील ठरेल का ? ह्या प्रश्नाचे उत्तर देणे सोपे नाही.

हिंसक कृत्यांच्या विवेकशीलतेचा विचार करताना अशा कृत्यांकडून त्यांची उद्दिष्टे साधली जाण्याची निश्चिती किंवा संभवनीयता कितपत असते ह्याचा विचार केला पाहिजे हे आपण पाहिलेच आहे. पण त्याबरोबरच अहिंसक मार्गाने ही उद्दिष्टे साधली जाण्याची निश्चिती किंवा संभवनीयता कितपत आहे हेही पहावे लागेल. याशिवाय ह्या

दोन भिन्न मार्गांनी ही उद्दिष्टे साधायला किती वेळ लागेल ह्याचाही तौलनिक विचार करावा लागेल. हिंसेमुळे काही माणसे जीवितालाच मुकतील. ह्याच्या उलट आहे ती परिस्थिती तशीच चालू राहू दिली, तर काही माणसांचे जे अल्प आणि यातनामय जीवन असते ते तसेच चालू राहील.

सारांश नैतिक कर्ते म्हणून आपल्याला दोन प्रकारच्या वस्तुस्थितीविषयी किंवा घटनांविषयी विचार केला पाहिजे. विषमतेची परिस्थिती आणि हिंसक कृत्यांचे परिणाम. ह्या दोहोंचाही विचार विवेकाधिष्ठित तत्त्वांना धरून केला पाहिजे.

---

## साभार पोच

### पुस्तके :

**शोधशिल्प**

डॉ. रा. चिं. ढेरे

प्रकाशक– विश्वकर्मा साहित्यालय, पुणे– ४११०३०. पृ. २१६, किंमत २० रु.

**मराठवाडा संशोधन मंडळ वार्षिक, १९७६**

संपा. सु. ग. जोशी

प्रकाशक– राधाकृष्णरामचंद्र प्रकाशन. शिरूर ताजबंद–४१३५१४ (जि. उस्मानाबाद). पृ. ३३४, किंमत २० रु.

**साहित्यातील प्रीती आणि भक्ती -**

प्रा. मुरलीधर जावडेकर

प्रकाशक– नूतन प्रकाशन, पुणे– ४११०३०, पृ. २५९, किंमत ३० रु.

**वाङ्मयीन आकलन**

प्रा. रा. ग. जाधव

प्रकाशक– पॉप्युलर प्रकाशन, ३५ सी, ताडदेव रोड; मुंबई– ४०००३४, पृ. १११; किंमत– १० रु.

**उत्खनन**

( काव्यसंग्रह ) – केशव मेश्राम

प्रकाशक– पॉप्युलर प्रकाशन, ३५ सी, ताडदेव रोड, मुंबई– ४०००३४, पृ. ८८, किंमत ८ रु.

**महात्मा गांधीजी :**

**व्यक्तिमत्त्व कार्य व शिकवण**

शिवाजी विद्यापीठ प्रकाशन

प्रा. प्र. रा. दामले कोल्हापूर १९७६ पृ. ४९ कि. ३ रु.

### नियतकालिके :

**महाराष्ट्र साहित्य पत्रिका**

जुलै-सप्टेंबर १९७७

संपादकः– डॉ. हेमंत वि. इनामदार; प्रकाशक– श्री. ज. जोशी, कार्याध्यक्ष महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे– ४११ ३०, पृ. ९०, किंमत ५ रु.

**मराठी संशोधन–पत्रिका**

संपादकः– सुरेंद्र आत्माराम गावस्कर, प्रकाशक– मराठी संशोधन मंडळ, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई ४०००१४, पृ. १४६, किंमत ६ रु.

**पंचधारा**

जानेवारी-जुलै, ७७

संपादकः– अनंत अरगडे प्रकाशक– मराठी साहित्य परिषद, आंध्र प्रदेश, हैदराबाद; पृ. १२२.

**संदर्भ भारती**

( हिंदी द्वैमासिक ) मराठी साहित्य अंक, ऑक्टोबर, १९७७ संपा. डॉ. चंद्रकांत बांदिवडेकर प्रकाशक– भारतीय भाषा परिषद, कलकत्ता. पृ. ४८, किंमत २ रु.

**मराठवाडा**

( दिवाळी विशेषांक ), १९७७

संपादकः–अनंत भालेराव पृ. १६४, किंमत ६ रु.

**अस्मितादर्श**

( दिवाळी विशेषांक ), १९७७

संपादकः–प्रा. गंगाधर पानतावणे पृ. १७४ कि. ७ रु.

**संतकृपा**

( दिवाळी विशेषांक ), १९७७

संपादक, प्रकाशकः– ना. वि. काकतकर ज्ञानेश्वरीनिवास, १०३५, सदाशिवपेठ, पुणे ४११०३०, पृ. १००, किंमत ६ रु.

**महानुभाव**

ऑक्टोबर १९७७. संपा. योगिराज शास्त्री; प्रकाशक अखिल भारतीय महानुभाव परिषद, औरंगाबाद पृ. ४२, कि. १ रु.

**दयानंद संदेश**

( वैदिक अनुसंधान पत्रिका ), १९७७

संपादकः– राजवीर शास्त्री, प्रकाशक– दीपचंद आर्य पृ. ६४ किंमत ६० पैसे. व्यवस्थापक– धर्मपाल आचार्य कार्यालय– "दयानन्द संदेश" ( मासिक ) २ एफ, कमला नगर दिल्ली– ७

गोवर्धन पारीख, अनुवाद : मे. पुं. रेगे

# आपल्या शैक्षणिक समस्या

[ग. रा. भटकळ, प्रतिष्ठानातर्फे आयोजित करण्यात येणाऱ्या 'ग. रा. भटकळ स्मृति व्याख्यानमाले'त १४–१२–७६ रोजी देण्यासाठी प्रा. गोवर्धन पारीख ह्यांनी तयार केलेल्या व्याख्यानाचे हे भाषांतर. शिक्षण हा प्रा. पारीखांच्या बहुधा सर्वात अधिक जिव्हाळ्याचा आणि दीर्घ चिंतनाचा विषय होता. आपल्या शेवटच्या अभाषित राहिलेल्या ह्या भाषणात त्यांनी मांडलेले विचार लोकशिक्षणाविषयी आस्था असलेल्या सर्वांनाच मार्गदर्शक ठरतील ह्यात शंका नाही. – का. सं.]

---

कै. ग. रा. भटकळ स्मारक व्याख्यानमालेतील ह्या वर्षीचे व्याख्यान देण्याचे आमंत्रण दिल्याबद्दल कै. ग. रा. भटकळ प्रतिष्ठानाचे विश्वस्त आणि श्री. सदानंद भटकळ यांचा मी ऋणी आहे. श्री. ग. रा. भटकळांनी आपली व्यावसायिक सुरवात पुस्तकांची विक्री करण्याने केली आणि काही काळानंतर प्रसिद्ध पॉप्युलर बुकडेपोची स्थापना केली. पण हे सारे करीत असताना त्यांनी केवळ एका खाजगी व्यवसायाचा प्रारंभ केला नव्हता; त्यांनी एक महत्त्वाची सांस्कृतिक संस्थाच स्थापन केली असे साधार म्हणता येईल. पॉप्युलर बुक डेपो करीत असलेली उत्कृष्ट कामगिरी सर्वांना माहीतच आहे. पण 'पॉप्युलर'ने मुद्रणक्षेत्रातही नाव कमावलेले आहे. प्रकाशक ह्या नात्याने सुप्रसिद्ध ग्रंथ प्रसिद्ध करणारे प्रकाशनगृह असा 'पॉप्युलर'चा लौकिक आहे. श्री. ग. रा. भटकळ हे कळकळीचे, नेकीचे आणि विनयशील असे गृहस्थ होते. जीवनात त्यांनी बहुमोल यश कमावले होते असे कुणीही सहजपणे म्हणू शकेल. त्यांच्याशी थोडासा परिचय होण्याचे भाग्य मला लाभले होते पण तरीही त्यांच्या व्यक्तित्वाचा माझ्या मनावर उमटलेला ठसा खोल, कधीही पुसट होणार नाही इतका खोल होता. भटकळ घराण्याने आंतरराष्ट्रीय लौकिक आणि मान्यता प्राप्त करून घेतली आहेत आणि ह्या नगराने रास्तपणे ज्याचा अभिमान बाळगावा असा व्यवसाय उभारून दाखविला आहे.

ज्या व्यवसायक्षेत्रांचा मी उल्लेख केला आहे त्यांच्याशी माझा पुसटताच परिचय आहे. त्यांचे आकलन मला आहे असा दावा मी करू शकणार नाही, मग अधिकारवाणीने त्यांच्याविषयी बोलणे दूरच राहिले. पण श्री. सदानंद भटकळ ह्यांनी जेव्हा ह्या प्रसंगी मी यावे आणि बोलावे असे आमंत्रण मला दिले तेव्हा एका अर्थाने शिक्षणाच्या कार्यालाच जिने जन्मभर वाहून घेतले होते अशा व्यक्तीला विनीतभावाने आदरांजली वहावी ह्या उद्देशानेच मी ते स्वीकारले. कारण मुद्रण, प्रकाशन आणि ग्रंथविक्री ह्या व्यवहाराचा आणि शिक्षणाचा जितका घनिष्ठ संबंध आहे त्यापेक्षा शिक्षणाशी अधिक निकटचा संबंध असलेले काही असेल असे वाटत नाही. आणि ह्या क्षेत्रात अलिकडे झालेल्या काही घडामोडींमुळे विद्यापीठे स्वतःविषयी आणि त्यांच्या जिव्हाळ्याचे जे प्राथमिक क्षेत्र आहे, म्हणजे शिक्षण, त्याच्याविषयी अधिक आस्थेने विचार करायला प्रवृत्त होत आहेत हे पाहून हे भाषण करायला मला काहीसा धीर आला.

शैक्षणिक समस्यांविषयी विद्यापीठे जी ही आस्था दाखवीत आहेत तिच्यात आपल्या काळाच्या बदलत्या मागण्या आणि त्यांतून निर्माण झालेली आव्हाने प्रतिबिंबित झाली आहेत असे एका दृष्टीने म्हणता येईल. युनेस्कोच्या कुरिये ह्या नियतकालिकात प्रसिद्ध झालेल्या आपल्या एका लेखात कॉर्नेल विद्यापीठाचे माजी प्रेसिडेंट डॉ. जेम्स पर्किन्स ह्यांनी विद्यापीठांविषयी असे म्हटले आहे की "विद्यापीठांपुढे एक विशिष्ट पेचप्रसंग निर्माण झाला आहे असे नाही; अनेक पेचप्रसंग निर्माण झाले आहेत. त्यांतील कोणताही पेचप्रसंग एकटा घेतला तरी गंभीर परिस्थिती निर्माण करायला तो पुरेसा ठरेल असा आहे. त्या सर्वांचा परस्परांशी निकटचा संबंध

आहे आणि त्यांची सोडवणूक करावयाची तर जगभरच्या उच्च शिक्षणाचे संघटन, रचना आणि कार्ये ह्यांच्यात मोठाच बदल घडवून आणावा लागेल, असे भाकित करता येईल." आपल्या ह्या लेखात डॉ. पर्किन्स ह्यांनी त्यांच्या म्हणण्याप्रमाणे, जगातील विद्यापीठांकडे असलेले पाच पेचप्रसंग नमूद केले आहेत. (हे केवळ विद्यापीठांपुढे असलेले पेचप्रसंग नसून सर्वसामान्य शिक्षणापुढील पेचप्रसंग आहेत असे मला वाटते.) संख्येमुळे निर्माण झालेला पेचप्रसंग, आर्थिक पेचप्रसंग, विद्यापीठांच्या अभ्यासक्रमाला प्रचलित सामाजिक परिस्थितीचा संदर्भ कोणत्या स्वरूपात असावा ह्या प्रश्नातून उद्‌भवलेला पेचप्रसंग, विद्यापीठाची जी वेगवेगळी साध्ये आहेत त्यांचे नवीन संदर्भात तौलनिक महत्व कसे ठरवावे ह्याविषयीचा पेचप्रसंग आणि अखेरीस विवेकनिष्ठ (रॅशनल) असा विचार असणे अशक्य आहे असे मानणाऱ्या नवीन संशयवादाने निर्माण केलेला पेचप्रसंग. अलिकडच्या काळात आपल्या अनेक विद्यापीठांचा कारभार सुरळीतपणे होण्यात ज्या अडचणी उद्‌भवलेल्या दिसतात त्यांतून ह्या आणि इतर पेचप्रसंगांना कल्पकतेने तोंड देण्याची जी आवश्यकता निर्माण झाली आहे तीच व्यक्त झाली असे म्हणता येईल. ह्या पेचप्रसंगांतून जी गुंतागुंतीची परिस्थिती निर्माण होते तिचा परिणाम गैरशिस्त आणि बेजबाबदार वर्तनातून दिसून येऊ नये असे कुणी म्हटले तर ते समजण्यासारखे आहे. पण विद्यापीठीय क्षेत्रात प्रचलित असलेली परिभाषा वापरून असे म्हणता येईल की ह्या स्वरूपाचे प्रसंगी होणारे वर्तन म्हणजे बदल घडून यावा ह्यासाठी किती दाब निर्माण झाला आहे हे मापण्याचा 'बॅरोमिटर' असतो. ह्या वर्णनामुळे अशाप्रकारच्या वर्तनाचे यत्किंचित्‌ही समर्थन होते असे मानण्याचे अर्थात कारण नाही. तथापि परिस्थितीच्या ह्या अंगाचा विचार वगळून आपल्या पुढील कित्येक समस्यांचे सम्यक् स्वरूप समजून घेण्याचा मी प्रयत्न करणार आहे.

संख्येतील वाढ आणि आर्थिक ओढगस्त ह्या एका दृष्टीने परस्परसंबंधित अशा समस्या आहेत हे म्हणणे अगदी परिचित, जवळजवळ क्षुण्ण आहे. जशी संख्या वाढते तसा अस्तित्वात असलेल्या साधनसामग्रीवर अधिक दबाव येतो आणि अनेकदा नवीन साधनसामग्री पुरविताना गुणवत्तेची कदर राखण्यात येत नाही. हा आपल्याला परिचित असा अनुभव आहे. वाढत्या संख्येमुळे निर्माण होणाऱ्या आव्हानांना संपन्न समाजसुद्धा यशस्वी रीतीने तोंड देऊ शकलेले नाहीत. पण कित्येक कारणांमुळे आपल्यापुढील समस्या अधिक गुंतागुंतीची बनते. शिक्षणव्यवस्था ही एखाद्या शिडीसारखी असते आणि ह्या शिडीच्या एखाद्या टप्प्यात तुम्ही जलद वेगाने वाढ केली तर त्याच्या बदलात म्हणून तिच्या इतर पातळचात तुम्ही अवास्तव संकोच करू शकणार नाही. उदा. तुम्ही प्राथमिक शिक्षणाची झपाट्याने वाढ घडवून आणली तर काही थोड्या वर्षांत माध्यमिक शिक्षणाची आणि नंतर लवकरच उच्च शिक्षणाची वाढ व्हावी असा दाब आणण्यात येत आहे असे तुम्हाला आढळून येईल. उलट ज्या प्रमाणात विद्यार्थ्यांची संख्या वाढते त्या प्रमाणात चांगल्या गुणवत्तेचे शिक्षक निर्माण करण्याचा ओघ वाढवून कायम राखणे सोपे नसते. भौतिक साधनसामग्रीही त्या प्रमाणात वाढविता येत नाही. शिक्षणाची गुणवत्ता ढासळण्याची प्रक्रिया सुरू होते आणि ही प्रक्रिया एकदा सुरू झाली की ती थोपवून धरणे किंवा दुरुस्त करणे अतिशय कठीण असते. हे केवळ उच्च शिक्षणाविषयी खरे असते असे नाही; शिक्षणाच्या सर्वच पातळचांविषयी ते खरे असते. शिवाय ही प्रक्रिया खाजगी संस्थांतून देण्यात येणाऱ्या शिक्षणापुरती मर्यादित असते असेही नाही. उदा. आज आपल्याकडे प्राथमिक शिक्षणाचा एक अगदी मर्यादित असा भागच खाजगी शिक्षणसंस्थांच्या हवाली आहे. पण तरीही प्राथमिक शिक्षणाच्या क्षेत्रात सुधारणेची प्रक्रिया कुंठित झाली आहे, बराचसा शैक्षणिक प्रयत्न वाया जातो असेच आढळून येते; ह्या समस्या ह्या क्षेत्रातही भेडसावीत आहेत. पण गेल्या वीस वर्षांत प्राथमिक शिक्षणात बरीच वाढ झाली आहे. आणि ह्यामुळे माध्यमिक शाळांतून प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थ्यांच्या संख्येतही जलद गतीने वाढ झाल्याशिवाय राहणार नाही. उलटपक्षी विद्यापीठातील पेचप्रसंगांची छाया, शिक्षकांच्या गुणवत्तेवर होणाऱ्या त्याच्या परिणामाच्या स्वरूपात, पुढील काही वर्षे माध्यामिक

अनुक्रमणिका

शिक्षणावर पडणार आहे. ह्याचा अर्थ असा की माध्यमिक शिक्षणाच्या क्षेत्रात आपल्याला अतिशय बिकट प्रसंगाला तोंड द्यावे लागेल अशी शक्यता आहे आणि त्याचा विद्यापीठांतून बाहेर पडणाऱ्या पदवीधरांच्या गुणवत्तेवर आणखी प्रतिकूल परिणाम घडून येईल. शिक्षणाच्या व्यवसायाचे लोकांना असलेले आकर्षण क्षीण आणि मर्यादित असते. ह्यामुळे विद्यापीठातून बाहेर पडणारे अधिक चांगल्या दर्जाचे पदवीधर शिक्षणव्यवसायाकडे आकृष्ट होतील अशी अपेक्षा बाळगणे व्यर्थ आहे. तेव्हा एकतर व्यवसायात असलेल्या चांगल्या शिक्षकांवरील कामाचा भार वाढेल आणि त्यामुळे त्यांच्या कामाचा कस कमी होईल किंवा कमी गुणवत्तेच्या शिक्षकांची नेमणूक करावी लागेल.

शिक्षणाच्या विकासाचा वेग अधिक व्हावा ह्यासाठी अधिक प्रमाणावर आर्थिक साहाय्य करण्यात यावे अशी मागणी पुढे येत आहे आणि तिला अनुसरून हे साहाय्य वाढविण्यात येतही आहे. पण शिक्षणाच्या विकासाचा हा वाढता वेग तोलून धरण्यासाठी योग्य प्रकारचे शिक्षण आणि प्रशिक्षण झालेल्या माणसांचीही वाढत्या संख्येने आवश्यकता भासत राहते ह्या गोष्टीकडे दुर्लक्ष होणे शक्य आहे. ह्या गोष्टीकडे जाणूनबुजून दुर्लक्ष करण्यात येईल असे नाही; पण पैशाच्या उघड दिसत असलेल्या चणचणीमुळे तिच्याकडे अभावितपणे दुर्लक्ष होणे शक्य आहे. अशा रीतीने हा पेचप्रसंग अधिकच बिकट होत जाणे शक्य आहे; आणि लोकसंख्येत झपाट्याने होणारी वाढ ध्यानात घेतली तर ह्या बिकटपणात आणखी भर पडेल असे मानावे लागते.

ह्या सर्व गोष्टी आपल्याला माहीत आहेतच. पण आपल्याला परिस्थितीच्या एका वैशिष्ट्याकडे अनेकदा पुरेसे ध्यान देण्यात येत नाही असे म्हणता येईल हे वैशिष्ट्य असे की दोन महत्त्वाच्या घटकांच्या पार्श्वभूमीवर ही प्रक्रिया आपल्याकडे घडत आहे आणि घडणार आहे: (१) आपली घसरगुंडी जेथून सुरू झाली ते स्थान फारसे उंचावर नव्हते; (२) आज ज्ञानाची वाढ स्फोटक म्हणावा अशा वेगाने होत आहे आणि तंत्रविद्येतही अतिशय झपाट्याने सुधारणा होत आहे.

आपल्या विद्यापीठांच्या पहिल्या पदवीची प्रगत देशांतील पहिल्या पदवीशी तुलना करता येण्याजोगी नाही हे सर्वसाधारणपणे लोकांना माहीत आहे आणि शिक्षण आयोगानेही (१९६४–६६) ते मान्य केले आहे; आणि त्यानंतर ह्या गुणवत्तेत काही सुधारणा झाली आहे असे म्हणता येणार नाही. ह्या संदर्भात शिक्षणाच्या होणाऱ्या विस्तारामुळे भविष्यात गुणवत्ता सुधारेल ह्या शक्यतेला वावच उरणार नाही; विशेषतः विस्तारामुळे घडून येणाऱ्या परिणामांचे निराकरण करण्यासाठी म्हणून केलेल्या प्रयत्नांच्या अभावी असे घडून येईल. पण ही अशक्यप्राय गोष्ट काही करून आपल्याला साधता आली आणि गुणवत्तेत आपण सुधारणा घडवून आणली असे मानले तरी हे सारे विज्ञानाच्या आणि तंत्रज्ञानाच्या मर्यादित, पारंपरिक चौकटीत साधण्यात आले असेल. आणि मध्यंतरात वैज्ञानिक आणि तंत्रविषयक शोधात जी फार मोठी भर पडलेली असेल तिचा ह्या शिक्षणाला काही स्पर्श झालेला नसेल. पण विज्ञानात आणि तंत्रज्ञानात अशी भर घालणे आपल्याला शक्य व्हायचे असेल तर ज्या गुणवत्तेची जोपासना आपल्याला करावी लागेल ती एका स्थिर ज्ञानव्यवस्थेच्या संदर्भातील गुणवत्ता नसेल. तर गतिशील, लवचिक, वर्धिष्णु समाजजीवनाच्या संदर्भातील गुणवत्ता असेल.

विद्यार्थ्यांची संख्या वाढली की त्यांना शिकविण्यात येणारा अभ्यासक्रम त्यांच्या प्रत्यक्ष जीवनाशी कितपत संबंधित आहे ह्याविषयी स्वाभाविकपणे अधिकाधिक शंका उपस्थित करण्यात येतात, संशय घेण्यात येतो. वेगवेगळ्या व्यक्तींना भिन्न नैसर्गिक देणगी लाभलेली असते, त्यांची कुवत आणि क्षमता भिन्न असते आणि एकाच प्रकारच्या अभ्यासक्रमामुळे सर्वांच्या भिन्न गरजा भागतील असे मानता येणार नाही. असाधारण क्षमतेच्या मूठभर निवडक व्यक्तींसाठी रचण्यात आलेल्या शिक्षणव्यवस्थेचे बहुजनसमाजाचे शिक्षण करण्यासाठी घडविण्यात आलेल्या व्यवस्थेत जेव्हा परिवर्तन होते तेव्हा तात्काळ अभ्यासक्रमाची पुनर्रचना कशी करावी हा प्रश्न उपस्थित होतो. ही गोष्ट सहजी मान्य करण्यात येते. पण जी गोष्ट सामान्यपणे ध्यानात घेतली जात नाही ती ही की अशी पुनर्रचना करताना

अगदी उघडपणे प्राथमिक महत्वाच्या असलेल्या मुद्यांच्या बाबतीतसुद्धा आपला भूतकालाचा अनुभव भविष्याविषयी योग्य मार्गदर्शन करू शकेल असा भरवसा बाळगता येणार नाही. उलटपक्षी ही प्रक्रिया काही प्रमाणात तरी उलटी करावी लागेल. विसाव्या शतकाच्या अखेरीस जी आव्हाने आपल्यापुढे उभी राहतील, ज्या समस्या उद्भवतील त्यांना अनुरूप ठरेल अशा अभ्यासक्रमाची कल्पना करणे सोपे नाही. ह्या स्वरूपाचे काम हाती घेतले तर त्यात ज्या अडचणी आढळून येतील, ज्या प्रकारची गुंतागुंत त्यात अंतर्भूत असल्याचे दिसून येईल तिची यथार्थ पूर्वकल्पना कुणालाही करता येणार नाही. पण ज्या जलद गतीने आज सारीच पार्श्वभूमी बदलत आहे ती ध्यानात घेता, भूतकालीन अनुभवावर आपण भरवसा ठेवला तर तो फसवा ठरेल हे काही प्रमाणात तरी स्पष्ट आहे. ह्या संदर्भात अनुभवी शिक्षकाची उपयुक्तता दोन घटकांनी तरी मर्यादित झालेली असते असे आढळून येईल. पहिली गोष्ट अशी की शिक्षक स्वाभाविकपणे परंपराप्रिय, बदल घडवून आणायला अनुत्सुक असे असतात. ह्यामुळे दहा किंवा वीस वर्षांपूर्वी त्यांना जे आणि जसे शिकविण्यात आले तेच आणि तसेच आताही आपल्या विद्यार्थ्यांना शिकवावे ह्याकडे त्यांचा अगोदरच अतिशय बळकट कल निर्माण झाला असणे शक्य असते. तेव्हा अभ्यासक्रमाची रचना करताना त्यांनी ह्याच दृष्टिकोनाचा अवलंब केला आणि आजच्या परिस्थितीशी तो जुळवून घेण्यासाठी म्हणून त्याच्यातील काही गोष्टी त्यांनी केवळ वगळल्या आणि काहींची त्याच्यात केवळ भर घातली तर सद्य परिस्थिती आणि अभ्यासक्रम ह्यांच्यात संगती साधण्याचे त्यांचे उद्दिष्ट फसेल. उलटपक्षी भविष्यकालीन परिस्थितीचे स्वरूप काय असेल ह्याची सुस्पष्ट पूर्वकल्पना करण्यात अंगभूत अशा अडचणी असल्यामुळे अशी संगती असावी ह्या मागणीचे पूर्णपणे समाधान करणे फारच थोडयांना शक्य होईल. आपल्या आजच्या परिस्थितीत शिक्षणाचे व्यावसायीकरण व्हावे अशी जी मागणी व्यापक प्रमाणावर होत आहे तिला ह्या शृंगापत्तीतून मार्ग काढावा लागेल. आणि असा मार्ग काढायचा तर आजच्या वाढत्या पिढीच्या ठिकाणी भविष्यात जी आव्हाने तिच्यापुढे ठाकतील त्यांना तोंड देण्यासाठी आवश्यक असलेल्या वृत्ती बाणवू शकेल आणि अशा रीतीने त्यांची पूर्वतयारी करून घेईल अशी एक अतिशय लवचिक आणि कल्पकतापूर्ण अशी शिक्षणव्यवस्था रचण्याशिवाय गत्यंतर दिसत नाही. गेल्या शंभर किंवा अधिक वर्षांत उभारण्यात आलेली शिक्षणव्यवस्था ही आव्हाने स्वीकारू शकणार नाही आणि तिच्यात जे मूलभूत आणि दूरगामी परिवर्तन घडवून आणणे आवश्यक आहे ते केवळ आकृतिबंधात बदल घडवून साधता येणार नाही. सबंध देशभर आपण एकच समान आकृतिबंध घालून दिला तर भावी कालात त्याच्यात आज अनपेक्षित असलेला असा ताठरपणा निर्माण झाल्याचे आढळून येईल. यामुळे शिक्षणव्यवस्थेची ह्या दृष्टिकोनातून जेव्हा पुनर्रचना करण्यात येते, तेव्हा शिक्षणाच्या व्यवसायीकरणाची समस्या अशा पुनर्रचनेचे नेहमीच मर्मस्थान ठरते ह्याचे नवल वाटायला नको. शिक्षणाचे व्यवसायीकरण करायचे तर शिक्षणसंस्था ज्या वास्तव परिस्थितीत आपली कार्ये पार पाडीत असतात तिची अधिकाधिक दखल घ्यावी लागते. वेगवेगळ्या प्रदेशांत ज्या प्रत्यक्ष परिस्थितीला तोंड देत माणसे आपले जीवन घडवीत असतात, आणि त्या परिस्थितीत जीवन जसे घडलेले असते, म्हणजे जीवनाचे समग्र पर्यावरण आणि ह्या पर्यावरणाने घडविलेले जीवनाचे स्वरूप ह्यांच्यात खूपच फरक असतो. शिवाय हे प्रदेश विकासाच्या वेगवेगळ्या टप्प्यावर येऊन पोचलेले असतात. त्या, त्या प्रदेशात नागरी परिस्थिती आणि ग्रामीण परिस्थिती ह्यांमधील भेदाचे एक विशिष्ट स्वरूप असते. ह्या साऱ्या गोष्टी ध्यानात घेतल्या तर कोणत्या तरी एका केंद्रीय अधिकारी यंत्रणेला सर्व प्रदेशांसाठी व्यावसायिक अभ्यासक्रम निश्चित करणे आणि अमलात आणणे सोपे ठरणार नाही. वेगवेगळ्या प्रदेशातील परिस्थिती जर भिन्न असेल तर त्यांच्या विकासासाठी वेगवेगळ्या प्रकारच्या गोष्टींची गुंतवणूक करणे आवश्यक असणार आणि शिक्षणव्यवस्थेतून शिकून बाहेर पडलेल्या व्यक्तींच्या ठिकाणी कोणत्या विषयांचे ज्ञान असावे, कोणत्या प्रकारची कौशल्ये आणि कुवत त्यांच्या अंगी असावी ह्याविषयीच्या








अपेक्षाही परिस्थितीनुसार भिन्न असणार. अशा तऱ्हेने भिन्न असणाऱ्या प्रदेशांच्या सीमा आणि देशाच्या राजकीय विभागांच्या सीमा नेहमीच जुळतील असे नाही. कारण आपल्याला अभिप्रेत असलेल्या प्रादेशिक भिन्नतेचा उगम अधिकांशी नैसर्गिक परिसराच्या किंवा पर्यावरणाच्या भिन्नतेत असतो. तेव्हा शिक्षणसंस्थांना स्वायत्तता राहील आणि त्याबरोबरच त्यांना आर्थिक साहाय्यही मिळत राहील अशी व्यवस्था केल्याशिवाय, ( अर्थात् शिक्षणसंस्थांनी काही अटी पाळल्या पाहिजेत हाही ह्या व्यवस्थेचा भाग असेल ) शिक्षणाच्या व्यवसायीकरणाची झपाट्याने प्रगती होणे कठीण ठरेल. ह्या बाबतीत काहीच करण्यात आलेले नाही असे नाही; पण जे काही करण्यात आले आहे त्यामुळे ह्या समस्येला हात घालायला सुरवात झाली आहे एवढेही म्हणता येणार नाही हे सर्वमान्य आहे. पहिल्या पदवीपर्यंतची शिक्षणक्रमाची जी पंधरा वर्षे असतील त्यांची वेगवेगळ्या रीतींनी विभागणी कशी करायची ह्या स्वरूपाचा हा प्रश्न नाहीच. आज आपल्यापुढे असलेल्या, तसेच भविष्यकालातील वाढत्या आव्हानांना तोंड देऊ शकेल अशा शिक्षणव्यवस्थेच्या स्वरूपाची शक्य तितकी स्पष्ट कल्पना आपल्याला कशी करता येईल असा हा प्रश्न आहे.

ज्या समस्यांचे विवेचन आपण आतापर्यंत केले त्या इतक्या गुंतागुंतीच्या आहेत की केवळ त्यांच्याच विचार केला तरी कुणीही गोंधळून जाईल. पण ह्याशिवाय आणखी एक समस्या आपल्यापुढे आहे. शिक्षणव्यवस्थेची जी विविध उद्दिष्टे आहेत त्यांच्या पौर्वापर्याविषयीच्या, तौलनिक महत्वाविषयीच्या आपल्या कल्पनांमध्ये आपण परिवर्तन केले पाहिजे ह्या रास्त मागणीतून ही समस्या उद्भवते. आतापर्यंतची शिक्षणव्यवस्था ही सामान्यपणे समाजातील मूठभर सुसंस्कृत वर्गासाठी म्हणून रचण्यात आली होती असे म्हणण्यात येते आणि हे म्हणणे रास्त आहे. ज्या काळात तिची रचना झाली त्या काळात काही थोड्यांनाच शिक्षण घेणेही आवश्यक असे आणि तेही काही मर्यादित उद्दिष्टांसाठी त्यांना घ्यावे लागे. तंत्रविद्येत झालेल्या प्रगतीमुळे आणि समाजात औद्योगीकरणाच्या झपाट्याने झालेल्या वाढीमुळे आज वेगळी परिस्थिती निर्माण झाली आहे. आज समाजात खूपच वेगवेगळी कार्ये अशी आहेत की ती पार पाडण्यासाठी शिक्षणाची किंवा ट्रेनिंगची आवश्यकता असते. आणि आपण अगोदरच पाहिले आहे त्याप्रमाणे ही जी शिक्षणाची व्यापक आवश्यकता निर्माण झाली आहे तिचे स्वरूप स्थिर रहाणारे नाही. प्रचलित तंत्रे आज अधिकाधिक वेगाने जीर्ण होत जातात आणि शिवाय शिकण्याच्या पद्धती आणि तंत्रे ह्यांमध्ये वाढत्या प्रमाणावर बदल होत जातात. ह्यामुळे ह्या आवश्यक झालेल्या शिक्षणाच्या आशयात आणि पद्धतीत बदल करत रहावे लागणार. शिक्षणाची गुणवत्ता सतत सुधारत जाईल अशी व्यवस्था करण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे. ह्या गरजेचे समाधान जर आपण करू शकलो नाही किंवा शिक्षित व्यक्तींच्या शिक्षणाला साजेल असा वाव त्यांना दिला नाही तर आपले बुद्धिमान शिक्षित तरुण अधिक मोठ्या संख्येने प्रगत देशांत जातील किंवा ज्या स्वरूपाचे आणि पातळीवरचे कार्य करायची कुवत त्यांच्यांत निर्माण झाली आहे त्यापेक्षा कितीतरी हलक्या प्रतीचे काम करणे भाग पडल्यामुळे ते वैफल्यग्रस्त होतील; किंवा हे दोन्ही परिणाम घडून येतील. हे जेव्हा मी म्हणतो तेव्हा ह्या समस्येची सोडवणूक कशी करायची हे मी सांगत नाही आहे; ह्या समस्येचे स्वरूप मी स्पष्ट करीत आहे. पण हा ह्या समस्येच्या स्वरूपाचा केवळ अर्धा भाग आहे. दुसरा भाग असा की आपली लोकसंख्या झपाट्याने वाढते आहे आणि ह्यामुळे साक्षरतेचा प्रसार करून समाजातील साक्षरांची संख्या आपण वाढवीत असतानाच निरक्षरांची संख्याही त्याबरोबर वाढत असते. सत्तर टक्के लोक निरक्षर असलेल्या समाजाचे शिकणाऱ्या समाजात परिवर्तन करण्याचे काम किती अवाढव्य आहे ह्याची कुणालाही कल्पना करता येईल. ह्यामुळे शिक्षणाच्या क्षेत्रात काम करणाऱ्यांवर एकाच वेळी दोन विरोधी दबाव येतात. शिक्षणाच्या गुणवत्तेच्या दृष्टीने विद्यार्थ्यांच्या संख्येवर नियंत्रण घालण्यासाठी दबाव येतो आणि उलट सामाजिक समतेच्या दृष्टीने शिक्षणाचा प्रसार करण्यासाठी दबाव येतो. ह्या दोन्ही गोष्टी आवश्यक आहेत व त्यांच्यांत

समन्वय साधणे अतिशय कठीण आहे. मागासवर्गासाठी शिक्षणसंस्थांत खास जागा राखून किंवा शिक्षणक्रमाच्या एकदोन उच्च टप्प्यांवर प्रवेशाचा मार्ग निरुंद करून किंवा मागासवर्गासाठी नोकऱ्यांमध्ये राखीव जागा निर्माण करून हा प्रश्न सुटणार नाही. ह्या आव्हानाचे स्वरूप इतके प्रचंड आहे की त्याला तोंड द्यायचे तर हजारो माणसांना संथपणे पण सातत्याने विधायक मार्गांनी (पण म्हणजे पारंपरिक मार्गाने नव्हे) काम करावे लागेल. पारंपरिक मार्ग निष्फळ ठरला आहे हे आजच्या परिस्थितीकडे दृष्टिक्षेप केला तरी ध्यानात येते. पण या आव्हानाचे स्वरूप असे आहे की एका अधिक सोप्या मार्गाचा अवलंब करून त्याच्यापासून सुटका करून घेता येईल असे वाटणे शक्य आहे. लोकांचे उद्बोधन करण्यापेक्षा त्यांना थारावणे, त्यांना शिक्षण देण्याऐवजी हिकमतीने आपल्याला हवे ते वळण त्यांच्या वर्तनाला देणे ह्याला अधिक महत्त्व असते ह्या समजुतीवर हा मार्ग आधारलेला आहे. कित्येकांना तर असे वाटते की आपल्या समाजाची सर्वसाधारण प्रवृत्ती पाहिली तर हा सोपा मार्गच अधिक फलदायी ठरेल असे वाटणे का स्वाभाविक आहे समजून घ्यायला राजकारणाच्या किंवा अर्थकारणाच्या क्षेत्रात शिरायला नको; शिक्षणाच्या क्षेत्रावरूनही ते समजून येऊ शकेल. उच्च शिक्षणक्रमात विद्यार्थ्यांना प्रवेश नाकारण्याऐवजी, एखाद्या तांत्रिक किंवा व्यावसायिक क्षेत्रात तुम्ही प्रवेश घेणे तुमच्या दृष्टीने हितावह ठरेल असे त्यांना सांगून प्रवेश नाकारण्याऐवजी, त्यांना प्रवेश देणे, ज्या अभ्यासक्रमासाठी त्यांना प्रवेश देण्यात येत आहे तो त्यांना झेपणारा नाही हे पूर्णपणे माहीत असूनही त्यांना प्रथम प्रवेश देणे आणि नंतर धान्य पाखडून त्यातून खडे बाजूला काढावे तसे त्यांना बाजूला काढणे हे कितीतरी अधिक सोपे असते असते असा युक्तिवाद आपण अनेकदा ऐकतो. विद्यापीठात ज्यांना प्रवेश देण्यात आलेला असतो त्यातील अतिशय थोडेच टक्के विद्यार्थी पहिल्या पदवीपर्यंतचा अभ्यासक्रम ठरलेल्या मुदतीत पार पाडू शकतात आणि उरलेल्यांपैकी थोडेसेच अधिक काळ घेऊन तो पार पाडतात हे खरे आहे की नाही? १५ ते २५ ह्या वयोगटातील जी मुले शिक्षणव्यवस्थेतून बाहेर पडतात (ड्रॉप् आउट्स) त्यांच्याकडे आता आपण गंभीरपणे लक्ष देऊ लागलो आहोत आणि ही मुले पूर्णपणे वैफल्यग्रस्त होऊन, ह्या समाजात आपला जन्म झाला पण त्याच्यात आपल्याला स्थान नाही अशी भावना त्यांच्यात दृढ होण्यापूर्वीच त्यांच्या अडचणी आणि त्यांच्यापुढील समस्या ह्यांच्यामधून आपल्याला मार्ग काढता येईल अशी आशा आपण करू या. आपल्याकडच्या खाजगी संस्था नवीन उपक्रम हाती घेऊन, कोणत्या अडचणींना तोंड देत ते पार पाडावे लागतात ह्याच्या अनुभवातून स्वतः धडा शिकत इतरांना धडा घालून देतील अशा प्रवृत्तीच्या नाहीत. अनेकदा त्या कनिष्ठ दर्जाच्या असतात. ह्या विचित्र परिस्थितीत ह्या बाहेर पडलेल्या मुलांच्या समस्येकडे विद्यार्थ्यांविषयीची समस्या असे कितपत पाहता येईल हा एक प्रश्नच आहे. ही आता एक महत्त्वाची सामाजिक समस्या बनली आहे आणि आपला शिक्षणक्रम पुरा केल्याशिवाय शिक्षणव्यवस्थेच्या कोणत्यातरी टप्प्यावरून जे बाहेर पडतात आणि आपण जे काही शिकलो त्याचा आपल्याला फारसा उपयोग नसतो असे ज्यांना आढळून येते त्यांच्याशिवाय ज्यांना शिक्षणसंस्थांतून प्रवेशच मिळालेला नसतो, विशेषतः माध्यमिक आणि उच्चतर स्तरावरील संस्थांत प्रवेश मिळालेला नसतो अशीही मुले असतात आणि त्यांची संख्या कितीतरी अधिक असते. तेव्हा आपल्यापुढील ही आणखी एक समस्या आहे आणि ती सोडवायला भगीरथ प्रयत्न करावे लागतील. ही परिस्थिती इतकी गंभीर आहे की रूढ पारंपरिक मार्गांनी शैक्षणिक समस्या सोडविता येतील ह्या आपल्या नेहमीच्या विश्वासाला हादराच बसतो, तो टिकूच शकत नाही. हे मार्ग सोडून देऊन वेगळ्याच मार्गांचा अवलंब करावा लागेल असे दिसते.

शिक्षणाविषयीची आपली जी परिस्थिती आहे तिच्याशी संबंधित अशा अनेक समस्यांना मी अजून स्पर्श केला नाही ह्याची मला जाणीव आहे. भारतीय समाज हा बहुभाषिक समाज आहे ह्यातून निर्माण होणारी समस्या आपल्यापुढे आहे आणि तसाच इंग्रजीचा माध्यम म्हणून वापर करण्याविषयीच्या वादाचाही विचार करणे आवश्यक आहे.

परंपरेने संस्कृतीपासून वंचित असलेले असे जे कित्येक थर आपल्या समाजात आहेत त्यांच्याविषयीही एक समस्या उत्पन्न होते. ह्या थरांनी ह्या अडचणीवर मात करावी व इतरांच्या बरोबरीने स्थान प्राप्त करून घ्यावे यासाठी त्यांचे अधिक सांस्कृतिक पोषण करील असा खास आणि दृढ शैक्षणिक प्रयत्न करणे अत्यावश्यक आहे. पण एकाच व्याख्यानामध्ये ह्या आणि इतर समस्यांविषयी भाष्य करणे फारसे व्यवहार्य ठरणार नाही. तेव्हा माझे विवेचन मी काही समस्यांपुरतेच मर्यादित ठेवले आहे आणि आपल्या समग्र शैक्षणिक परिस्थितीविषयी काही सर्वसामान्य विचार आपल्यापुढे मांडले आहेत.

शिक्षणक्षेत्रातील चाकोरीचा मार्ग सोडून वेगळ्या मार्गाचा अवलंब करणे आज आवश्यक झाले आहे असे प्रतिपादन करण्याचा मी जो प्रयत्न केला आहे त्याच्यात मुलुखावेगळे असे काहीच नाही. ज्याच्या योगाने ज्या अडचणींचा उल्लेख मी अगोदर केला आहे त्यांतील गुंतागुंतीत भर पडणार नाही पण त्या सोडविण्यात आपल्याला यश येऊ शकेल असा हा मार्ग असला पाहिजे. ह्या संदर्भात आणखी एका गोष्टीचा उल्लेख केला पाहिजे. ह्या देशात काही प्रमाणात आपण अशी परिस्थिती घडवून आणली आहे– आणि प्रगत देशात ती अधिकच प्रमाणात घडून आली आहे– की तिच्यात प्रस्थापित शिक्षणव्यवस्थेला काहीसा विनीतभाव धारण केल्याशिवाय गत्यंतर नाही. विद्यापीठ हे ह्या आकारिक शिक्षणव्यवस्थेच्या शिखरासारखे असते. शिक्षण देण्याची मक्तेदारी ह्या शिक्षणव्यवस्थेकडे आता राहिलेली नाही. आधुनिक समाजात ज्यांच्याद्वारा शिक्षण देता येईल अशी अनेक वेगवेगळी माध्यमे निर्माण झाली आहेत आणि त्यांचा उपयोग करून स्वतंत्रपणे विचार करण्याची सवय आणि कुवत, वैज्ञानिक वृत्ती, मानवतावादी दृष्टिकोण आणि विधायक वृत्ती ह्यांचा परिपोष करता येईल. पण ह्याच माध्यमांच्या योगे मनांचे अभिसंधान ( कंडिशनिंग ) करून अंधश्रद्धा बळकट करणे, पूर्वग्रहदूषित आणि वंश, जात, धर्म, इ. वर आधारलेली विषमवृत्ती दृढ करणे, विध्वंसक दृष्टिकोण निर्माण करणे ह्या गोष्टी साधता येतात ह्याचीही उदाहरणे आहेत. संशोधनाच्या योगे ज्ञानाच्या सीमांची वाढ करण्याचीही मक्तेदारी आता कोणत्याही अर्थी आकारिक शिक्षणव्यवस्थेकडे राहिलेली नाही. शिक्षणाची जो पुनर्रचना आपण करू पाहतो तो ह्या सर्व संस्था मिळून जे सामूहिक कार्य करतात, जो सामूहिक कार्यक्रम त्या पार पाडतात त्यांचा केवळ एक भाग आहे. माणसांची मने प्रभावित करून घडविण्याची शक्ती ह्या माध्यमांच्या ठिकाणी असते, हा त्यांचा विशेष असतो आणि ही शक्ती वापरतांना ह्या माध्यमांनी शिस्त आणि जबाबदारी अंगी बाणवून घेतली पाहिजे हे उघड आहे. अशा, माणसांच्या मनांना प्रभावित करणाऱ्या माध्यमांतील एक अतिशय महत्त्वाचे माध्यम म्हणजे पुस्तके आणि नियतकालिके हे होय. ज्यांच्या स्मृतिनिमित्त आज मी हे भाषण करीत आहे, त्या कै. ग. रा. भटकळांनी ह्या माध्यमाच्या विकासासाठी स्वतःला वाहून घेतले होते. ह्या प्रसंगी त्यांचे पुण्यस्मरण करून त्यांना श्रद्धांजली वाहूया.



अनुक्रमणिका

गोवर्धन पारीख, अनु. मे. पुं. रेगे

# आणीबाणी : कारणे आणि उपाय

[ दिनांक २६,२७, व २८ डिसेंबर, १९७५ रोजी अहमदाबाद येथे भरलेल्या रॅडिकल ह्यूमॅनिस्टांच्या मेळाव्यापुढे मांडण्यासाठी प्रा. गोवर्धन पारीख ह्यांनी तयार केलेल्या ठरावाच्या मसुद्याचे हे भाषांतर आहे. हा मसुदा मेळाव्यापुढे मांडण्यात आला नाही. तथापि आणीबाणीची कारणे आणि ज्या सामाजिक परिस्थितीत आणीबाणी लादणे शक्य होते ती सुधारण्यासाठी आवश्यक असलेले इलाज ह्यांचे पारीख ह्यांनी केलेले हे विश्लेषण अभ्यासकांना महत्त्वाचे वाटेल, अशी खात्री आहे.
का. सं. ]

---

आजच्या राजकीय परिस्थितीचे काळजीपूर्वक आणि चिकित्सक परीक्षण केले तर असे आढळून येईल की विशेषतः ह्या शतकाच्या तिसऱ्या दशकापासून जगभर ज्या दोन विरोधी प्रवृत्ती एकमेकींना तोंड देत आहेत त्याच येथेही एकमेकीं-विरुद्ध आज उभ्या ठाकल्या आहेत असे रॅडिकल ह्यूमॅनिस्ट असोसिएशनच्या ह्या परिषदेचे मत आहे. दारिद्र्यात खितपत असलेल्या बहुसंख्य भारतीय जनतेच्या नावाने स्वातंत्र्य, समता आणि बंधुभाव ही सांस्कृतिक मूल्यें, मूलभूत मानवी हक्क आणि कायद्याचे राज्य ह्यांना विरोध करण्यात येत आहे; त्यांना धोका निर्माण झाला आहे आणि काही प्रमाणात त्यांना नाकारण्यात आले आहे. एका बाजूला, भूतकालापासून वारसा म्हणून लाभलेल्या आणि आपल्या घटनेत मूर्त झालेल्या हक्कांच्या आणि स्वातंत्र्याच्या रक्षणासाठी एक धीरोदात्त लढा उभारण्यात आलेला दिसून येत आहे तर दुसऱ्या बाजूला, ज्या समाजातील अर्धी लोकसंख्या दारिद्र्य-रेषेखाली जगते त्या समाजात हे हक्क आणि स्वातंत्र्य केवळ औपचारिक आणि अर्थशून्य ठरते असे म्हणून त्यांना वाढत्या प्रमाणात विरोध करण्यात येत आहे. ज्या राजकीय पेचप्रसंगातून आपला देश आज जात आहे त्याच्या निर्मितीत इतर काही कारणघटकांचा सहभाग असला तरी मूलतः हा पेचप्रसंग म्हणजे ह्या सामन्याचेच काही अंशी प्रतीक आहे असे रॅडिकल ह्यूमॅनिस्ट मानतात.

ह्या स्वरूपाचा सामना पूर्णपणे चूक अशा समजांवर आधारलेला असतो आणि तो धोकादायक असतो असे गेल्या चार दशकांहून दीर्घकालीन अशा राजकीय अनुभवाने निर्णायक रीतीने दाखवून दिले आहे असे ह्या परिषदेचे मत आहे. जनतेचे आर्थिक विमोचन करण्याच्या आशेने ज्यांनी राजकीय स्वातंत्र्य नष्ट केले त्यांना हे विमोचन साधण्यात घोर अपयशाचे धनी व्हावे लागले. उलट, बहुसंख्य जनतेच्या आर्थिक दु:स्थितीकडे दुर्लक्ष करून ह्या हक्कांचा आणि स्वातंत्र्याचा बचाव करण्याचे ज्यांनी योजिले त्यांना, ह्या हक्कांना अतिशय प्रबळ आव्हानांना तोंड द्यावे लागते असे आढळून आले. ह्या बाबतीत भारताचा अनुभव वेगळा ठरेल असा फारसा संभव नाही. राजकीय लोकशाही नाकारून आर्थिक लोकशाही साधण्याच्या प्रयत्नाला अखेरीस प्रचंड अपयश पदरात घ्यावे लागेल; उलट, राजकीय लोकशाहीचा आर्थिक आणि सामाजिक क्षेत्रांत जर विस्तार करण्यात आला नाही तर तिला मान्यता मिळणे कठीण ठरेल.

आर्थिक लोकशाही आणि राजकीय लोकशाही ह्यांच्यांत करण्यात येणारा भेद पूर्णपणे कृत्रिम असतो असेच रॅडिकल ह्यूमॅनिस्ट नेहमी मानीत आले आहेत. आर्थिक लोकशाही नसेल तर राजकीय लोकशाहीला अर्थ रहात नाही; उलट राजकीय लोकशाही नसेल तर आर्थिक लोकशाही साधणे अशक्य ठरते. आपल्या समाजातील बहुजनांचे दारिद्र्य, वाढती बेकारी, वाढत्या किंमती आणि

त्यामुळे बहुसंख्य जनतेची होणारी उपासमार ह्या परिस्थितीच्या संदर्भात आर्थिक समस्यांबाबत सर्वांचे एकमत असल्याचा भास अनेकदा निर्माण होतो आणि ह्याचा परिणाम असा होतो, की प्रतिस्पर्धी पक्षांमध्ये सत्ता काबीज करण्यासाठी जो झगडा चालू असतो त्याला 'सत्तेसाठी उठलेली झुंबड' असे स्वरुप प्राप्त होते.

आजचा पेचप्रसंग मूलतः अशा सत्तेसाठी झालेल्या झुंबडीतून निर्माण झाला आहे. हा राजकीय पेचप्रसंग म्हणजे समाजात अधिक खोलवर रुजलेल्या व्याधीचे एक बाह्य लक्षण आहे आणि म्हणून सध्याची आणीबाणी उठविण्यात आली तरी ह्या स्वरुपाचे प्रसंग भविष्यात परत उद्‌भवणार नाहीत ह्याची शाश्वती नाही. रॅडिकल ह्यूमॅनिस्ट म्हणून आमचे मत असे आहे की आजची आणीबाणी उद्‌भवण्याची कारणे मूलतः अशी आहेत: (१) दारिद्र्याची समस्या आणि अधिकारवादी संस्कृतीची समस्या; (२) मानवी हक्क आणि स्वातंत्र्य प्रदान करीत असली तरी सत्तेचे अतिरिक्त केन्द्रीकरण होऊ नये ह्यासाठी आवश्यक असलेल्या संरक्षक तजविजींचा अभाव असलेली प्रचलित राजकीय यंत्रणा. मूलभूत स्वरूपाचे घटनात्मक हक्क, जर त्यांना टिकवून धरील अशी सांस्कृतिक परिस्थिती समाजात अस्तित्वात असेल तरच, शाबूत आणि सुरक्षित राहतात.

लोकशिक्षणाच्या मार्गाचा अवलंब करून समाजात अशी सांस्कृतिक परिस्थिती निर्माण करण्याच्या कार्याला आम्ही, रॅडिकल ह्यूमॅनिस्ट, वाहून घेऊ असे आम्ही ठरवीत आहोत. पण त्याबरोबरच आमचे असे ठाम मत आहे की आजची कृत्रिम परिस्थिती ताबडतोब दुरुस्त करण्यात आली पाहिजे. ह्यासाठी आणीबाणी उठविण्यात यावी, निवडणुका घेण्यात याव्या, जनतेचा निर्णय सर्व पक्षांनी न कुरकुरता मान्य करावा; सर्व राजकीय बंद्यांची सुटका करण्यात यावी आणि भाषणस्वातंत्र्य आणि अभिव्यक्तिस्वातंत्र्य यांच्यासह घटनेने हमी दिलेल्या सर्व मूलभूत हक्कांची पुनःस्थापना करण्यात यावी आणि न्यायसंस्थेच्या स्वातंत्र्याचा आदर करावा. ह्यामुळे निवडणुका मोकळ्या वातावरणात आणि निःपक्षपातीपणे होतील एवढेच नव्हे तर सत्तेचे परिणामकारक रीतीने विभाजन करून आपल्या बाल्यावस्थेत असलेल्या लोकशाहीचा पाया दृढ करण्याच्या कार्याला निवडणुकांनंतरचा काळ यशस्वीपणे कामी लावता येईल.

---

प्रा. गोवर्धन पारीख; अनु. बा. रं. सुंठणकर

# संक्रमणकालीन हिंदुस्थान : प्रस्तावना

[ मानवेंद्रनाथ रॉय यांनी लिहिलेल्या 'इंडिया इन ट्रॅंझिशन' या पुस्तकाचे भाषांतर इंडियन हिस्टॉरिकल रीसर्च असोसिएशनसाठी श्री. बा. रं. सुंठणकर यांनी करून दिले आहे. या पुस्तकाच्या नव्या आवृत्तीला प्रा. पारीख यांनी प्रस्तावना लिहिली आहे. या प्रस्तावनेचे श्री. सुंठणकर यांनी केलेले मराठी भाषांतर त्यांच्या अनुमतीने येथे दिले आहे. का. सं. ]

मानवेंद्रनाथ रॉय हे "लेनिन आणि स्टॅलिन यांच्या युगातील रशिया-बाहेरील साम्यवाद्यांपैकी सर्वात बहुरंगी" व्यक्तित्व असून ते हिंदी साम्यवादाचे संस्थापक म्हणून सर्वमान्य झाले आहेत. साम्यवादात त्यांचे परिवर्तन झाल्यानंतर त्यांनी लिहिलेले 'संक्रमणकालीन हिंदुस्थान' हे पहिले पुस्तक असून त्यात मार्क्सवादी दृष्टिकोनातून हिंदी परिस्थितीचे व्यापक विश्लेषण असल्यामुळे त्याचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. रॉय यांचे विचाराकडे जितके गाढ लक्ष होते तितकेच राजकारणाच्या व्यवहाराकडेही होते. 'संक्रमणकालीन हिंदुस्थान' या पुस्तकानंतर त्यांनी लिहिलेल्या 'आम्हाला काय हवे?' या छोट्या पुस्तकात त्यांनी आखलेला कार्यक्रम या विधानाला पुष्टीच देतो. या दुसऱ्या प्रकाशनाचाही या पुस्तकात समावेश करण्यात आला आहे.

ही दोन्ही पुस्तके १९२२ साली प्रसिद्ध झाली. 'संक्रमणकालीन हिंदुस्थान' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत रॉय यांनी त्यांच्या या दुसऱ्या पुस्तकात राजकारणाचे व्यावहारिक प्रश्न आणि कार्यक्रमाची आणखी याचे विवेचन असल्याचा उल्लेख केला आहे. ही दोन्ही पुस्तके जे. बी. टार्गेट, जिनिव्हा या एकाच नावाने प्रसिद्ध झाली होती. त्यांची इंग्लिश आवृत्ती ही मुख्यत्वेकरून हिंदुस्थानात प्रचार करण्याकरिता होती आणि म्हणून जिनिव्हाच्या काल्पनिक प्रकाशकाचे नाव घालणे त्यांना भाग पडले. पण हे पुस्तक बर्लिनमध्ये छापण्यात आले होते. या पुस्तकांच्या अनेक प्रती टपालाने हिंदुस्थानातील निवडक मंडळींकडे व्यक्तिशः पाठविण्यात आल्या होत्या. त्यापैकी काही थोड्या त्यांना पोहोचल्या. लवकरच त्या पुस्तकावर सी कस्टम्स अॅक्टखाली बंदी घालण्यात आली. 'संक्रमणकालीन हिंदुस्थान'चे रशियन भाषांतर मास्को येथे प्रसिद्ध झाले. एक लाख प्रतींची जर्मन आवृत्ती एका वर्षातच खपून गेली. इतर युरोपीयन भाषांतही या पुस्तकाची भाषांतरे झाली होती. हिंदी परिस्थितीचे वास्तववादी चित्र युरोपातील विद्वत्तापूर्ण जगापुढे मांडण्याच्या कामी या पुस्तकाचे खूपच साहाय्य झाले.

रॉय यांनी हे पुस्तक मार्च १९२२ मध्ये पुरे केले. त्यात लेखकाच्या गाढ बौद्धिक कर्तृत्वाची स्पष्ट साक्ष मिळते. रॉय यांचे प्रारंभीचे स्पॅनिश भाषेतील लिखाण, त्याचप्रमाणे १९१६ ते १८ च्या दरम्यान मेक्सिको येथे प्रसिद्ध झालेले 'ला इंडिया' हे मोठे पुस्तक, यात बव्हंशी प्रखर राष्ट्राभिमान प्रकट होतो. 'क्रांती आणि अराजकतावाद यांचे संयुक्तीकरण' आणि 'हिंदुस्थानचे मार्क्सवादी विश्लेषण' यामधील खूपच अंतर अद्याप चालून जावयाचे होते. पण रॉय यांनी चार-पाच वर्षातच ही मजल मारली. मार्क्सवादी पद्धतीतील विरळा प्राविण्य आणि हिंदी परिस्थितीचे यथार्थ ज्ञान यांच्या जोरावर खुद्द महान लेनिनबरोबर देखील १९२० मध्ये ते मतभेद व्यक्त करू शकले.

नरेंद्रनाथ भट्टाचार्य यांचा जन्म चोवीस परगण्यातील अरबेलिया या खेड्यात एका पुरोहित

अनुक्रमणिका

घराण्यात झाला. विद्यार्थी दशेतच ते बंगालमधील क्रांतिकारी चळवळीत सामील झाले. थोड्याच दिवसात एक शूर क्रांतिकारक म्हणून ते पुढे आले आणि पहिल्या महायुद्धाला सुरुवात झाल्यानंतर परकीय राज्य उलथून पाडण्याकरिता जर्मनीकडून शस्त्रास्त्रे मिळविण्याकरिता त्यांना देशाच्या बाहेर पाठविण्यात आले. या कार्याकरिता ते देशोदेशी भटकले आणि शेवटी अमेरिकेत पोचले. अमेरिकेने युद्धात प्रवेश केल्यानंतर त्यांना पकडण्यात आले. अमेरिकेत नरेंद्राचे मानवेन्द्रनाथ रॉय झाले आणि जामिनावर सुटले असताना ते मेक्सिकोत पळून गेले. मेक्सिकोत असताना लढाऊ राष्ट्रवादातून ते फुटून निघाले आणि मार्क्सवादात त्यांचे मतपरिवर्तन झाले. मेक्सिकोत मायकेल बोरोडीन यांच्याशी त्यांची गाठ पडली आणि पुढे लेनिनकडून सोव्हिएट रशियात येण्याचे आमंत्रण त्यांना मिळाले. बोरोडीनच्या सहाय्याने कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या दुसऱ्या जागतिक काँग्रेसला (१९ जुलै ते ७ ऑगस्ट, १९२०) हजर रहाण्याकरिता ते सोव्हिएट युनियनमध्ये दाखल झाले.

ही दुसरी जागतिक काँग्रेस क्रांतिकारी उत्साहाच्या वातावरणात भरली होती. कम्युनिस्ट इंटरनॅशनल त्यावेळी लढाऊ वृत्तीत होती. त्यामुळे ती अतिशय केंद्रित संघटना व्हावयाची होती. ती ‘अखिल जगाची एकमेव कम्युनिस्ट पक्ष’ व्हावयाची होती आणि तिला राष्ट्रीय शाखा जोडण्यात यावयाच्या होत्या. तिचे उद्दिष्ट आंतरराष्ट्रीय भांडवलदार वर्गाला उलथून टाकून आंतरराष्ट्रीय सोव्हिएट गणराज्य निर्माण करण्याकरिता सशस्त्र लढ्यासह सर्व उपलब्ध साधनांनिशी लढणे हे होते. याच दुसऱ्या काँग्रेसमध्ये रॉय यांचे लेनिनशी मतभेद झाले. हे मतभेद वासाहतिक देशामध्ये राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यातील भांडवलदार वर्गाची भूमिका आणि त्या लढ्याला चालना देण्याकरिता खेळावयाचे डावपेच यासंबंधी होते. तिसरी जागतिक काँग्रेस (२२ जून ते १२ जुलै, १९२१) भरण्याच्या वेळेपर्यंत युरोपमध्ये नव्या प्रदेशात क्रांती पसरण्याचे भवितव्य जवळजवळ संपुष्टात आले होते. म्हणून नवीन परिस्थितीला जुळवून घेणे आवश्यक होते. लेनिनच्या शब्दात कॉमिन्टर्नला चढाई करण्याचा पवित्रा टाकून वेढा घालण्याच्या पवित्र्याकडे वळण भाग पडले. तिसऱ्या आणि चौथ्या जागतिक काँग्रेसच्या दरम्यान ‘संक्रमणकालीन हिंदुस्थान’ हे पुस्तक लिहिले गेले.

‘हिंदी क्रांतीचे स्वरूप आणि भवितव्य’ यासंबंधीच्या आपल्या मताला पुष्टी देण्याकरिता रॉय यांनी ‘सद्यःकालीन हिंदुस्थानातील वर्गसंबंध आणि त्याच्या राष्ट्रीय अर्थव्यवस्थेची रचना’ यासंबंधी जो अहवाल तयार केला होता, त्यातून या पुस्तकाचा जन्म झाला. रॉय यांच्या शब्दात या अहवालाचे स्वरूप सारांशाने असे सांगता येईल : बोल्शेविकांमध्ये प्रचलित असलेल्या कल्पनेच्याविरुद्ध सद्यःकालीन हिंदुस्थानातील प्रमुख सामाजिक घटक सरंजामशाही हा नव्हे. म्हणून राष्ट्रीय भांडवलदार वर्गाला क्रांतिकारक शक्ती म्हणून मानणे हे योग्य नव्हे. मुळात जरी चिचेरिन याने हा अहवाल लिहिण्याकरिता मला विचारले, तरी माझ्या मताची अचूकता लेनिनला पटविण्याकरिता मी तो लिहिला. वासाहतिक अर्थकारणाची प्रवृत्ती सरंजामी संबंधाना चेतना देण्याची असली, तरी एतद्देशीय भांडवलशाहीची वाढ ते सर्वथा थोपवून धरू शकले नाहीत आणि परिणामतः एक महत्त्वाकांक्षी वर्ग म्हणून भांडवलदार वर्गाचा उदय झाला; या गोष्टीवर त्या अहवालात भर देण्यात आला आहे. स्थापित व्यवस्था काही प्रमाणात त्याच्या महत्वाकांक्षेत अडथळा आणीत होती. पण त्याबरोबरच त्या भांडवलदार वर्गाचे हितसंबंध स्थापित सत्तेत गुंतले होते आणि म्हणून ती सत्ता उलथून टाकण्याच्या कामी ते क्रांतीचे नेतृत्व करू शकत नाहीत ... लेनिनने तो अहवाल काळजीपूर्वक वाचला आणि सत्य स्थितीचे इच्छानुसारी स्पष्टीकरण करण्याविरुद्ध इशारा देऊन माझा अहवाल पुस्तकरुपाने विस्ताराने मांडण्याचा सल्ला मला दिला. सद्यःकालीन हिंदी समाजाचे वास्तववादी चित्र देऊन हिंदी क्रांतीचे यथार्थ दृश्य मांडावे असेही मला सांगण्यात आले’.

(मेमॉयर्स पाने ५५१–५५२).

या पुस्तकाच्या मुख्य सिद्धांताची रूपरेषा अशाप्रकारे खुद्द त्या अहवालात देण्यात आली होती. तो विशद करणे आणि त्यातील विश्लेषणाला आवश्यक त्या आकडेवारीच्या माहितीचा आधार शोधणे

अनुक्रमणिका

अवश्य होते. आकडेवारी गोळा करून तिचे एकत्रीकरण करण्याचे काम अबनी मुखर्जी याच्याकडे सोपविण्यात आले होते. रॉय आपल्या आठवणीत म्हणतात, 'अबनी मुखर्जी यांनी गोळा केलेल्या सांख्यिकीय सामग्रीच्या आधारावर पूर्णतः अवलंबून या पुस्तकाचे पहिले प्रकरण लिहिण्यात आले होते. पुस्तक संपविण्याच्या घाईमध्ये त्याने तयार केलेल्या, माहितीची अचूकता मी पडताळून पाहिली नाही. मुखर्जीने अत्युत्साहाने 'हिंदुस्थानला कामगार क्रांतीच्या प्रसववेदना सुरू झाल्या आहेत आणि म्हणून जर्मनी किंवा ब्रिटन प्रमाणेच कम्युनिस्ट इंटरनॅशनलमध्ये हिंदुस्थानला स्थान मिळाले पाहिजे हे सिद्ध करण्याकरिता ' आकडेवारीत घालमेल केली आणि हिंदुस्थानच्या भांडवलशाहीचे, विशाल चित्र उभे करण्याच्या भरीला तो पडला (मेमॉयर्स पाने ५५३ ते ५५४). तथापि ही जबाबदारी पत्करून रॉय सांगतात : 'ती आकडेवारी वापरण्यापूर्वी मी तपासून पहायला हवी होती'. तथापि त्यामुळे पुस्तकाच्या मुख्य विवेचनाला विशेषशी बाधा येत नाही.

पुस्तकातील हा दोष पुढे आढळून आला. मध्यंतरीच्या काळात रॉय यांनी उदार मनाने अबनी मुखर्जीचे नाव सहकारी लेखक म्हणून सुचविले. पण कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या प्रकाशन विभागाने ही सूचना फेटाळून लावली. पण अखेरीस मुखर्जीने केलेल्या सहाय्याला सार्वजनिक मान्यता देण्याचा आग्रह रॉय यांनी धरल्यामुळे 'अबनी मुखर्जी यांच्या सहकार्याने' असे शब्द घालण्यात आले. या वर्णनाने मुखर्जीचे समाधान झाले नाही आणि पुस्तकाचे आपणच लेखक आहोत असा दावा तो मांडू लागला. पण सविस्तर चौकशीनंतर हा दावा खोटा असल्याचे ठरले. 'चौकशी करण्याच्या उपचाराने हा विषय येथेच संपला आणि त्यांच्या समाधानाकरिता त्याने दुसरे पुस्तक लिहावे असे त्याला सांगण्यात आले. पण असे पुस्तक त्याने लिहिले नाही किंवा तो लिहूही शकला नसता.' (कित्ता पान ५५४).

ग्रंथकर्तृत्वाचा प्रश्न एकवेळ बाजूला सारला, तरी या पुस्तकाला मुखर्जीने विशेष महत्त्वाचा हातभार लावला होता असे म्हणणे हे शुद्ध वेडगळपणाचे होईल. रॉय यांच्या विरोधकांच्या मनातसुद्धा हा विचार आला नाही. या सर्व प्रकरणात मुखर्जीची भूमिका कारस्थानी आणि संशयास्पद आहे. १९२० साली बर्लिनमध्ये त्याची रॉय यांच्याशी डॉ. शहीर या नावाने भेट झाली होती. त्याने काहीही लिहिलेले नाही. याला एकमेव अपवाद म्हणजे ओव्हरस्ट्रीट आणि विडमिलर यांनी 'कम्युनिझम इन इंडिया' या त्यांच्या पुस्तकात (पृष्ठ ६३) उल्लेखिलेला प्रसंग होय. फेब्रुवारी, १९२३ मध्ये रॉय यांच्या सूचनेवरून हिंदुस्थानातील सर्व साम्यवाद्यांना एकत्र गोळा करून अखिल हिंदुस्थानची एक संघटना उभी करण्याकरिता अखिल भारतीय परिषदेची तयारी करण्याच्या हेतूने सिंगारवेलू यांनी एक जाहीरनामा काढला होता. जेव्हा मणिलाल शहा याला हा जाहीरनामा मिळाला, तेव्हा तो आणि अबनी मुखर्जी यांनी त्यात काही सुधारणा करून मार्चमध्ये स्वतःचा जाहीरनामा म्हणून तो प्रसिद्ध केला. हे त्यांचे चौर्यकर्म रॉयपर्यंत पोचले आणि त्यांनी त्याचा बनावट म्हणून निषेध केला. एकदा तर काही हिंदी क्रांतिकारकांनी त्याच्यावर हेरगिरीचा संशय घेतला होता. सोव्हिएट गुप्त पोलिसांनादेखील त्याच्या मास्कोमधील संचाराबद्दल संशय आला होता. कानपूर कटाच्या केसमध्ये त्याच्यावर आरोप ठेवला होता हेही आश्चर्यकारक होते. कारण तो मास्कोला परत जाईल आणि तेथे रॉय यांना उपद्रव देण्याला कारणीभूत' होईल अशी ब्रिटिश हेरखात्याची अपेक्षा होती. मुखर्जीच्या चरित्रात तेथे शिरण्याची गरज नाही. एवढेच सांगितले की पुरे होईल की, त्यानी गोळा केलेल्या तक्त्यावरून आकडेवारीच्या माहितीचा गोषवारा तयार करण्यास त्याला सांगण्यात आले. याचे कारण तो दुसऱ्या कोणत्याही कामात गुंतला नव्हता हेच होते. त्याच्या हालचाली संशयास्पद होत्या असेच म्हणणे योग्य दिसते. एक जुना सहकारी म्हणून रॉय त्याच्याशी उदारपणे वागले. रॉय यांना जे ओळखतात त्यांना त्यांच्याबाबतीत हे साहजिकच वाटेल आणि त्या सर्व प्रकारात जो थारेपालट त्याने रॉय यांच्याबाबतीत केल्याचे सांगतात तो कदाचित आपल्या 'शहीर' या नावाचे समर्थन करण्याकरिता मुद्दामच केला असावा असे दिसते.








दुसऱ्या जागतिक काँग्रेसनंतर रॉय यांच्या प्रयत्नामुळे हिंदुस्थानातील निरनिराळ्या भागातील साम्यवादी गटाना मूर्त स्वरूप आले. ज्यावेळी या सर्व गटाना एका अखिल हिंदी पक्षात एकत्र आणण्याची शक्यता ठळकपणे दिसून आली त्यावेळी 'संक्रमणकालीन हिंदुस्थान' हे पुस्तक लिहिले गेले. चौथ्या काँग्रेसमध्ये कॉमिन्टर्नचे त्यावेळचे अध्यक्ष झिनोव्हिव तसेच कार्ल रेडेक यांनी या पुस्तकाची प्रशंसा केली. झिनोव्हिव याने त्यातील निष्कर्ष बहुमोलाचे आहेत असे सांगितले, तर या पुस्तकाचा खास उल्लेख करून रेडेक म्हणाला : 'कॉमरेड रॉय यांनी या प्रशंसनीय ग्रंथात आणि त्यांच्या मुखपत्रातही हिंदी परिस्थितीचे मार्क्सवादी विवरण करून गेल्या वर्षी मोठे यश संपादन केले' आहे. तरीही पण रॉय यांचे विवेचन सर्वथा दोषमुक्त आहे असे नाही. पहिल्या प्रकरणातच रॉय यांच्या ते निदर्शनास आले होते. इतरांच्याही ते लक्षात येते. उदाहरणार्थ, गांधीवादाच्या संभाव्यतांचे त्यांनी केलेले मूल्यमापन. रॉय हे कित्येक वर्षे स्वदेशापासून दूर होते आणि या काळात त्यांना मिळालेली माहिती ही क्वचितच पुरेशी आणि समाधानकारक असे. इतके असूनही या पुस्तकातील विश्लेषण हे कौतुकास्पद असून त्यातून क्रांतिकारकांना शिक्षण आणि स्फूर्ती मिळाली आहे.

हे पुस्तक ज्यावेळी लिहिले गेले त्यावेळी कार्ल मार्क्सने गेल्या शतकाच्या मध्यात न्यूयॉर्कच्या 'हेरल्ड ट्रिब्युन'करिता लिहिलेली हिंदुस्थानविषयक पत्रे अद्याप एकत्रितपणे प्रसिद्ध झाली नव्हती. हे पुस्तक लिहिले त्यावेळी रॉय यांना त्या पत्रांचा परिचय नव्हता आणि तरीही सत्तर वर्षांचा काळ ओलांडल्यावरही हिंदी स्थितीबद्दलचा रॉय यांचा दृष्टिकोन मार्क्स याच्या विचारसंगतीशी अनेक मुद्यांवर जुळून येतो. या पुस्तकाच्या वाचकाना ८ ऑगस्ट, १८५३ रोजी 'हिंदुस्थानातील ब्रिटिश राज्याचे भावी परिणाम' या मथळ्याखालील पत्र हे विशेष लक्षणीय वाटेल.

मार्क्सच्या मताप्रमाणे हिंदुस्थानात इंग्लंडला दुहेरी कार्य पार पाडावयाचे होते. एक विध्वंसक आणि दुसरे नवनिर्मितीचे– जुन्या आशियायी समाजाचा विध्वंस करणे आणि तेथे पश्चिमी समाजाचा भौतिक पाया घालणे. मार्क्स सरंजामशाहीच्या पौर्वात्य स्वरूपातील जो आशियायी समाज नष्ट होत असताना पहात होता, त्याचेच वर्णन रॉय यांनी तो प्रत्यक्षात नष्ट झाला असे केले. मार्क्सच्या दृष्टोत्पत्तीस आल्याप्रमाणे रेल्वे ही हिंदुस्थानात आधुनिक उद्योगाची अग्रदूत ठरली. रेल्वेचा प्रारंभ हेच हिंदुस्थानचे एका उत्पादक देशात परिवर्तन करण्याचे ब्रिटिश भांडवलाचे अत्यंत महत्वाचे कार्य सिद्धीस जात असल्याचे लक्षण होते. मार्क्स आणि रॉय या दोघांचीही वृत्ती प्रत्यक्षपणे वा अप्रत्यक्षपणे हिंदुस्थानच्या पराभवाची कारणे जाणून घेण्याकरिता उत्सुक असलेल्या विचारवंतांची होती हे दिसून येते.

रॉय लिहितात : 'हिंदुस्थानात सरंजामी पद्धती नाही हे मत सर्वसाधारण कल्पनेच्या विरुद्ध आहे'. दुसऱ्या एके ठिकाणी ते आपणास सांगतात त्याप्रमाणे ही 'सर्वसाधारणकल्पना' बोल्शेविकामध्ये मोठ्या प्रमाणात प्रचलित होती. तथापि हिंदुस्थान हा भांडवलशाही देशही नव्हता. रॉय ब्रिटिशानी निर्माण केलेल्या किंवा चालू दिलेल्या सरंजामी घटकांचे अस्तित्व अमान्य करीत नाहीत. पण सामान्यतः हा देश भांडवलशाही पद्धतीच्या कक्षेत ओढला गेला असून बव्हंशी तो सरंजामी राहिला नव्हता. परंतु अद्याप तो भांडवलशाहीही झाला नव्हता. याचे स्पष्टीकरण 'संक्रमणकालीन हिंदुस्थान' या मथळ्यात सापडते.

या पुस्तकात तर्कसंगत पद्धतीने केलेल्या प्रतिपादनाचे सार सांगणे सोपे नाही किंवा येथे ते सांगण्याची गरजही नाही. पण रॉय यांनी सांगितलेले काही महत्वाचे मुद्दे शक्यतो त्यांच्याच शब्दात थोडक्यात दर्शविता येतील. त्यापेक्षा अधिक चांगल्यारीतीने ते सांगता येणार नाहीत. हिंदी भांडवलशाही वर्ग हा आता 'राजकीय वा शासकीय पोकळ विशेषाधिकारा'नी संतुष्ट न होण्याइतका बलवान झाला आहे असे सांगण्यात येते. तो आर्थिक सवलती मागत आहे. तो जरी बंड करू शकला नाही तरी निदान प्रतिकार करील आणि ब्रिटिशाना त्याला आपल्या बाजूला वळवून घ्यावे लागेल. कारण ते त्याला दडपून टाकू शकत नाहीत किंवा त्यांची उपेक्षाही करू शकत नाहीत. त्या वर्गाला आपल्या दुबळेपणाची जाणीव आहे. म्हणून सवलती

मिळविणे, सरकारला पाठिंबा देणे आणि त्यायोगे आपला विकास करून घेणे हे त्याचे डावपेच आहेत.

ग्रामीण भागाकडे वळून पहाता रॉय यांनी शेती ही भांडवलशाही पिळवणुकीच्या क्षेत्रात कशी ओढली गेली आहे हे दाखवून दिले आहे. व्यापाऱ्यांनी शेतकऱ्याला मागे टाकले आहे आणि तोच आता ग्रामीण भागाचे केंद्र बनलेला दिसतो. तो निर्यातीकरिता कच्चा माल गोळा करतो आणि परदेशी बनावटीचा माल ग्रामीण लोकाना विकतो. रॉय यांनी हेही दाखवून दिले आहे की, कारागीर वर्गाचा नाश झाला, तो देशातील त्या उद्योगातील स्पर्धेमुळे झाला नसून परदेशातून होणाऱ्या स्वस्त आयात मालामुळे झाला. याचा परिणाम म्हणून कारागिराना शेतीकडे जाणे भाग पडले आणि तेणेकरून शेतकरी मजुरांच्या समुदायात भर पडली. "ब्रिटिशानी महसूल वसूल करणारा जमीनदारांचा एक नवा वर्ग निर्माण केला. मुळात हा वर्ग व्याजखोर, व्यापारी आणि जमिनीवर सट्टेबाजी करणारा असल्यामुळे नव्या जमीनदार वर्गाचा हा घटक परकीय राज्याचा सामाजिक पाया म्हणून मानता येतो."

रॉय क्रांतीची बाजू या देशातील मोठ्या लोकसंख्येच्या संदर्भात मांडतात हे लक्षणीय होय. ते सांगतात की, लोकसंख्येचा आकार इतका मोठा आहे की, आधुनिक उद्योग जरी शंभरपटीने वाढले तरी सुद्धा शेतीमध्ये श्रम वाचविणारी यंत्रे वापरली तर सर्व बेकारांना सामावून घेणे अशक्य होईल. वस्तुतः उद्योगधंद्यांच्या वाढीमुळेच कारागिरांचा एक मोठा वर्ग बेकार होईल. म्हणून 'राष्ट्रीय अर्थव्यवस्थेची आमूलाग्र पुनर्जुळणी केल्याशिवाय परिस्थितीत सुधारणा होऊ शकणार नाही. समाजाचे नुसते वरचे मंदिरच नव्हे तर सामाजिक अर्थव्यवस्थेचा पायाच बदलण्याकरिता क्रांती झाली पाहिजे.'

ब्रिटन आणि हिंदुस्थान यांच्यातील आर्थिक संबंध १८ व्या शतकाच्या आरंभी जसे होते तसे ते आज नाहीत. या गोष्टीची योग्य दखल रॉय घेतात. आरंभी युरोपीय व्यापारी जे आकर्षिले गेले, ते कच्च्या मालामुळे नव्हे; तर येथे तयार होणाऱ्या पक्क्या मालामुळे होय. पण ब्रिटिशानी हा देश जिंकल्यानंतर स्थिती बदलली. परकीय भांडवलदारांच्या हिताकरिता कच्च्या मालाचा पुरवठा करणारा देश म्हणून हिंदुस्थान ताब्यात ठेवणे आवश्यक झाले. "भांडवलदारी उत्पादनाचा परिणाम म्हणून आज ग्रेट ब्रिटन जसे बनले आहे, त्याच धर्तीवर आजचा हिंदुस्थान भांडवलशाही पिळवणुकीमुळे बनला आहे. भांडवलशाहीमुळे ब्रिटिश बेटातील शहरात ६० टक्के लोकसंख्या केंद्रित झाली आहे तर त्याच भांडवलशाहीमुळे हिंदुस्थानातील ७५ टक्के लोकसंख्या जमिनीकडे हाकलण्यात आली आहे." ब्रिटिशांनी हिंदुस्थानापासून यंत्र दूर ठेवले, पण त्याच्या विध्वंसक परिणामापासून त्याला दूर ठेवता आले नाही. हे विध्वंसक परिणाम हिंदुस्थानला पूर्णतः जाणवत होते.

साम्राज्यशाही भांडवलाने हिंदुस्थानातील ज्या वर्गाचे कामगारीकरण केले आहे, तो वर्ग नष्ट झालेल्या कारागीर वर्गातून फारसा आला नव्हता. तर बौद्धिक कामगारांचा तो लहानसा वर्ग होता. त्याची श्रमशक्ती मानसिक असण्यापेक्षा अधिक प्रमाणात शारीरिक होती. त्याच्यापाशी बौद्धिक सामग्री असायलाच हवी होती असे नव्हे. तर केवळ वाचणे, लिहिणे आणि मोजणे या पात्रतेची गरज होती. कारागीर शेतीवर हाकलले गेल्यामुळे यंत्रोत्पादनाचा सामाजिक आविष्कार शहरी कामगार वर्गाच्या स्वरुपात प्रकट झाला नाही, तर शेतमजुरांचा आणि दरिद्री शेतकऱ्यांचा विराट समुदाय अशा स्वरुपात प्रगट झाला. कामगारीकरणाची ही प्रक्रिया विस्तृत होती, पण सधन नव्हती. अगदी प्रारंभीचे उद्योग खाणकाम आणि परिवहन हे असल्यामुळे त्यात गुंतलेले कामगार शहरात केंद्रित झाले नव्हते. सामाजिक समतोल ढळला आणि जातिपद्धतीचा आर्थिक पाया उध्वस्त झाला. ज्यावेळी कसबी कामगार आयात करता येत नव्हते आणि ब्रिटिश लोक उपभोग्य मालाचा पुरवठा हिंदी बाजारपेठेला करू शकत नव्हते, त्याच वेळी केवळ हिंदी भांडवलदार वर्ग वाढू लागला आणि हिंदुस्थानचा यंत्राशी संबंध येऊ लागला. १८८० पर्यन्त हिंदुस्थानचा औद्योगिक युगात प्रवेश झाला नव्हता आणि खरेखुरे औद्योगीकरण बऱ्याच उशीरा सुरू झाले, म्हणून रॉय म्हणतात :

" हिंदी भांडवलदार वर्गाची जलद वाढ होऊन-सुद्धा तो दुबळा आणि उद्दिष्टाबाबत अनिश्चित आहे. पण कामगारासमोर झगड्याशिवाय दुसरे काहीही नाही. त्याला शृंखलाशिवाय दुसरे काहीही गमवायचे नसल्यामुळे अंतिमतः त्याच्यावरच राष्ट्रीय स्वातंत्र्य अवलंबून आहे. परंतु राष्ट्रीय स्वातंत्र्य जर आपल्याबरोबर आर्थिक आणि सामाजिक स्वातंत्र्य आणणार नसेल तर राष्ट्रीय स्वातंत्र्य हे निरर्थक ठरेल. हिंदुस्थानचे राष्ट्रीय स्वातंत्र्य हे एका फार मोठ्या घटनेची केवळ नांदी आहे. ही गोष्ट म्हणजे कामगार वर्गाची सामाजिक मुक्तता होय. राष्ट्रीय झगडा आणि वर्गझगडा हे बरोबरीने चालू आहेत. राष्ट्रीय झगड्याच्या गदारोळात वर्गझगड्याचे अस्तित्व लपून राहू शकत नाही."

या पार्श्वभूमीवर राष्ट्रीय चळवळीचे विश्लेषण करून रॉय यांनी हिंदी राष्ट्रीय सभेच्या उदयाचा संबंध एतद्देशीय भांडवलशाही विकासाच्या प्रारंभाशी जोडला. नेमस्तांचा उल्लेख हिंदी भांडवलदारांचे प्रवक्ते असा ते करतात. तरीही पण त्यांच्यापैकी कित्येकांपाशी प्रगत सामाजिक मते होती हे ते मान्य करतात. याउलट जहालानी इतिहासाकडे मागे पहाण्याची वृत्ती स्वीकारली आणि ती दीर्घ-काळपर्यंत काँग्रेसमध्ये अस्तित्वात राहिली. गांधी-वादाचे वर्णन रॉय " छोटया मध्यम वर्गांचा भूत-दयावाद आणि तोही मानवी प्रगतीच्या अडखळत चाललेल्या शक्तींच्या संघर्षात निराशपणे भांबावून गेलेला " असे करतात. प्रतिगमनाला त्याने केलेले सहाय्य हे अनैच्छिक होते. पण गांधीवादाचा त्याच्या अंतर्विरोधांच्याच ओझ्याखाली पराभव होणे क्रम-प्राप्त होते.

हे विश्लेषण आता ऐतिहासिकदृष्टचा उद्बोधक आहे हे उघड आहे. पण त्याच्याशी तुलना करता येण्याजोगे गेल्या ५० वर्षात साम्यवादाने काहीही महत्वाचे असे निर्माण केले नाही याचा निर्देश करणे अवश्य आहे. सामाजिक क्रांतीकरिता घ्यावयाच्या पावित्र्याला समाजाच्या ऐतिहासिक आणि सद्यः-कालीन चौकटीत समाजस्थितीच्या अधिक खोल आणि व्यापक विश्लेषणाचा आधार घेणे अवश्य आहे. या कल्पनेतही आता आकर्षण राहिल्याचे दिसून येत नाही. रॉय यांच्या या ग्रंथाला अनेक कारणामुळे विशेष महत्त्व आहे. मार्क्सवादी दृष्टिकोणातून केलेले हिंदी स्थितीचे हे पहिले विश्लेषण होते आणि मार्क्सवादी पद्धतीत पूर्णपणे पारंगत असलेल्या आणि हिंदी वस्तुस्थितीसंबंधी विलक्षण सूक्ष्मदृष्टी असलेल्या व्यक्तीने केलेले हे विश्लेषण आहे. त्यामुळे या पुस्तकाची योग्यता फार मोठी आहे. या ग्रंथाचा लेखक कालौघाबरोबर मार्क्सवादी सिद्धांताच्या मर्यादा ओलांडून पुढे गेला. विरोधाच्या किंवा द्वेषाच्या निष्फळ वृत्तीत अडकून न पडता तो सृजनशील तळमळीने नवे मार्ग चोखाळू लागला. रॉय यांच्या विचारांचा विकास हेच मुळी सद्यःकालीन हिंदी इतिहासातील एक प्रकरण आहे. या प्रकरणात प्रचंड बौद्धिक आस्था आणि मानवी अर्थवत्ता भरली आहे. 'संक्रमण-कालीन हिंदुस्थाना'त त्याचे आरंभीचे दर्शन घडते.



अनुक्रमणिका

# पारीख –सूची ( ग्रंथ, लेख, भाषणे )

[ पारीख ह्यांच्या लेखनाची, भाषणांची सूची येथे दिली आहे. ती अर्थातच अगदी परिपूर्ण नाही. लेख / भाषणांची वर्षे आदी तपशीलही सर्वत्र देता येणे अनेक अडचणींमुळे शक्य झालेले नाही. का. सं. ]

---

### ग्रंथ

1) *People's Plan of Economic Development* in collaboration with V. M. Tarkunde, B. N. Banerji 1944, Indian Federation of Labour.
2) *Alphabet of Fascist Economics*, M. N. Roy and G D. Parikh, 1945, Renaissance Publishers, Calcutta.
3) *General Education and Indian Universities*, 1958, Asia Publishing House, Bombay.

१) **महात्मा गांधी**, १९४९ प्रतिभा प्रकाशन.
२) **राष्ट्रवादाचे शिल्पकार : बाळ गंगाधर टिळक** १९६९, मौज प्रकाशन, मुंबई.
३) **लोकहितवादी– गोपाळराव हरि देशमुख** १९७०, मौज प्रकाशन, मुंबई.

### अनुवादित ग्रंथ

1) *Critic of Hinduism* (translation of **हिंदू धर्माची समीक्षा** Shri Laxmanshastri Joshi's) Pradnya Pathashala, Wai.
२) **नव मानवतावाद** ( translation of *New Humanism* by M. N. Roy pradnya pathashala, Wai.
३) **मानवाचा आदर्श** (translation of 'In Man's Own Image' by Ellen Roy and Shibnarayan Roy).

### शिक्षण विषयक लेख/भाषणे (इंग्रजी)

1) *The Problem of Brain Drain.*
2) *Indian University – A Search for Roofs.*
3) *University of Bombay.*
4) *Correspondence Courses and Higher Education.*
5) *Student Participation in the Governance of Universities, Indian–A Case Study.*
6) *Philip G. Altbach – Bombay Colleges–A Comment.*
7) *A note on Higher Secondary Education.*
8) *Speech of the Jt. Session of Maharashtra and Gujarat Federation of Heads of Secondary Schools–Silver Jubilee.*
9) *The Student Problems in India.*
10) *The University, Government and Society*–Quest, May–June 1976.
11) *Notes on different subjects prepared for University while.*
12) *University, Finance, Problems and Procedures.*
13) *Speech–All India Secondary Teachers' Federation–Presidential Address–27-12-68.*
14) *Speech – Bombay North and Subarban Secondary Teachers' Association – Presidential Address.*
15) *University and Public Service*-S. I. E. S. 1969 Annual.
16) *A note on Reorganisation of the Undergraduate teaching in Arts–25-9-61.*

अनुक्रमणिका

17) *Some Aspects of University Finance* – Quest, Jan.–March 1970
18) *Higher Education & Economic Developments* – Quest Special, March 1967
19) *Education and Economic Development* –Gurunath Ogale Memorial Lecture– 16-10-66.
20) *Examinations – Thoughts on Indian Education.*
21) *Why General Education ?* The Journal of General Education Vo. I No. 3, July 1963.
22) *What shall it be English or Hindi ?* Bharat Jyoti 11-4-54.
23) *Problems of Educational Reforms* I & II– Thought, Feb. 20 & March 6, 1954.
24) *Outline of the Scheme of the Institute of Human Culture and the Bharat Sevak Academy.*
25) *Objectionable Nonsense on Regulation and Co-ordination of the Standards of University Education* –Bill in the parliament.
26) *Note on Medium of Instruction in the University of Bombay,* June 1952.
27) *The School and the College*
28) Inaugural Address– *Education and training in Personnel Management* ( In National Conference of Indian Institute of Personnal Management, 1974)
29) Speech at the time of opening of Bajaj Institute of Management – 1964
30) *Education in Maharashtra*
31) *Academic Freedom, University Autonomy*
32) *Vocational Guidance* – Speech at Rotary meeting –The Gateway Vol. 5 No. 49, 1-1-65
33) Talk on Impact of organised Education– *on the individual and society,* 13-8-67
34) *University Education and National Integration* – Kesari, Maratha Pune, 1962, Annual Number.
35) Presidential Address–All India Educational ConferenceSection –*University Education* 1960 – Kanpur.
36) A talk *on changing pattern of University Education* – Guild of Ismaili Graduates –19-3-63
37) *The University in a Developing Society.*
38) *On Academic Freedom – Freedom First* – March 1953.
39) *University Administration* – Akashwani – 6-11-1960.
40) *Education and the Third Five Year Plan* – Yojana – 2-10-60
41) *Some Problems of University Education.*
42) *Rector's Note on Campus Development.*

**अन्य विषयांवरील लेख/भाषणे**

1) *Economic Progress of Under Developed Countries and the Rivalry between Domocratic &*

*Totalitarian Methods.*
(Milan Conference)
2) *The Basic Fallacy*
3) *Economic Planning in India*
4) *The Problems of Unemployment*
5) *Planning and Freedom : the Indian Experiment*
6) *Indian Economy at Cross Roads*
7) *The Economic Problem*
8) *The Economic Policy*
9) *IFL Memorandum – Fair Relation between Capital and Labour Share of Surplus Profit.*
10) *Search Light on the Bombay Plan*
11) *Professor Harold Laski*
12) *Democracy is not mere rule by majority*
13) *Communism and the World Crisis* – 26-8-67
14) *Political Planning* – 30-8 47
15) *The Problem of Partyless Politics*
16) *Social Questions in the under developed countries IHEU*
17) *Communal Problems*
18) *Speech at 2nd Dehradun Camp*
19) *Nagin Parekh*
20) Introduction to Memoirs of M. N. Roy
21) Introduction of 2nd edition of 'Indian in Transition' by M.N. Roy
22) *Sardar Vallabhbhai Patel* (Illustrated Weekly)
23) *Some thoughts on the Problem of National Integration* 1962 Ahmedabad
24) *Bal Gangadhar Tilak* 1972 – Humanist Review
25) *Planning and Freedom* – 31-1-45 Calcutta
26) *Values at Stake in Indo-Pakistan Conflict*
27) *Political Theory and practice in the World Today*
28) *Summer School of politics – a Note*
29) *The political problem of Emerging India* – 29-7-61
30) *Problems of Opposition in Indian Democracy*
31) *Modern Political Thoughts*
32) *Communal Harmony and National Defence*
33) *Facing the Challenge*
34) *Felicitations to the Radical Humanist*
35) *Modern War*
36) *Manavendra Nath Roy*
37) *Co-operation and Democracy*
38) *The Goa Problem*
39) *Shri. Yashwantrao Chavan*
40) *Testing Time for Congress*
41) *The New Resurgence in Asia*
42) *Fundamental Rights of a Citizen in free India*
43) *Pandit Motilal Nehru*
44) *Jaggannath Shankar Seth*
45) *Lal Bahadur Shastri*
46) Indian Secular Forum Foundation Conference Address
47) *The Problem of Humanist Action IHEU* – Paris
48) *Democracy and Development in South East Asia*
49) *Social Service League*
50) *Youth and National purpose*

अनुक्रमणिका

51) *Social Aspect of Medicine with special reference of pediatrics*
52) *Democracy and Socialism in India* – Nehru Memorial Lectures at Nagpur
53) *Lokhitwadi* – Goa
54) *Mahatma Jotirao Fule* – Goa
55) *Gopal Krishna Gokhale* – 9-5-76 – Pune
56) *Scheme of the Ravindranath Tagore Theatre Fund*
57) *Notes on Dr. V. R. Khanolkar, R. P. Desai, Dr. R. V. Sathe*
58) *Indo China War – Talk*
59) National Broadcast on War
60) *Business and Politics*
61) *Planning in Perspective*
62) *M. N. Roy and Indian Secularism*
63) *A Note on the Role of Government in Economic Development with special reference to Developing Society*
64) *Chinese Economy*

## मराठी लेख / भाषणे

१) भारतीय बुद्धिमंतांचे अपनयन
'नवभारत' ऑगस्ट, १९६४
२) आपल्यामधील वर्तमान असंतोष आणि वैफल्य राजकीय दृष्टिकोण
'नवभारत' ऑक्टोबर, १९५३
३) नीती आणि राजनीती
एक व्याख्यान
४) ऐहिक राज्याची इष्टानिष्टता
'मौज' २५–१–५०
५) वैचारिक चळवळीची गरज का ?
'विवेक' ४–९–४९
६) तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी
'नवभारत' ऑक्टोबर, १९५४
७) तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी
'विविध वृत्त' ३–१०–५४
८) हॅरोल्ड लास्की
'लोकमानस' २–४–५०
९) तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी
'सह्याद्री' ऑक्टोबर, १९५४
१०) जगन्नाथ शंकर शेट
'पुस्तक परीक्षण'
११) पंडित जवाहरलाल नेहरु
'नवभारत' नोव्हें.–डिसें., १९६४
१२) जॉन फिट्स जेराल केनेड
'नवभारत' जानेवारी, १९६४
१३) निखिता क्रुश्चेव्ह
'नवभारत' नोव्हेंबर, १९५७
१४) इम्रे नाझचे पाखंड
'नवभारत' जून १९५९
१५) तिसरी इंटरनॅशनल, चीन व रॉय
'नवभारत' एप्रिल १९५४
१६) मानवेंद्रनाथ रॉय यांचे वैचारिक दूरदर्शित्व
'नवभारत'
१७) रशियन राज्यक्रांती,
'नवभारत' एप्रिल १९५४
१८) जुन्या जगाचा अंत करणारा नेता–स्टालिन
'मौज' १५–३–५३
१९) रशियातील विरोधक नि:पाताच्या विविध उपपत्ती–ग्रंथपरिचय
'नवभारत' नोव्हेंबर १९५३
२०) रशियन राज्यक्रांतीची फलश्रुती
'लोकमान्य' २६–१–५०
२१) काश्मीर प्रश्न
'नवभारत'
२२) भाषिक राज्ये
एक भाषण

२३) राष्ट्रीय एकात्मतेचा प्रश्न
४–१२–६१ भाषण–अहमदाबाद लास्की इंस्टिटयूशन
२४) कलहाचे लोण नेत्याकडून अनुयायांकडे
'महाराष्ट्र टाइम्स' १५–११–६९
२५) काँग्रेस संघटित पक्ष म्हणून यापुढे कार्य करू शकेल का? 'लोकसत्ता' २५–८–६९
२६) राजकीय पक्षांची आचारसंहिता 'नवभारत'
२७) लोकशाही विकेंद्रिकरणाची समस्या
'नवभारत' नोव्हेंबर १९६०
२८) सहजीवनाचे आव्हान
'नवभारत' ऑगस्ट, १९५७
२९) आगामी निवडणुका
'धनुर्धारी', दिवाळी, १९५०
३०) हिंदी लोकशाहीचे भवितव्य
'लोकमान्य', दिवाळी, १९४९
३१) जागतिक राजकारणाची वाटचाल
'लोकसत्ता', १९५४
३२) राष्ट्रीय जीवनाची कोंडी
'मराठवाडा', दिवाळी, १९५४
३३) लोकशाही आणि समाजवाद
'नवभारत' जुलै १९५२
३४) हिंदी लोकशाहीचा प्रश्न
'लोकसत्ता' २७–४–५२.
३५) कोरियन युद्ध
३६) निर्भय लोकशाहीच्या विकासाची गरज
'लोकसत्ता', २६–१–५१
३७) विरोध आणि विरोधक
३८) राजकारण आणि सांस्कृतिक जीवन
भाषण– वाई– ३०–३–६०
३९) लोकशाही आणि हुकूमशाही राष्ट्रातील विज्ञान व तंत्रविद्या यांच्या विकासाचा प्रश्न: निकोलाय गॅले (अनुवाद)
'नवभारत' नोव्हेंबर, १९५८.
४०) स्वतंत्र भारताचे परराष्ट्रीय धोरण
'चित्रमय जगत' २–१–५०
४१) मार्क्सवाद शास्त्रीय आहे काय?
'चित्रा' २–११–४१
४२) सर्वोदय
'धनुर्धारी' दिवाळी १९४९
४३) अखिल भारतीय चांद्रसेनीय कायस्थ प्रभु परिषद, १९६८
भाषण– ६–१२–६८
४४) माजा वेलाचा मृत्यू: पी. सुंदरम्
(अनुवाद) 'नवभारत'
४५) लहान उद्योग धंद्यांचा प्रश्न आणि महाराष्ट्र
'व्यापारी महाराष्ट्र,' दिवाळी
४६) अर्धविकसित राष्ट्रांचा विकास आणि लोकशाही
'लोकसत्ता,' दिवाळी, १९५५
४७) आर्थिक ऐक्याकडून राजकीय ऐक्याकडे
४८) चिनी आक्रमण आणि आर्थिक नियोजन
४९) स्वतंत्र भारताची राज्यघटना
तीन लेख 'मौज' ८, १५ व २२ डिसेंबर १९४८
५०) महाराष्ट्रातील विचारवंताना अनावृत पत्र
'मौज' ९–२–४९
५१) युरोपच्या अंतरंगातील वैचारिक बदल
'लोकसत्ता' २९–१०–५१
५२) आगरकर
गोवा–व्याख्यान
५३) संमती वयाचा कायदा
हिराबाग व्याख्यान
५४) प्रस्तावना– प्रियोळकर मुद्रण
५५) राजर्षी शाहु महाराज
'शाहु गौरव ग्रंथ'
५६) मानवेंद्रनाथ रॉय–
'माणूस–' १५–८–७६

## शैक्षणिक लेख (मराठी)

१) आमचे शिक्षण
'महाराष्ट्र टाइम्स'
२) शिक्षणातील खरी निकड
१७–१०–६५
३) विद्यापीठ व प्रा. नामजोशी
३ लेख– २, ३, १४ जून ६५
४) व्यवसाय शिक्षण देणारी महाविद्यालये विद्यापीठाचे बाहेर का?
५) मौनामुळे विद्यापीठाच्या प्रतिष्ठेला धोका
६) अलिगड प्रकरणामागचा बोध

अनुक्रमणिका






# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

## मराठी

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | वैदिक संस्कृतीचा विकास : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ... | ३०·०० |
| (२) | अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) : ब्र. स्वामी केवलानंदसरस्वती | ... ... | ७५·०० |
| (३) | इतिहासाचे तत्त्वज्ञान : प्रा. सदाशिव आठवले | ... ... | १०·०० |
| (४) | क्रोचेचे सौंदर्यशास्त्र : एक भाष्य : डॉ. रा. भा. पाटणकर | .... ... | १०·०० |
| (५) | सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदु संस्कृती : प्र. रा. देशमुख | ... | १०·०० |
| (६) | पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास : डॉ. सुमंत मुरंजन | ... ... | ८·०० |
| (७) | चार्वाक: इतिहास आणि तत्त्वज्ञान : प्रा. सदाशिव आठवले | ... | ६·०० |
| (८) | मानवाचा आदर्श } ले. मानवेंद्रनाथ रॉय | ... ... | ६·०० |
| (९) | नवमानवतावाद } अनु. गोवर्धन पारीख | ... ... | ५·०० |
| (१०) | गीता-प्रवेश : डॉ. गो. वि. देवस्थळी | ... ... | ५·०० |
| (११) | लोकशाहीचे धोके : पन्नालाल सुराणा | ... ... | ४·०० |
| (१२) | भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श : सौ. कमल पाध्ये | ... ... | ४·०० |
| (१३) | हिंदी साहित्यविचार : प्रा. प्यारेलाल गोहेल | .... ... | ३·०० |
| (१४) | महाराष्ट्रातील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना : चा. अ. दाभोलकर | ... ... | २·०० |
| (१५) | श्री. यशवंतराव चव्हाण– अभिनंदनग्रंथ | ... ... | २०·० |
| (१६) | संशोधन साधना : डॉ. वसंत स. जोशी | ... ... | १२·००० |
| (१७) | ज्ञानदेव चिंतन (संपादित) : डॉ. वसंत स. जोशी | ... ... | २०·०० |
| (१८) | आनंदाचा डोह : प्रा. रा. ग. जाधव | ... ... | ८·०० |
| (१९) | भावार्थ रामायण (श्री एकनाथ महाराज कृत) बालकांड : | ... | १२·०० |
| (२०) | तरंगयामिक व पुंजयामिक : मा. ग. टोळे | ... ... | ५·०० |

**प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई (जि. सातारा)**

**ग्रंथ विक्रेत्यांना २० टक्के कमिशन.**

हे मासिक पां. गो. आपटे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ वाई यांचे करिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका

